# नवभारत




किंमत १ रुपया

सप्टेंबर १९४८



अनुक्रमणिका




नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)








महाराष्ट्र शासन

मराठी भाषा विभाग

**राज्य मराठी विकास संस्था**

**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**

**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**

संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com


# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका

# वर्गणीदारांस सूचना

(१) 'नवभारत'चा अंक दरमहा ५ तारखेच्या आंत नियमितपणें काळजीपूर्वक पोस्टांत टाकला जातो. वर्गणीदारांस जर आपला अंक १० तारखेपर्यंत मिळाला नाहीं तर त्यांनीं प्रथम स्थानिक पोस्ट ऑफिसांत चौकशी करून नंतर आमचेकडे लिहावें. अंक शिल्लक असला तरच पाठविला जाईल. अंक न मिळाल्याबद्दल १५ तारखेनंतर येणाऱ्या तक्रारीस उत्तर दिलें जाणार नाहीं.

(२) पत्रव्यवहार करतांना नेहमीं अनुक्रम-नंबर लिहावा. 'नवभारत' कचेरींतून दरमहा जो अंक रवाना होतो त्यावर पत्याच्या वरच्या बाजूस डाव्या हाताला अनुक्रम-नंबर लिहिलेला असतो.

(३) पत्ता बदलावयाचा असल्यास त्याबद्दलची सूचना कचेरीस २५ तारखे-पूर्वी मिळाली पाहिजे. त्यानंतर सूचना-पत्र आल्यास त्याची अंमलबजावणी त्याच महिन्यांत न होतां पुढील महिन्यापासून केली जाईल.

(४) 'नवभारत' च्या कोणत्याहि एजंटास वर्गणी वसूल करण्याचा अधिकार नाहीं. त्यामुळें कचेरी व वर्गणीदार या दोघांनाहि त्रास होतो व विलंब लागतो. म्हणून वर्गणी नेहमीं कचेरीकडे खालील पत्यावर पाठविण्याची कृपा करावी.

व्यवस्थापक
**'नवभारत'**,
२१९ शिवाजीनगर, पुणें ५.

---

# एजन्सीबाबत खुलासा

'नवभारत' हें एक उच्च दर्जाचें, वैशिष्टयपूर्ण मासिक मराठींत आहे, असा अभिप्राय अनेक वृत्तपत्रांनीं दिलेला आहे. अशा तऱ्हेच्या मासिकाचा प्रसार जास्तींत जास्त व्हावा यासाठीं ठिकठिकाणीं एजन्टस् नेमण्याची योजना आम्हीं तयार केलेली आहे. एजन्सीचे साधारण नियम पुढें देत आहे. तपशीलवार नियमांची मागणी कचेरीकडे केल्यास ते पाठविले जातील.

(१) विक्रेत्यानें कमींत कमी चार अंक घ्यावेत. अंक न खपल्यास परत घेतले जाणार नाहींत.
(२) डिपॉझिट म्हणून कमींत कमी दहा रुपये आमचेकडे जमा ठेवावेत.
(३) पंचवीस अंकांपेक्षां जास्त मागणी असल्यास एजंटास एक प्रत दिली जाते.

व्यवस्थापक
**'नवभारत'**
२१९ शिवाजीनगर, पुणें ५.

सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्त-मंडळाचें मासिक

# नवभारत

वर्ष पहिलें, अंक बारावा सप्टेंबर १९४८

संचालक : श्री. शंकरराव देव

संपादक-मंडळ

आचार्य शं. द. जावडेकर | आचार्य स. ज. भागवत

श्री. हरि कृष्ण मोहनी | प्रो. वि. म. बेडेकर (कार्य. संपादक)

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल, अशा प्रकारें महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणें, हें या मासिकाचें ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनीं स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठीं जें आपलें सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेलें असेल, उच्च वातावरणांतील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेनें संगृहीत केलेला असेल, त्याचें दिग्दर्शन हेंच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊं शकतें, असा संचालक व संपादक-मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकांत येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतु नाहीं.

संचालक व संपादक-मंडळांतील सर्व व्यक्ती यांचेंही सर्व विषयांत मतैक्य आहे, असें नाहीं. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यासंबंधीं सदृश अशा दृष्टिकोनानेंच त्यांना एकत्र आणलें आहे. तथापि प्रत्येकाचें व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होतां विकास व्हावा या दृष्टीनेंच त्यांचें सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ति आपल्या नांवानें प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकांत प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणांत सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

---

वार्षिक रु. ९ सहामाही रु. ५ अंकास रु. १

मुद्रक व प्रकाशक र. ग. जोशी यांना हें मासिक विश्वास छापखाना, २९१ शनिवार, पुणें २, येथें छापिलें आणि नवभारत कचेरी, २१९ शिवाजीनगर, पुणें ५ येथें सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाकरितां प्रसिद्ध केलें.

अनुक्रमणिका








# ‘नवभारत’ सप्टेंबर १९४८

## या अंकांतील लेखक

**प्रा. श्री. व्यं. पुणतांबेकर** (नागपूर) — नागपूर विश्वविद्यालयामध्यें राज्यशास्त्राचे प्राध्यापक. ‘नागरिक नीति’ ‘Indian Citizenship and Civilization’ इत्यादि ग्रंथांचे कर्ते.

**आचार्य शं. द. जावडेकर** — सुप्रसिद्ध राज्यनीतिशास्त्रज्ञ. ‘आधुनिक भारत’ इत्यादि ग्रंथांचे लेखक. ‘नवभारता’चे एक संपादक.

**प्रा. म. अ. मेहेन्दळे** (नवसारी) — एस्. बी. गर्दा कॉलेजमध्यें संस्कृतचे प्राध्यापक.

**श्री. भि. अ. परब** एम्. ए. (मुंबई) — ‘लघुनिबंध आणि लघुनिबंधकार’ या पुस्तकाचे लेखक.

**डॉ. के. ल. दप्तरी** (नागपूर) — प्राच्यविद्यापंडित व ज्योतिर्गणितज्ञ. ‘धर्मरहस्य’, ‘Social Institutions in Ancient India’ इत्यादि ग्रंथांचे लेखक.

**श्री. शान्तिकुमार शहा** बी. ए. (सोलापूर) — ललित वाङ्मयाचे व्यासंगी अभ्यासक.

**डॉ. माधव गोपाळ देशमुख** एम्. ए. एलएल्. बी. पीएच्. डी. (अमरावती) — विदर्भ महाविद्यालयामध्यें मराठीचे प्राध्यापक. ‘मराठीचें साहित्यशास्त्र’ (ज्ञानेश्वर ते रामदास)—य ग्रंथाचे लेखक.

**प्रा. स. वा. कोगेकर** (पुणें) — फर्ग्युसन कॉलेजमध्यें राज्यशास्त्राचे व अर्थशास्त्राचे प्राध्यापक ‘Elements of Economics’ हा ग्रंथ प्रा. कोगेकर व प्रा. कोल्हटकर यांनीं लिहिला आहे

**प्रा. ना. अ. गोरे** एम्.ए.(मुंबई)— अंधेरी येथील एम्.एम्. कॉलेजमध्यें संस्कृत व अर्धमागधी या विषयांचे प्राध्यापक. ‘A Bibliography of the रामायण’ इत्यादि ग्रंथांचे संपादक.

**श्री. य. कृ. सोवनी** (पुणें) — वाङ्मय–आयुर्विद्या–विशारद (टि. म. वि.). संयुक्त–महाराष्ट्र–परिषदेचे संघटक. ‘संयुक्त महाराष्ट्राची माहिती’ या पुस्तकाचे लेखक.

**प्रा. प. वि. पटवर्धन** (पुणें) — नौ. वाडिया कॉलेजमध्यें अर्थशास्त्राचे प्राध्यापक.

**श्री. ना. गो चापेकर** (बदलापूर) — साहित्यिक व समाजशास्त्रज्ञ. ‘समाजनियंत्रण’, ‘वैदिक निबंध’ इत्यादि ग्रंथांचे लेखक.

---

**मुंबई महाराष्ट्राचीच** या लेखाच्या शेवटीं त्याच नांवाचा एक नकाशा दिला आहे. तो नकाशा मुंबईच्या ‘कल्पना स्टूडिओ’चे नामवन्त चित्रकार श्री. गोडसे यांनीं काढला असून त्याचा ब्लॉक मुंबईच्या कर्नाटक प्रिंटिंग प्रेसमध्यें तयार झाला आहे. संयुक्त महाराष्ट्र परिषदेसाठीं हें चित्र काढलें असून परिषदेच्या परवानगीनें तें आम्हीं येथें वापरलें आहे.

—**का. सं.**

अनुक्रमणिका

# हिंदु-राज्यांतील राज्यसत्ता व धर्मसत्ता : स्थान व संबंध.

प्रा. श्री. व्यं. पुणतांबेकर

आज समाजपंथीयांनीं आपल्या पंथाभिमानाच्या अतिरेकामुळें हिंदु-समाज, हिंदु-संस्कृति हिंदु-राष्ट्र व हिंदु-राज्य ह्यांच्याविरुद्ध एकच काहूर उठविलें आहे. या दृष्टीनें त्यांच्यामध्यें व मुसलमानांमध्यें फरक करण्याचें कांहीं कारण नाहीं. दोघांनाहि हिंदु नांव शत्रुवत् वाटतें. स्वमतप्रचारासाठीं व स्वपंथ स्थापण्यासाठीं हें जुनें प्रचारतंत्र नव्या अर्थ-कामप्रधान पंथांना आवश्यक वाटतें. तें त्यांचें बाळकडूच आहे. एकादा काल्पनिक असुर व खोटा बागुलबोवा उत्पन्न करून व त्याच्या नाशाचा विडा उचलून हे पंथ आपलें शिष्टत्व व प्रभुत्व स्थापूं पाहतात. प्रत्येक विजिगीषु पंथाला अथवा पक्षाला एक द्वेषाचें स्थान वा दोषाचें केंद्र स्थापावें लागतें. त्याच्या तुलनेनें तो आपलें तत्त्वज्ञान व आपली कार्य-प्रणाली श्रेयस्कर व अनुकरणीय म्हणून दाखवीत असतो. जर्मन नाझीपक्षानें सर्व दुःखांचें खापर यहुदी व समाजवादी लोकांवर फोडलें व आपलें संघटन करून राज्य स्थापलें. रशियाच्या लेनिन-स्टालिन-प्रणीत समाजपंथीयांनीं, भांडवलवाले, व्यापारवाले व धर्मवाले या वर्गांवर तें खापर फोडलें व आपला उद्धार करून राज्य आक्रमिलें. आतां हिंदुस्थानांतील समाजपंथी तें हिंदूंवरच फोडीत आहेत. या प्रचार-तंत्राच्या योगें लोकांची फसवणूक करून ते आपलें प्रस्थ व आपली प्रतिष्ठा सामान्य लोकांत वाढवींत आहेत आणि हिंदुत्व हें हिंदूंचा शत्रु असा भास उत्पन्न करीत आहेत.

धार्मिक आदर व नागरिक सहिष्णुता आणि सर्व पंथांशीं व संप्रदायांशीं समान व सलोख्याची वागणूक हे गुण हिंदुधर्मीयांच्या रोमरोमीं भिनलेले आहेत. ते समाजपंथीयांमध्यें सांपडत नाहींत. ते इतर धर्मांचा व वादांचा, पंथांचा व संप्रदायांचा, द्वेषच करतात व त्यांना टाकाऊ, गर्ह्य व त्याज्य समजतात. त्यांनीं स्वातंत्र्याच्या व सहिष्णुतेच्या गप्पा मात्र माराव्या, पण त्यांच्या रशियन राजवटींत धर्मस्वातंत्र्य, विचारस्वातंत्र्य, आचारस्वातंत्र्य, सभास्वातंत्र्य व संचारस्वातंत्र्य फारच थोडीं व मर्यादित आहेत.

## हिंदुस्थानची प्रेरणा

आजच्या हिंदुस्थानची धारणाशक्ति वा प्रेरणा-शक्ति हिंदुत्वाची आणि त्याच्या भव्य इतिहासाची, उच्च शीलाची व प्रौढ संस्कृतीची आहे. ती शक्ति बाहेरून आलेली व अंधानुकरणानें आणलेली नाहीं. ती केवळ देशाच्या भौगोलिक सीमेनें अथवा आर्थिक रचनेनें उत्पन्न झालेली नाहीं. तिच्यांतील एकत्वाची भावना, धारणा व प्रेरणा ह्यांना आधार हिंदूंचें आध्यात्मिक तत्त्वज्ञान, त्यांचे नैतिक विचार व त्यांचा सांस्कृतिक इतिहास हीं आहेत; हींच आमच्या राष्ट्राचा प्राण व त्याची प्रेरणा आहेत. हींच आमच्या स्वराज्याची जननी, संस्कृतीची पोषिणी व राष्ट्राची पालनी आहेत. यांनींच हिंदू लोकांना काश्मीरपासून ते कन्याकुमारी-पर्यंत, कामरूपापासून काठेवाडापर्यंत एका सूत्रांत बांधलें आहे.

आज या हिंदु-शक्तीची प्रेरणा पाकिस्तान व पठाणिस्तान यांच्या आक्रमणाविरुद्ध प्रत्येक ठिकाणीं लढत आहे. तीच शक्ति राजपुतांच्या, कर्नाटकीयांच्या, मराठ्यांच्या, शिखांच्या, जाटबुंदेल्यांच्या



अनुक्रमणिका






व गुरख्यांच्या पराक्रमाच्या मागें नांदली व नांदत आहे. तीच त्यांना प्रेरक झाली आहे. ती समाज-पंथीयांची वा नव्या राष्ट्रवाद्यांची नाहीं. त्यांचें नांव फौजांच्या भीषण संग्रामांत कोठेंच ऐकूं येत नाहीं. देशांतील राजपरिषदांत, घटनासमितींत व भाषण-सभांत त्यांनीं पुष्कळ गोंधळ घातला आहे व तेथें ते आपसांत सत्तेची वांटणी व संपत्तीचें वितरण सुच-वीत आहेत.

## समाजवाद्यांची प्रेरणा

समाजवाद्यांनीं मोठेपणाचें पोकळ ढोंग करून व संस्कृतिरहित लोकसमाजाचें अवडंबर माजवून वाटेल तीं आर्थिक, सामाजिक, शासनिक, नैतिक व ऐतिहासिक मतें त्याचप्रमाणें विधानें पाश्चात्यांपासून जशींच्या तशीं घेऊन आमच्या माथीं मारावीं आणि आम्हीं तीं ऐकावीं व पाळावीं कां म्हणून ? आम्हांला नीति व तत्त्वज्ञान आणि इतिहास व संस्कृति नाहींतच कीं काय ? आज पाश्चात्य संस्कृतीच्या नैतिक अधःपातानें व राजकीय झोटिंगशाहीमुळें पाश्चात्यांची नैतिक व सांस्कृतिक पिछेहाट झाली आहे व होत आहे. पण त्यांचाच उसना धीर व ढिला पाया घेऊन आणि एका काल्पनिक युगाचा आव आणून व प्रगतीचा भास उत्पन्न करून **समाजवादी** आमच्या हिंदु-स्थान देशाची नव्यानें पुनर्रचना करूं पाहत आहेत. त्यांचा अनुभव तो काय, त्यांचें ज्ञान तें किती व त्यांची प्रेरणा तरी काय दर्जाची आहे! ज्यांना इतिहासाचा पाठिंबा नाहीं, ज्यांना आध्यात्मिक तत्त्वज्ञान नाहीं, ज्यांना धर्म व नीति यांची प्रेरणा मान्य नाहीं आणि ज्यांचें सगळें ध्येय अर्थकाम-प्रेरित आहे, त्यांनीं नव्या मानवी संस्कृतीचे व समा-जाचे धडे कोणास सांगावे ?

आजचा संग्राम हिंदू आर्यांची धर्ममोक्षप्रधान चार पुरुषार्थांची नीति आणि समाजवादीयांची केवळ अर्थकामप्रधान अर्थपुरुषार्थाची नीति यांमधला आहे. तोच झगडा आज हिंदूंना समाजवादीयांशीं व बाह्य कट्टर संप्रदायांशीं लढावयाचा आहे. आमच्या राज्याच्या व राष्ट्राच्या, समाजाच्या व संस्थांच्या कल्पना धर्मनीतिप्रधान व मानवी आहेत, केवळ अर्थकामप्रधान व पंथीय नाहींत. तो लढा आज एक हजार वर्षें आमचे धर्मनीतिप्रेरित आर्य पूर्वज चालवीत आले आहेत, तो अर्थकामवृत्तीच्या वणिक् लोकांनीं चालविलेला नाहीं. तो लढा यवनांशीं, म्लेंच्छांशीं, शक-हूणांशीं, मुसलमानांशीं व ख्रिस्त्यांशीं झाला असून अव्याहत चालूच आहे व राहील. आम्ही आज सहा सहस्र वर्षें इतिहासरूपानें व मान्यतेनें टिकलों आहों व पुढेंहि टिकूं असा आमचा दृढ आत्मविश्वास आहे. आतां या लढ्यामध्यें **समाजपंथी** लोक पुढें येऊन उभे राहिले आहेत.

## हिंदूंचें राज्यसूत्र समन्वयाचें आहे

हिंदु-संस्कृति केवळ अर्थकामप्रधान नाहीं. ती सर्व मानवी आचारव्यवहारांचा धर्ममोक्षांच्या दृष्टीनें विचार करते. ती इतिहासाच्या कसोटीवर त्याज्य ठरली नाहीं. ती एकाक्ष नाहीं, एकपंथनिष्ठ नाहीं. ती एका व्यक्तीचें स्तोम माजवीत नाहीं. तिच्यामध्यें अनेक प्रकार व पंथ आहेत, तिचे अनेक आचार्य व अनेक मार्ग आहेत. ती चतुर्मुख व सहस्रचक्षू आहे. तिची जीवनदृष्टि व धारणावृत्ति एकान्तिक नाहीं. ती एकच अव्यक्त आद्यशक्ति मानीत असली तरी तिचा व्यक्ताच्या अनेकत्वावर व त्याच्या बहु-गामित्वावर विश्वास आहे. एकच पथ वा पंथ खरा आणि दुसरे सर्व खोटे, त्याज्य व गर्ह्य असें ती मानीत नाहीं. उपासनापंथ, भक्तिमार्ग, कर्मप्रकार, व ज्ञानदृष्टि हीं अनेक प्रकारचीं असूं शकतात, तद्वत् सामाजिक संस्था, शासनिक व्यवस्था, आर्थिक घटना व सांस्कृतिक प्रकार हींहि भिन्न असूं शकतात; त्यांत वावगें कांहीं नाहीं. त्यांवर कालाची भिन्न प्रेरणा, स्थलाचा विविध प्रभाव, कर्त्यांची भिन्न कार्यक्षमता व नेत्यांची भिन्न दृष्टि या सर्वांचा परिणाम अनेक प्रकारें होतो व तो नव्या नव्या विविध घटना व संघटना उत्पन्न करतो. त्यामुळें हिंदू लोक राज्याचा एकच पंथ व एकच पक्ष असावा असें मानीत नाहींत हेंच हिंदुलोकांचें मूळ धर्मसूत्र व राज्यसूत्र आहे व तें समन्वयाचें आहे. तेंच त्यांच्या राज्याचा पाया आहे. **हिंदु-राज्यामध्यें भिन्न-पंथीयांना समान स्थान व स्वातंत्र्य आहेत.** तें राज्य एकाच पंथाचें व पक्षाचें होऊं शकत नाहीं. बौद्ध धर्माच्या उदयानंतर त्याची दृष्टि व स्थिति हीच राहिली.












# हिंदु-राज्यांतील राज्यसत्ता व धर्मसत्ता : स्थान व संबंध

हिंदु राजा हा धर्मपंथांच्या दृष्टीनें तटस्थ व मध्यस्थ आहे. त्याचा हेतु वा धर्म एका पंथाची स्थापना अथवा एका उपासनेचा प्रसार करण्याचा नाहीं. त्याचें राजकार्य समाजकंटक शोधण्याचें व त्यांना शासन करण्याचें, सदाचारी लोकांचें संग्रहण करण्याचें, दीनांचें अनुग्रहण करण्याचें, सर्व लोकांचें संरक्षण करण्याचें आणि त्यांच्या धर्मांचें व नीतींचें पालन करण्याचें आहे, असें हिंदु-राजनीति सांगते.

## देवशाही (Theocracy) मागील कल्पना

देवशाहीची अथवा धर्मनिगडित राज्याची (Theocracyची) कल्पना मुख्यत: यहुदी, ईसाई व महंमदी धर्मीयांनीं उत्पन्न केलेली आहे. ती आक्रमक धर्मांची व स्वसंप्रदाय-प्रसारक पंथांची आहे. ती त्यांनीं मानलेला एकच धर्मप्रवर्तक, त्यांचा एकच विशिष्ट देव, त्यांचा एकच पवित्र ग्रंथ व त्यांतील एकच विशिष्ट उपासना-प्रकार, यांवर अधिष्ठित आहे. तीमध्यें त्या धर्मानें पुनीत झालेला राजा, राजमंडळ व राजतंत्र, तसेंच त्याचा धर्मगुरु, धर्ममंडळ व धर्मतंत्र, हीं सर्व एका विशिष्ट देवाच्या व पंथाच्या प्रस्थापनेचे दैवी सहायक आहेत. तीमध्यें धर्मसत्तेचें अंग व क्षेत्र हीं श्रेष्ठ असून, राजसत्तेचा व धर्मसत्तेचा उद्देश देवशाही चालविणें हाच आहे. त्यांनीं समाजव्यवस्थेमध्यें व राज्यव्यवस्थेमध्यें आपल्या धर्मपंथाच्या मार्गाला श्रेष्ठ स्थान तसेंच निर्णायक महत्त्व दिलें आहे.

देवशाहीमध्यें देव स्वत: येऊन राज्य करीत नाहीं. तिच्यामध्यें कांहीं लोक आपणांस देवाचे खास प्रेषित व त्याचें अधिकृत मुख असें समजून बोलतात आणि देवाच्या आंतरिक इच्छा, त्याचे उद्देश व उपदेश, संदेश व आदेश अधिकृत रीतीनें व प्रतिनिधिरूपानें सांगतात. तेथें लोकांच्या इच्छांना व विचारांना स्थान वा मान नाहीं.

ह्या विचार-सरणीनुसार सर्व लोकांनीं त्यांच्या आज्ञा केवळ धार्मिक कृत्यांमध्येंच नव्हे तर आर्थिक, शासनिक व इतर व्यवहारांमध्यें सुद्धां पाळावयाच्या असतात.

राज्य-संस्था ही केवळ देवानें उत्पन्न केलेली आहे व तिचे अधिकार देवतेच्या अधिकारासारखे असतात येवढ्यावरूनच देवशाही उत्पन्न होत नाहीं. राजाच्या उत्पत्तीची कल्पना देवापासूनची असली तरी तेवढ्यानेंच देवशाही उत्पन्न होत नाहीं. जेव्हां एकादा राजा देवाचा प्रतिनिधि म्हणून आपणालाच धर्माचा अधिकार आहे आणि आपलाच धर्म खरा म्हणून तो सर्वत्र स्थापावयाचा आहे, म्हणजे राज्यकृत्यें व धर्मकृत्यें दोन्ही आपल्याच खास अधिकाराचीं आहेत असें सांगूं लागतो व त्याप्रमाणें राज्यकारभार चालवूं लागतो तेव्हां देवशाही उत्पन्न होते. जेव्हां तो आपणालाच दैवी नियम कळतात व त्यांचा अर्थ समजतो, आपणालाच देवाची कृपा संपादन करतां येते व त्याचा कोप आवरतां येतो आणि त्याबरोबरच भिन्न व विरोधी पंथांचा, मतांचा व मार्गांचा नाश करण्याचा अधिकारहि आपणासच आहे असें मानतो, तेव्हां देवशाहीचें राज्य उत्पन्न होतें व चालतें. ज्या राज्यव्यवस्थेमध्यें व राज्यकारभारांत सत्ताधिकारी लोक देवांशीं जाल्या व अनुग्रह-दृष्ट्या आपला घनिष्ठ संबंध आहे असें ठाम प्रतिपादतात आणि त्याची इच्छा जाणण्यास व पार पाडण्यास आपणच एकमेव समर्थ व विश्वस्त आहों असें मानतात, तेथें देवशाही असते.

## हिंदु हा शब्द प्रादेशिक

हिंदु-समाज, हिंदु-धर्म, हिंदु-राष्ट्र व हिंदु-राज्य या भावना व घटना, अथवा संस्था व समजुती समानार्थी व एकच आहेत काय ? हिंदु-राज्य म्हणजे हिंदु-धर्म आहे काय ? ज्यांना आमच्या समाजाचा, धर्मांचा, राष्ट्राचा, राज्याचा आणि त्यांच्या इतिहासाचा यथार्थ अभ्यास झाला नसल्यामुळें त्यांचें ज्ञान नाहीं, त्यांनीं त्यांची गल्लत व अवहेलना करावी; ज्यांना आपल्या समाजपंथी राष्ट्रीयत्वाचा अथवा जातीयत्वाचा फाजील अभिमान, वृथा अभिनिवेश व पोकळ डौल आहेत त्यांनीं असे विचार मांडावे; ज्यांना कोणताहि इतर धर्म वा शाश्वत नीति केवळ अफूची गोळी वा भ्रामक विचारसरणि वाटते, त्यांनीं असा कोलाहल करावा; ज्यांना आपल्या समाजपंथाची व काल्पनिक समाजाची स्थापना दुसऱ्यांच्या धर्मांच्या व इतर वर्गांच्या द्वेषावर उभारावयाची आहे, त्यांनीं त्यांच्याबद्दल व आपल्याबद्दल खोटेंनाटें इतिहासरूपी नाटक रचून वर्तमान-नाट्य रंगवून सामान्य लोकांकरतां त्यांच्या








अर्थकामप्रधान भावी साध्यांचे मनोरथ रचावे व गोडवे गावे; हें सर्व साहजिक आहे.

ह्या नवसमाजपंथीयांनीं देशाच्या इतिहासाची, मानव्याच्या धर्माची व समाजाच्या नीतीची उठाठेव करणें अप्रस्तुत आहे. त्यांचें मत व कार्यक्रम हीं अगोदरच ठरलेलीं आहेत. त्यांना इतिहासाच्या सौभाग्याचे दाखले व नीतिधर्माचे मासले कशाला पाहिजेत ?

हा देश कोणाचा ? हिंदूंचा का हिंद्वेतरांचा ? हें हिंदुस्थान का हिंद्वेतरस्थान ? विष्णुपुराण व भविष्यपुराण यांमध्यें लिहिलें आहे :

" उत्तरस्यां समुद्रस्य हिमाद्रेश्चैव दक्षिणे ।
वर्षं तद्भारतं नाम भारती यत्र सन्ततिः ॥

—विष्णुपुराण.

" हिंदुस्थानमिति ज्ञेयं राष्ट्रमार्यस्य चोत्तमम् ।
म्लेंच्छस्थानं परं सिंधोः कृतं तेन महात्मना ॥

—भविष्यपुराण.

' हिंदुस्थान ' हा शब्द येथें प्रादेशिक आहे, तसाच हिंदु शब्दहि आहे. सिंधुनदीपासूनच्या व हिमालयाच्या दक्षिणेकडील सर्व प्रदेशाचा व लोकांचा अंतर्भाव या शब्दामध्यें होतो. तेव्हां हिंदु शब्दाबद्दल इतका तिटकारा वा द्वेष कां उत्पन्न व्हावा हें समजत नाहीं. रशियाला समाजवादी लोक मातृभूमि मानतात व तेथील प्रजेला रशियन म्हणतात. हिंदु शब्द हा ईसाई, मुसलमान वा यहुदी यासारखा विशिष्ट–पंथ–प्रदर्शक नाहीं. हिंदु–समाज व हिंदु–धर्म हे शब्द हिंदुस्थानांत जेवढे देशी समाज व पंथ आहेत त्या सर्वांना तर लागू पडतातच, पण जे ईसाई, मुसलमान, यहुदी वा पार्शी धर्माचे आहेत, त्यांनाहि एकराष्ट्र–सिद्धान्ताखालीं हिंदु अथवा हिंदी शब्द लागू करणें गैरवाजवी होणार नाहीं. अमेरिकेमध्यें हिंदुस्थानांतील सर्व लोकांना–मग ते कोणत्याहि समाजाचे वा पंथाचे असोत–हिंदूच म्हणून संबोधितात. हे सर्व बाह्यक समाज हिंदुस्थानांतील ऐतिहासिक संस्कृति, राजकीय नीति व संबंध आणि आर्थिक व्यापार व व्यवहार ह्यांनीं पूर्णपणें प्रभावित आहेत. हिंदुस्थानांतील ईसाई, मुसलमान, यहुदी व पारशी ह्यांच्यामध्यें हिंदुत्वाचीं कांहीं लक्षणें व हिंदुत्वाची विचारसरणि इतर लोकांना लवकर दिसून येतात. हिंदूंच्या व त्यांच्या आचारविचारांमध्यें, आहारविहारांमध्यें व व्यापारव्यवहारांमध्यें पुष्कळच साम्य व देवघेव आहेत. त्यांच्या जीवनांत हिंदुत्वाचा प्रभाव आहे; त्याचें ऐतिहासिक व सांस्कृतिक वेष्टण त्यांच्याभोंवतीं आहे. ईसाई व मुसलमान समाज हे धर्मान्तर केलेल्या लोकांचे समाज आहेत. ह्या ऐतिहासिक आर्यत्वाच्या अथवा हिंदुत्वाच्या अधिष्ठानावरच आमचें स्वराज्याचें तारूं आजपर्यंत भारतीयांनीं चालविलें आहे. राजपूत, मराठे व शीख यांनीं मध्यकालीन व आधुनिक इतिहासांत याच्याच प्रेरणेनें व प्रभावानें स्वराज्य मिळविलें व राखलें. खर्ड्याच्या लढाईनंतर १७९४मध्यें मराठ्यांचे उद्गार असेच आहेत:—" अटक नदीचे अलीकडे दक्षिण समुद्रापावेतों हिंदूंचें स्थान, तुरकस्थान नव्हे. हे आपली सीमा पांडवांपासून विक्रमाजितापावेतों राखून त्यांनीं उपभोग घेतला. "

हिंदुस्थान हें एकच राष्ट्र आहे. तें अनेक भिन्न हिंदु-राष्ट्रांचा संघ नव्हे. फार फार तर अनेक राजकीय विभागांचा म्हणजे प्रांतांचा व संस्थानांचा संघ असें त्याला म्हणतां येईल. पण ते सर्व प्रान्त, प्रदेश व तीं सर्व संस्थानें हिंदूंचीं व हिंदू आहेत. सर्व धर्मांचे लोक तेथें समान नागरिकतेनें राहतात व राहतील, मग ते धर्मानें भारतीय असोत अथवा भारतीयेतर असोत. हिंदुस्थान हा देश सर्व नागरिकांचा असला तरी नांवानें तो हिंदु–राष्ट्र आहे व राहील. ही हिंदु-राष्ट्राची भावना वा घटना नवीन नाहीं, प्राचीन आहे. मौर्यपूर्व व मौर्योत्तर कालापासून ती अव्याहत चालू आहे. त्यांतील राज्यें व साम्राज्यें खास हिंदूंचीं असलीं तरी तीं केवळ देशधर्मीयांचेंच हित पाहणारीं नव्हतीं व नाहींत. मौर्यकाल, गुप्तकाल, विजयानगरकाल, राजपूतकाल, मराठाकाल व शीखकाल हे या सिद्धांताची साक्ष देतात. त्यांमध्यें सर्व धर्मांना अथवा पंथांना समानपणें वागवीत होते. तीं राज्यें सर्वांकरतां होतीं, एका पक्षाचीं अथवा पंथाचीं नव्हतीं. सम्राट् अशोकाची तशीच शिवाजी महाराजांची राजनीति तर प्रसिद्धच आहे. ती व्यापक व संग्राहक होती, सांप्रदायिक नव्हती.

हिंदु–राज्य म्हणजे हिंदुस्थानांतील लोकांचें राज्य. जे लोक त्याची एकराष्ट्रीयता, समाननागरिकता








व राजकीय स्वतंत्रता निष्ठापूर्वक मानतात आणि त्याप्रमाणें वागतात व व्यवहार करतात, तेच त्या राज्याचे खरे नागरिक व मालक. त्याचप्रमाणें जे त्याच्या ऐतिहासिक संस्कृतीबद्दल आदर व प्रेम दाखवितात तेच त्याचे खरे भागीदार व मित्र! हिंदु–राज्य कोणत्याहि खास पंथीयांचें अथवा खास उपासनासंप्रदायाचें राज्य नव्हे. पण त्यामध्यें हिंदु-लोकांचें राष्ट्रीयत्व, समाजत्व, संस्कृतित्व व राज्यत्व म्हणजेच थोडक्यांत बोलावयाचें तर हिंदुत्व प्रतिबिंबित झालें पाहिजे. तेंच हिंदुस्थानांतील लोकांचें खरें राष्ट्रीयत्व आहे.

## हिंदूंचें धर्मनिरपेक्ष राज्यशास्त्र

हिंदूंच्या दृष्टीनें राजनीतिशास्त्र हें स्वतंत्र शास्त्र आहे. ज्या दोन ग्रंथकारांनीं—शुक्र व बृहस्पति यांनीं या शास्त्राची रचना, तशीच वाढ केली त्यांनीं त्याचा संबंध इतर शास्त्रांशीं गौण असा ठेवलेला नाहीं. त्यांच्या दृष्टीनें मुख्य विद्या केवळ दोनच आहेत; त्या म्हणजे ‘ वार्ता ’ व ‘ दंडनीति ’ ह्या होत. त्यांनीं केवळ नीतिशास्त्र व अर्थशास्त्र ह्यांनाच प्राधान्य दिलें आहे.

त्रयीधर्माला त्यांनीं केवळ ‘ संवरणमात्र ’ असें संबोधिलें आहे. त्यामध्यें कोणत्याहि विशिष्ट उपासनाधर्मांचें प्राबल्य मानलेलें नाहीं. त्यांच्या मतें सर्व शास्त्रें व धर्म राज्यशास्त्राच्या योग्य पालनावर अवलंबून आहेत. ज्या ज्या ग्रंथकारांनीं राज्यशास्त्राचा, राजधर्माचा अथवा राजनीतीचा विचार केला आहे, त्यांनीं त्यांनीं त्याचा विचार स्वतंत्रपणें केला आहे. लोकांचें पालनपोषण व त्यांच्या धर्मांचें रक्षण कशीं होतील हाच त्या शास्त्राचा मुख्य उद्देश आहे. त्यामध्यें विशिष्ट पंथाच्याच लोकांचें राज्य अथवा त्यांचें विशेष पालनपोषण हा विचार मुळींच नाहीं.

कौटिल्याचें अर्थशास्त्र, कामंदकाचें नीतिशास्त्र, शुक्राचें नीतिसार, सोमदेवाचें नीतिवाक्यामृत, हे सर्व ग्रंथ शुद्ध ऐहिक व शासनिक बुद्धीनेंच रचलेले आहेत. ते ग्रंथ, शासननीति ही कोणत्याहि एका पारमार्थिक विशिष्ट संप्रदायाचें गौण अंग अथवा साधन मानून रचलेले नाहींत. त्यांमध्यें सर्व प्रजेची–तींतील सर्व वर्गांची व जातींची–प्रापंचिक यात्रा अथवा त्यांचें ऐहिक जीवन कसें चालेल याचाच प्रामुख्यानें विचार केला आहे. कोणत्याहि भिन्नधर्मोपासकांना बळानें आपल्या धर्मपंथांत ओढण्याचा उद्देश त्यांमध्यें नाहीं किंवा त्यांना गुलामांप्रमाणें वागविण्याचाहि हेतु नाहीं. ह्या गोष्टी ईश्वरप्रणीत ईसाई व मुसलमानी धर्मांमध्यें सांपडतात. हिंदूंचें राज्यशास्त्र हें प्रायः व्यावहारिक शास्त्र आहे, केवळ पारमार्थिक नाहीं. तें अर्थशास्त्र आहे, केवळ धर्मशास्त्र नाहीं; मात्र त्याचा धर्मशास्त्रांतील नीति–धर्माला विरोध नाहीं. त्याचा मुख्य उद्देश मनुष्य व त्याची मातृभूमि यांचें पालनपोषण करण्याचा आहे.

हिंदु–राज्याचीं केवळ चारच कार्यें असतः—दुष्टांचें निग्रहण, सज्जनांचें संग्रहण, दीनांचें अनुग्रहण व सर्व लोकांचें संरक्षण. हिंदू राजनीति–शास्त्रकारांनीं राज्यशास्त्राची व नीतिशास्त्राची सांगड चांगली घातली आहे. त्यांनीं राजनीति ही नीति–शास्त्राची मुख्य शाखा धरली आहे. तीमध्यें लोकांचे आचार व व्यवहार कसे पाळले जातील आणि ते आपलीं कर्तव्यें, आपले देशधर्म, वर्णाश्रमधर्म व साधारण धर्म कसे पार पाडतील याचा विचार केला आहे. राज्याचा मुख्य उद्देश ते पालन करण्यांत त्यांना साहाय्य करण्याचा आहे, ते बदलण्याचा नाहीं. राजाला कुल, जाति व गण अथवा ग्राम, श्रेणि, पूग व जानपद यांच्या धर्मांमध्यें हात घालण्याचा अधिकार नाहीं. त्यांचें रक्षण करणें हेंच त्याचें कार्य.

देशधर्म–जातिधर्म–कुलधर्मान् सर्वानेवैताननुप्रविश्य राजा चतुरो वर्णान् स्वधर्में स्थापयेत्—मनु.
कुलानि जातीः श्रेणीश्च गणान् जनपदांस्तथा।
स्वधर्मचीलतान् राजा विनीय स्थापयेत् पथि॥
—याज्ञवल्क्य.

पाषंडि–नैगम–श्रेणी–पूग–व्रात–गणादिषु ।
संरक्षेत्समयं राजा दुर्गे जनपदे तथा॥—नारद.
देश–जाति–कुलानां च ये धर्माः प्राक्प्रवर्तिताः।
तथैव ते पालनीयाः प्रजा प्रक्षुभ्यतेऽन्यथा॥
जातिजानपदान्धर्मान् श्रेणीधर्मांश्च धर्मवित्।
समीक्ष्य कुलधर्मांश्च स्वधर्मं प्रतिपादयेत्॥—मनु.

वरील अवतरणांवरून दिसून येईल कीं, राजाला विधिनिषेधरूपी धर्म–नियम करण्याचा अधिकार नव्हता, पण सर्व समूहांना व संस्थांना आपापले धर्म-

नियम पालन करावयास लावण्याचा अधिकार होता. हिंदु–राष्ट्र हें अनेक वर्णांचें, वर्गांचें व जातिसमूहांचें बनलेलें आहे. तेव्हां त्याला त्या सर्वांचे धर्मनियम राखणें आवश्यक आहे. त्यामध्यें पाषंडी, नास्तिक, यवन व म्लेंच्छ मतांना सुद्धां स्वातंत्र्य दिलेलें आहे. हिंदुराज्य हें कोणा विशिष्ट धर्मपंथीयांचें राज्य नाहीं. कारण हिंदुधर्म हा एकपंथीय धर्म नाहीं.

हिंदू राजांनीं ज्याप्रमाणें इतर अन्यधर्मपंथी–यांना–बौद्ध, जैन, यवन, शक, हूण, ईसाई, पार्शी व मुसलमान यांना–पूर्णपणें नागरिक-स्वातंत्र्य दिलें व धार्मिक सवलतीहि दिल्या, त्याप्रमाणें ईसाई व मुसलमानी देशांमध्यें कोणालाच मिळाल्या नाहींत. तेथें राजसत्ता व धर्मसत्ता यांचें एकीकरण असे व इतर धर्मपंथांचा द्वेष व छळ होत असत, ही इतिहासप्रसिद्ध गोष्ट आहे. ह्या अन्यधर्मपंथीय लोकांनीं हिंदुराज्याशीं विद्रोह करून त्याला दगा दिला. पण तो इतिहास येथें मांडण्याची आवश्यकता नाहीं.

हिंदु–राष्ट्र (State) व हिंदु–राज्य (Government) या केवळ एकाद्या हिंदुधर्मपंथावर आधारलेल्या संस्था नाहींत. त्या सर्वसाधारण मानवधर्मावर व प्रादेशिक मानवनीतीवर स्थिरावलेल्या घटना आहेत. याविरुद्ध केलेलीं विधानें असत्य व अयथार्थ आहेत, ऐतिहासिक नाहींत. हिंदुधर्मीय अन्यधर्मीयांचें पारिपत्य, त्यांची छळणूक, पिळणूक वा नागवणूक करीत नाहींत. तीं ईसाई व मुसलमानी धर्मसंप्रदायांचींच विशेष लक्षणें आहेत.

आजचें हिंदुस्थानचें राज्य कोणाचें आहे ? तें कोण चालवीत आहेत ? तें राज्य हिंदूंचें आहे व हिंदू लोक चालवीत आहेत. त्याच्यामध्यें व त्याच्यामागें हिंदूंचे उच्च राजनीतीचे विचार, त्यांच्या नागरिक कल्पना, त्यांचे सांस्कृतिक आदर्श व त्यांचें नैतिक ध्येय हीं उभीं आहेत. त्यांचीच प्रेरणा वा त्यांचाच प्रभाव त्यामध्यें आहे. समाजवादीयांना धर्म नसतो वा राष्ट्र नसतें; त्यांना केवळ एक आग्रही अर्थकामप्रधान मत असतें. त्यांनीं आम्हांला राष्ट्रीय भूमिका सांगावी ही केवळ फसवणूक आहे. तें त्यांचें प्रचारतंत्र आहे. समाजवादीयांचें प्राबल्य झालेंच तर हिंदुस्थानची संस्कृति नष्ट होईल व त्याचें व्यापक नैतिक स्वरूप जाऊन मनुष्य हा अर्थकाम–प्रेरित प्राणी होईल.

## 'हिंदुराज्य'–कल्पना इतरांपासून भिन्न

हिंदू लोक राजसत्ता व धर्मसत्ता एकच अथवा एकवटलेल्या मानीत नाहींत. त्या एकाच सत्तेचीं दोन अंगें आहेत असें त्यांचें मत नाहीं. हिंदूंमध्यें देवशाहीची (Theocracyची) कल्पना नव्हती व नाहीं. राजा हाच पुरोहित अथवा पुरोहित हाच राजा अशी संस्था वा व्यवस्था त्यांच्या इतिहासांत कोठेंच दिसत नाहीं; किंवा राजा हाच धर्मगुरु अथवा धर्मगुरु हाच राजा ही कल्पनाहि त्यांच्यामध्यें पूर्वीं केव्हांहि नव्हती व आजहि नाहीं. त्या दोघांचीं क्षेत्रें निरनिराळीं होतीं. ते अधिकारानें आपापल्या क्षेत्रांत समान व स्वतंत्र असत. त्यांचीं कर्तव्यें मर्यादित व आंखलेलीं असत. राज्य हें धर्म–पुरोहितांचें, धर्मगुरूंचें, धर्माधिकाऱ्यांचें, धर्मपुरुषांचें अथवा धर्म–मंडळाचें अधिकारक्षेत्र वा कार्यक्षेत्र नव्हे. तें राजा, राजपुत्र, राजपुरुष, राजमंत्री, राजामात्य अथवा राजमंडळ यांचें अधिकारक्षेत्र वा कार्यक्षेत्र आहे. ब्रह्माचें क्षेत्र व क्षत्राचें क्षेत्र हीं विभागलेलीं असत. ते आपापलें कार्य वा कर्तव्य पार पाडण्यास एकमेकांना पोषक असत. मात्र त्यांचें अंतिम ध्येय एकच असे; तें म्हणजे लोकस्थिति, लोकहित व लोकयात्रा हीं उत्तम कशीं साधतील व चालतील हें होय.

देवशाहींत अथवा धर्मनिगडित राज्यामध्यें राजा हाच धर्मगुरु अथवा धर्मगुरु हाच राजा असतो. खलीफा व खिलाफत हें त्याचें उत्तम उदाहरण आहे. मध्ययुगामध्यें कांहीं काळ पोपसारख्या ईसाई धर्मगुरूंनीं राजसत्ता ही आपल्या धर्मपीठाचीच सत्ता असा पुकारा केला होता व त्याप्रमाणें ते वागतहि होते. तसेंच युरोपच्या मध्यकालीन इतिहासांत ईसाई पंथाच्या कांहीं राजांनीं "ज्याचा देश त्याचा धर्म" असा सिद्धान्त घोषित केला होता. देवशाही हें विशिष्ट ईश्वरप्रणीत ग्रंथानुसार विशिष्ट–धर्मपंथीयांचें, त्याच धर्माच्या स्थैर्याकरितां व प्रसाराकरितां त्याच धर्मपंथीयांनीं चालविलेलें राज्य होय. त्यामध्यें त्यांच्या विशिष्ट धर्मगुरूंची सत्ता व धर्ममंडळाचें प्राबल्य असत. त्यांचे राज्याधिकारी व धर्माधिकारी एकच असत, अथवा








त्यांतील राजा हा त्याच विशिष्ट पंथाचा असून त्याचें मुख्य कार्य वा कर्तव्य त्या विशिष्ट धर्मपंथाचें विशेष रक्षण व त्याचा येन केन प्रकारेण प्रसार करणें हें समजलें जाई. त्यामध्यें इतर देश, समाज व धर्म–पंथ यांच्याबद्दल सतत द्वेष व विरोध बाळगला जात असे. ह्या दृष्टीनें राज्य हें धर्मप्रसाराचें मुख्य साधन व धर्मप्रसार हें देश–आक्रमणाचें व देश–विस्ताराचें मुख्य साध्य समजलें जात असे.

हिंदु–राज्याच्या कल्पनेंत व घटनेंत राज्य हें एका विशिष्ट धर्माच्या प्रसाराचें साधन नसून तें सर्व लोकांच्या पालनपोषणाची शासन–संस्था व शासन–विधान आहे. हिंदु राजा हा धर्मगुरु अथवा धर्म-पुरोहित नाहीं. तेव्हां ज्या राज्यामध्यें राजा हाच धर्मगुरु होतो व धर्मगुरु हाच राजा होतो त्यालाच 'देवशाही' (Theocracy) म्हणतात.

## हिंदु–राज्यशास्त्र अर्थशास्त्राचाच एक भाग

हिंदूंच्या 'सप्तांगराज्य' या कल्पनेंत वा व्यवस्थेंत विशिष्ट उपासना–संप्रदायाला राज्यमान्यता अथवा राज्यनिगडितता नाहीं. त्या राज्याचे राजा, अमात्य, प्रकृति, सेना, कोश, दुर्ग व मित्र हेच सात घटक धरलेले आहेत. ते सर्व ऐहिक कार्यांच्या व कारभाराच्याच उद्देशानें वर्णिले आहेत.

त्यामध्यें राजा हा विशिष्ट धर्माचा प्रमुख अथवा प्रतिनिधि समजला जात नव्हता. त्याला धर्माचे विधिनिषेध निर्माण करण्याचा अधिकार नव्हता, ते पाळण्याचें व पालन करविण्याचें कर्तव्य त्याच्याकडे असे. तो केवळ दंडधर समजला जात असे. दंड हा त्याच्या अधिकाराचें व कर्तव्याचें प्रतीक आहे. तो दंडनीति–शास्त्राप्रमाणें उपयोगांत आणावयाचा असे. दंड व नीति हीं परस्परावलंबी असून परस्परांच्या साहाय्यानें चालावयाचीं असतात. "दण्डेन नियते चेदं दण्डं नयति वा पुनः" (म. भा.). ह्या दंडनीति–शास्त्रामध्यें सामान्य मानवनीतिधर्म मानलेला आहे, अमुक एकाच उपासना–संप्रदायाचें रक्षण वा प्रभुत्व मानलेलें नाहीं; तसें ईसाई व इस्लामी धर्मराज्यांमध्यें मानलेलें आहे. हिंदूंच्या दंडनीतिशास्त्रामध्यें राज्याच्या स्थैर्याला, योगक्षेमाला आणि निग्रहानुग्रहसंग्रह–कार्याला जो विनय, जी नीति वा जो सामान्य धर्म लागतो तेवढाच वर्णिला आहे.

हिंदू राजाला धर्मगुरूंचा आशीर्वाद, पुरोहितांचा कर्मोपदेश व पंडितांचा ज्ञानोपदेश, यांचें महत्त्व वाटत असलें तरी ह्या गोष्टी राज्यव्यवहारामध्यें आदेश-रूप नव्हत्या. हिंदू राजे त्यांना मान देत असत व तेहि राजाधिकाराची प्रतिष्ठा राखीत असत. राजांनीं धर्मसत्ता पत्करली नाहीं वा काबीज केली नाहीं व धर्मगुरूंनीहि राजसत्ता घेतली नाहीं वा आक्रमिली नाहीं. खरें पाहिलें असतां हिंदूंचें राजनीतिशास्त्र हें अर्थशास्त्रामध्यें मोडतें. त्याच्या मागें धर्मशास्त्राचा आधार अथवा अधिष्ठान असलें तरी तें धर्मशास्त्र नव्हे, असें शुक्र व बृहस्पति हे राजनीतिशास्त्राचे प्रणेतेच सांगतात. धर्मशास्त्रामध्यें लवचीकपणा नाहीं, अर्थशास्त्रामध्यें तो आहे.

हिंदूंच्या राजनीतिमध्यें पंडित–पुरोहित–वर्गाचें (Priest-hood) आधिपत्य नाहीं. धर्म हा सर्व संसाराला वा समाजाला लागू आहे; पण तो संसार वा समाज हा अनेक गट अथवा समूह यांच्या रूपानें नांदणारा आहे, एकत्वानें नांदणारा नाहीं. त्या गटांचे व समूहांचे जातिधर्म व जानपदधर्म आहेत. राज्यसत्ता ही त्यांचें केवळ पालनपोषण करण्याचें कर्तव्य बजावते. त्यांच्या धर्मांमध्यें बदल करण्याचें कार्य तिचें नाहीं. राजनीति हें मुख्यतः व्यवहारशास्त्र आहे, आचार–शास्त्र नव्हे. हिंदूंनीं राजनीति हीं नीतिशास्त्राची मुख्य शाखा धरली असल्याकारणानें तीमध्यें लोकांचे परस्पर–संबंध व व्यवहार कसे पाळले जातील आणि ते आपली सामूहिक व सामाजिक कर्तव्यें कशीं पार पाडतील, यांचाच विचार वा निर्णय आहे. तें घडवून आणणें हाच राज्याचा मुख्य उद्देश आहे. लोकांच्या सुखितेकरतां, त्यांच्या सर्वांगीण हितासाठीं व त्यांच्या पुरुषार्थांच्या सिद्धीसाठीं लोकांकडून त्यांचें पालन करून घेणें हेंच राज्यसत्तेचें मुख्य कार्य आहे. त्यालाच लौकिक (Secular) राज्याची कल्पना म्हणतात; ती धर्म–निगडित राज्याची नव्हे. जी राज्यसत्ता समूहांच्या धर्मांमध्यें हात घालीत नाहीं, पण त्यांना त्यांचें पालन करावयास मात्र लावते, ती लौकिक राज्यसत्ता होय.

हिंदूंच्या राजनीतिशास्त्राप्रमाणें राजा हा राज–कुलांत जन्मला म्हणून तो राजा नव्हे, तसाच तो








देवप्रतिनिधीहि नव्हे. त्याच्या अंगीं राजत्वाचे दैवी गुण पाहिजेत. राजाला विशिष्ट कार्य व त्यासाठीं घालून दिलेले नियम असतात. ते त्याला पाळले पाहिजेत. ते पाळण्यास व आपलें कार्य व कर्तव्य सिद्धीस नेण्यास त्याच्यामध्यें कार्यक्षमता, योग्यता पाहिजे. त्याचें करग्रहण हें प्रजापालनाचें वेतन आहे. आसुरी राजे उन्मत्त श्वानांप्रमाणें हन्तव्य आहेत. ते पापी असून प्रजाकोपाला पात्र आहेत. त्यांनीं आपल्या स्थानाच्या सीमा व अधिकाराच्या मर्यादा पाळल्या पाहिजेत. त्यांनीं प्रजेच्या धर्मांचें, अधिकारांचें व कर्तव्यांचें रक्षण केलें पाहिजे.

हिंदू लोक सगळ्या मानवी जीवनाचें व व्यवहारांचें नियंत्रण करणारा अथवा त्यांची व्यवस्था लावणारा सर्वसाधारण असा एकच उपासनाधर्म वा एकच धर्मसंघ मानीत नाहींत आणि त्याची निष्ठा व सत्ता इतरांवर बलात्कारानें लादीतहि नाहींत; म्हणून राज्याचें काम धर्मप्रसाराचें आहे, असेंहि ते मानीत नाहींत. राज्य हें मानवी जीवनाच्या सुस्थितीला व समाजाच्या संस्कृतीच्या रक्षणाला लागणारें एक आवश्यक साधन आहे असें ते समजतात. ईसाई व समाजवादी तत्त्वज्ञांप्रमाणें ते त्याला नैमित्तिक, निंद्य वा त्याज्य समजत नाहींत. उलट ते राज्य ही एक नित्य लागणारी व आवश्यक असणारी गोष्ट समजतात. धर्मसत्तेला राजसत्तेची आवश्यकता आहे असें ते मानतात; तसेंच राजसत्तेला नीतीचा व धर्माचा आधार पाहिजे असें ते समजतात. संपूर्ण मानवी जीवनाची नीति, त्याचा आचार व व्यवहार ठरविण्यास धर्मनीति व राजनीति यांची आवश्यकता आहे असें ते प्रतिपादितात. त्यांच्या मतें नीति-धर्मांवांचून राज्य चालणें शक्य नाहीं, आणि राज्यावांचून नीतिधर्म टिकणें संभवत नाहीं. त्यांच्या दृष्टीनें नीतितत्त्वांची राजकारणाला आवश्यकता असे, पण विशिष्टधर्मोपासना त्याचें अंग नसे. धर्माच्या उच्च नीतितत्त्वांचा उपयोग राज्याला स्थैर्य, सुस्थिति व सुनीति देण्यांत होत असे.

हिंदुराज्यकल्पनेंत नीतितत्त्वांचा राजकारणाशीं व राजसत्तेशीं घनिष्ठ संबंध आहे, पण विशिष्ट उपासना अथवा संप्रदाय यांचा मात्र नाहीं. धर्माचा अथवा नीतीचा उपयोग राज्याला उच्च मानवी नीतितत्त्वांचा आधार व त्यांचें अधिष्ठान देण्याकरितां आहे; विशिष्ट उपासना-मार्ग शिकविण्याकरितां नाहीं. त्याचा उपयोग सामाजिक अधिकारकर्तव्यांची जाणीव, राज्यसंस्थेची कार्यक्षमता, राज्यव्यवहाराची शुद्धता, अर्थनीतीची व दंडनीतीची यथार्थता राखण्यांत होतो. पण राज्य ही मुख्यतः पालन-पोषणात्मक प्रपंच-संस्था आहे व ती ऐहिक व्यवहार चालविण्याकरितां आहे. प्रजेनें आपापले स्वधर्म, वर्णाश्रमधर्म, साधारण धर्म, देशधर्म, जातिधर्म, कुलधर्म व इतर समूहधर्म पाळावे व राजानें ते पाळण्यास त्यांना साहाय्य करावें, असा धर्मशास्त्राचा व राज्यशास्त्राचा आदेश व उपदेश आहे.

## हिंदु-समाजव्यवस्थेचें वैशिष्ट्य

हिंदूंचें राज्य म्हणजे ब्राह्मणांचें अथवा ब्राह्मण-जातीचें राज्य नव्हे. राज्य सर्वांकरतां असून राज्य-सत्ता क्षत्रियांनीं चालविलेली असे. कारण, लोकरक्ष-णाचें काम मुख्यतः क्षत्रियांचेंच असे. हिंदूंच्या सामाजिक तत्त्वज्ञानानें सामाजिक कार्यांची वांटणी वा सामाजिक सत्तेचें वितरण निरनिराळ्या वर्णांमध्यें केलेलें आहे. हिंदुसमाजव्यवस्थेचें मुख्य लक्षण समा-जाच्या भिन्न वर्गांमध्यें सामाजिक बलाचा तोल राखणें हें होय. सर्व बल एकाच वर्णाच्या, वर्गाच्या, संस्थेच्या, जातीच्या, कुलाच्या अथवा व्यक्तीच्या हातीं नसावें, अशी त्याची योजना असे. त्यायोगें समा-जांत कोणीच डोईजड सर्वाधिकारी होऊं शकत नसे. ब्राह्मणांनीं धर्मबल वा विद्याबल संपादावें, क्षत्रियांनीं राज्यबल वा बाहुबल राखावें, वैश्यांनीं अर्थबल वा व्यवसायबल वाढवावें, शूद्रांनीं शिल्पबल वा श्रमबल योजावें. प्रत्येक बलाची व कार्याची समाजाच्या संघटित जीवनाला आवश्यकता आहे. निरनिराळ्या वर्गांनीं आपापलें सामर्थ्य व आपापली कार्यक्षमता वाढवून व परस्परांना साहाय्य करून लोकांची सुस्थिति साधावी व त्यांचें हित करावें आणि राजानें आपल्या शक्तियुक्तींनीं व नियंत्रणकुशलतेनें त्यांना योग्य मार्गावर ठेवावें अशी हिंदू शास्त्रकाराची योजना आहे. सामाजिक बलाची—विशेषतः धर्मबलाची, राजबलाची व अर्थबलाची—अशी वांटणी केल्यामुळें हिंदुराज्यांत देवशाही उत्पन्न होत नाहीं. देवशाहीमध्यें राजबलाचें व धर्मबलाचें

मिश्रण तसेंच केंद्रिकरण होत असतें, विशिष्ट धर्म–संप्रदायाला चढतें वाढतें महत्त्व असतें व राज्य हें त्या संप्रदायाचें होतें.

ज्ञान, कर्म, भक्ति, यज्ञ व उपासना अशा बाबतींत हिंदूंनीं एकाच पंथाचें अथवा संघाचें, एकाच गुरूचें अथवा आचार्याचें मत स्वीकारलें नाहीं, त्याचा मार्ग पत्करला नाहीं. एकच मत व एकच मार्ग प्रस्थापित करणें वा आज्ञापित करणें, हें त्यांचें ध्येय वा कार्य नव्हतें. राजा अशा बाबतींत हात घालीत नसे. धर्माधिकारी सुद्धां संघटित रीतीनें राज्यकारभारांत ढवळाढवळ करीत नसत. त्यामुळें राज्यसंस्थेला धर्मसत्तेचें स्वरूप आलें नाहीं आणि धर्मसंस्थेनें राज्यसत्तेचें स्वरूप घेतलें नाहीं. राज्यारोहण–प्रसंगीं कांहीं धार्मिक विधी केले जात, त्याचप्रमाणें राज्यारिष्टें टाळण्यासाठीं कांहीं शांतिकर्मेंहि केलीं जात; पण त्यांचा उद्देश राज्यावर मालकी सांगण्याचा नसे. पोपस्वरूपी, खलीफास्वरूपी अथवा लामास्वरूपी राजसत्ता–धर्मसत्ता, संयुक्त अधिकारी व देवाचे खास प्रतिनिधी हिंदूंच्या धार्मिक तत्त्वज्ञानांत व राजनैतिक विचारप्रणालींत नाहींत. रोमन कॅथॉलिक पोपांप्रमाणें आमच्या धर्मगुरूंनीं व धर्माचार्यांनीं दोन्ही सत्तांचा ( ब्रह्म व क्षत्र किंवा धर्म व राज्य यांचा ) अधिकार आपल्याकडे घेतला नाहीं वा मागितला नाहीं. इस्लामी खलीफांप्रमाणें त्यांनीं दोहोंचा ( इमामत व सुलतानत यांचा ) अधिकार चालविला नाहीं. हिंदूंची कोणतीहि धर्मसंस्था रोमन चर्चच्या ( धर्ममंडळाच्या ) तोडीची झाली नाहीं, त्यांचे कोणतेहि धर्माधिकारी पोपांच्या इतक्या प्रभुत्वाचे वा खलीफांच्या इतक्या मानाचे अधिकारी झाले नाहींत. त्यांच्या हातीं राजसत्ता प्रत्यक्षपणें कधीं आली नाहीं व ती त्यांनीं कधीं मागितलीहि नाहीं. पोप–खलीफांप्रमाणें त्यांनीं स्वतःचीं राज्यें व इतरांचीं सामंत–राज्यें उत्पन्न केलीं नाहींत.

ब्राह्मण लोकांचें महत्त्व त्यांच्या जातीमुळें नव्हे तर त्यांच्या ज्ञानामुळें व विद्येमुळें, राज्यकारभारांत मंत्री म्हणून, न्यायमंडळांत धर्मज्ञ म्हणून व शिक्षणांत शास्त्रज्ञ म्हणून, वाढलें होतें. पण राज्य ब्राह्मणांचें, ब्राह्मणांकरितां व ब्राह्मणांनींच चालविलेलें मात्र कधींच नव्हतें. विद्वान् म्हणूनच त्यांना मान होता. ब्राह्मणेतर विद्वानांनाहि मान होताच, मग ते यवन कां असेनात.

म्लेच्छा हि यवनास्तेषु
सम्यक् शास्त्रमिदं स्थितम् ।
ऋषिवत्तेऽपि पूज्यन्ते
किं पुनर्दैवविद् द्विजः । (गर्ग)

त्यांना आपले वर्ण, वर्ग व आश्रम–धर्म पाळावेच लागत व तें पाहण्याचें काम राजाला करावें लागे. धर्मज्ञ व धर्माधिकारी म्हणून त्यांनीं राज्यसत्ता बळकाविली नाहीं; त्यांनीं राज्यसत्तेचें क्षेत्र व धर्मसत्तेचें क्षेत्र हीं भिन्न पण समान मानलीं, स्वतंत्र पण परस्परावलंबी मानलीं.

राजानें सुध्दां आपल्या राजनीतिधर्माप्रमाणें चाललें पाहिजे असा कटाक्ष असे. तो तसा चालत नसला आणि राजनियमांचें उल्लंघन करीत असला, तर त्याला काढून टाकण्याचा अधिकार धर्मज्ञ व प्रजाजन म्हणून त्यांचा असे. प्रत्येक सत्तेचा धर्म व तिच्या मर्यादा हीं बांधलेलीं असत. त्यांच्याप्रमाणें त्या सत्तेला चालावें लागे. तो धर्म व त्या मर्यादा मोडल्यास त्याबद्दल शिक्षा करण्याचा अधिकार दंडनीतिप्रमाणें राजाला असे.

हिंदुस्थानांत ब्राह्मण ही संस्था चर्चच्या (धर्मसंघाच्या) रूपानें नव्हती; तिनेंच धर्माचा ठेका घेतला नव्हता. श्रमण लोक, पाखंडी लोक व यवन लोक नवे पंथ व नवे समाज स्थापीत असत, पण त्यांचा छळ ब्राह्मणवर्ग करीत नसे; इतर पंथांना तो वावरूं देत असे. ब्राह्मणांचा धर्मविजय वादविवादरूपानें व खंडन-मंडन–पद्धतीनें होत असे. त्यांनीं आपली प्रतिष्ठा आपल्या विद्वत्तेनें व नैतिक जीवनानें संभाळिली. त्याकरतां त्यांनीं राजसत्तेचा उपयोग केला नाहीं. त्यांनीं प्रतिपादिलेलीं शास्त्रें हीं प्रायः समाजशास्त्र व तत्त्वज्ञान यांच्या स्वरूपांत आहेत; तीं उपासना-धर्मांच्या रूपानें नाहींत. हिंदू लोक आपल्या धर्म-स्मृती सर्व लोकांच्या स्मृती असें प्रतिपादीत नाहींत. पाखंडी, नास्तिक, यवन, म्लेंच्छ, व्रात्य इत्यादि लोकांच्या स्मृती वेगळ्या आहेत असें ते मानतात. त्यांच्या सांप्रदायिक धर्मांना व रूढींना ते ओळखतात. त्यांच्या दृष्टीनें राज्य, त्याची रचना, त्याचे नियम व त्याचीं कार्यें हे प्रश्न अर्थशास्त्राचें मुख्य क्षेत्र






समजले जावे, धर्मशास्त्राचें क्षेत्र मानले जाऊं नयेत. धर्मशास्त्रामध्यें तो विषय गौणरूपानें व अनुषंगानें येतो. हिंदूंच्या मतें मानवी जीवनाचीं अनेक अंगें एकमेकांशीं संबद्ध असून तीं समग्रतेनें, समन्वयानें व तरतम दृष्टीनें पाहावीं लागतात. या पद्धतीला अनुसरून त्यांचें प्रत्येक शास्त्र ऐहिक व पारमार्थिक जीवनांची सांगड घालून विचार करतें; कारण, त्यांचा उद्देश सर्व मानवी जीवनाचा अर्थ समग्रतेनें समजून घेणें हा आहे.

---

## राजाजी

गेलीं २८ वर्षें राजाजींशीं माझा घनिष्ट असा संबंध आलेला आहे. या अवधींत राजकीय दृष्टया त्यांच्या व माझ्यामध्यें मतभेदाचे प्रसंग आले. पुढेंहि ते येणार नाहींत असें नाहीं. आणि व्यक्तींव्यक्तींमध्यें असे मतभेद हे असणारच. एकत्र काम करावयाचें याचा असा अर्थ नव्हे कीं आपलीं मतें अगदीं प्रत्येक बाबतींत जुळलींच पाहिजेत. परंतु विशेष आवश्यक अशी जर कोणती गोष्ट असेल तर ती ही कीं आपलें साध्य आणि त्याचीं साधनें यांमध्यें एक मूलभूत समानता असली पाहिजे, हेतूच्या प्रामाणिकपणाविषयीं परस्परांस विश्वास वाटला पाहिजे. ... मी तरुण असतांना–आतां त्याला बराच काळ लोटला आहे–मी अनेक प्रकारच्या 'वादां'(isms)ना बरेंच महत्त्व देत असे. कारण कोणत्याही 'वादा'च्या मागें कांहीं एक विशिष्ट साध्य, त्याचें विशिष्ट साधन आणि कार्यपद्धति असतात. आतांहि मला ते वाद महत्त्वाचे वाटतात. परंतु आतां जर मला त्यापेक्षांहि अधिक महत्त्वाची कोणती गोष्ट वाटत असेल, तर ती ही कीं एकादी व्यक्ति कोणत्या धर्माची, पंथाची वा विचारसरणीची आहे हें कळून घेण्यापेक्षां ती व्यक्ति किती प्रामाणिक आहे ही गोष्ट प्रामुख्यानें कळली पाहिजे ... राजाजींमध्यें परमावधीचा प्रामाणिकपणा आहे. त्यांची बुद्धि अत्यंत तीक्ष्ण असून अत्यंत भेदक आणि चिकित्सक अशी आहे. त्यांनीं विचारपूर्वक बनविलेल्या आपल्या मतांबद्दल त्यांची श्रद्धा उत्कट असते. ... महात्माजींसारख्या असामान्य व्यक्तींच्या सान्निध्यांत श्रद्धेच्या भरांत आमची चिकित्साबुद्धिहि कित्येक वेळां काम करीत नसे. राजाजींचीही महात्माजींवर निःसीम श्रद्धा होती. परंतु त्यामुळें त्यांनीं आपली चिकित्साबुद्धि कधीं सुप्त होऊं दिली नाहीं.

आणखीही एक राजाजींचा विशेष आहे. आज राजाजींचें स्थान हिंदी संघराज्यांत परमोच्च असें आहे. परंतु आम्हां सर्वांपेक्षां राजाजी पोषाख, आहार व संवयी वगैरे बाबतींत किती साधे आहेत ? अपरिग्रहत्वाबद्दल, साध्या राहणीबद्दल आपल्या मनांत आदरभावना असते. हेंच आपल्या संस्कृतीचें एक वैशिष्ट्य आहे. एका परमोच्च, अत्यंत वैभवशाली स्थानीं—जें स्थान आतांपर्यंत साम्राज्याच्या वैभवाचें, थाटमाटाचें, भपक्याचें आगर म्हणून गणलें गेलें आहे त्या स्थानीं—राजाजींसारखा एक कमालीचा साधा आणि अपरिग्रही वृत्तीचा पुरुष असावा आणि त्यांच्यामुळें तें स्थान अधिकच उन्नत आणि वैभवशाली दिसावें, हा योग आपल्या हिंदुस्थानच्या बदललेल्या परिस्थितींत किती अर्थपूर्ण आहे ?

—पंडित जवाहरलाल नेहरू

मद्रास येथलि भाषणांतून, २४।७।४८

# धर्मराज्य म्हणजे हिंदुराज्य नव्हे

आचार्य शं. द. जावडेकर

प्रा. पुणतांबेकर यांचा "हिंदुराज्यांतील राज्य-सत्ता व धर्मसत्ता : स्थान व संबंध" हा लेख या अंकांत छापण्याचा मुख्य हेतु हिंदी संघराज्यास "हिंदु-राज्य" बनवावें व आपल्या राष्ट्रास "हिंदु-राष्ट्र" बनवावें असा प्रचार करणाऱ्या लोकांचें मत वाचकांपुढें यावें येवढाच आहे. या लेखांत जी विचारसरणि मांडण्यांत आली आहे, तिच्यांत अनेक हेत्वाभास भरलेले आहेत. तथापि महाराष्ट्रांत अनेकांच्या डोक्यांत असे विचार खेळत असतात, या दृष्टीनें त्यांचें खंडन करणें अवश्य आहे.

## खरा हल्ला आधुनिक राष्ट्रवाद्यांवर

लेखाचा प्रारंभ 'समाजपंथी' किंवा 'समाजवादी किंवा 'कम्यूनिस्ट' या संप्रदायानें हिंदुसंस्कृतीवर, हिंदुधर्मावर व हिंदुसमाजावर हल्ला चढविला आहे अशा आरोळीनें केलेला असला तरी, पुढें लेखांत "आजच्या हिंदुस्थानची धारणाशक्ति व प्रेरणाशक्ति हिंदुत्वाची आणि त्याच्या भव्य इतिहासाची, उच्च शीलाची व प्रौढ संकृतीची आहे. ... ती समाजपंथीयांची व नव्या राष्ट्रवाद्यांची नाहीं" असें प्रतिपादिलें आहे. म्हणजे लेखकांचा रोख व रोष जसा समाजपंथीयांवर आहे तसाच तो नव्या राष्ट्रवाद्यांवरहि आहे हें लक्षांत घेतलें पाहिजे. म्हणजे आज जनतेच्या मनांत कम्यूनिस्टांविरुद्ध जो रोष आहे त्याचा फायदा घेऊन समाजवादी व राष्ट्रवादी या दोनहि आधुनिक विचारसरणींवर आघात करण्याचा लेखकांचा उद्देश आहे. या आधुनिक विचारशक्तींना लष्करीवर्गांत स्थान मिळालेलें नाहीं, यावद्दल लेखकांस समाधान वाटत असून ही नवी राष्ट्रवादी वा समाजवादी प्रेरणा घटनापरिषदेंत गोंधळ घालीत आहे यावद्दल लेखकांनीं असमाधान प्रकट केलें आहे. 'त्यांचें नांव फौजांच्या भीषण संग्रामांत कोठेंहि ऐकूं येत नाहीं. देशांतील घटनापरिषदेंत, घटनासमितींत व भाषणसभांत त्यांनीं पुष्कळ गोंधळ घातला आहे.' तात्पर्य, 'देशांतील संग्रामशील फौजांत प्राचीन हिंदुत्वाची प्रेरणा असून त्याच्या घटनापरिषदेंत आधुनिक राष्ट्रवाद किंवा समाजवाद गोंधळ घालीत आहे', अशी लेखकांची मुख्य तक्रार आहे.

वरील दृष्टीनें या लेखाकडे पाहिल्यास लेखकांनीं आधुनिक राष्ट्रवादी, समाजवादी व कम्यूनिस्ट या सर्वांना एकाच दावणींत बांधिलें असून आपलें टीकाशस्त्र चालवून त्या सर्वांची कत्तल करण्यास लेखकमहाशय सरसावलेले आहेत, असें दिसून येईल. विशेषत: देशांतील घटनापरिषदेंत समाजवादी किंवा कम्यूनिस्ट कोणीच नसल्यानें आजचा त्यांचा रोख वा रोष राष्ट्रवाद्यांवरच आहे असें म्हणावें लागतें. मात्र हा हल्ला छुपा किंवा थोडा प्रच्छन्न असून वरकरणीं मात्र तो हल्ला केवळ कम्यूनिस्टांवर असल्याचा देखावा केलेला आहे. हिंदू तेवढे धर्म, अर्थ, काम, मोक्ष या चतुर्विध पुरुषार्थांचे पुरस्कर्ते, पण आधुनिक राष्ट्रवादी व समाजवादी मात्र सारे केवळ 'अर्थ-काम' या पुरुषार्थांचे पूजक, असा आभास लेखकांनीं निर्माण केला आहे. पण तो सर्वथैव अतिशयोक्त आहे.

## धर्मराज्य म्हणजे न्यायराज्य

हिंदूंच्या प्राचीन धर्मग्रंथांत व राज्यविषयक ग्रंथांत जी धर्मराज्याची कल्पना आहे ती सर्वधर्म-साहिष्णु होती हें लेखकांचें मत बरोबर आहे. पण








या " **धर्मराज्या** "च्या प्राचीन ध्येयाला "**हिंदु–राज्य** " असें **नवें नांव** देऊन लेखकांनीं आपली असहिष्णु व अनुदार वृत्ति प्रकट केलेली आहे. " **धर्म** " या शब्दाबद्दल "**हिंदुधर्म**" असा शब्द योजण्यासारखेंच हें भ्रमोत्पादक आहे. उदाहरणार्थ,

परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम्
धर्मसंस्थापनार्थाय सम्भवामि युगे युगे ॥

या श्लोकांत जर " हिंदु–धर्म–संस्थापनार्थाय " असे शब्द घातले तर अर्थात संकुचितपणा येईल व असहिष्णु वृत्ति प्रकट होईल हें उघड आहे. तसेंच महाभारतांत " धर्माय राजा भवति । न कामकरणाय तु ॥" असा श्लोक आहे. याऐवजीं " हिंदु–धर्माय राजा भवति । " असें जर एकाद्यानें म्हटलें तर अर्थाचा अनर्थ होईल. तसाच अनर्थ प्राचीन हिंदूंच्या ग्रंथांतील " धर्मराज्याच्या " ध्येयाला " हिंदुराज्य " असें नांव देण्यानें होत असतो.

" धर्मराज्य " याचें आधुनिक शब्दांत भाषांतर करावयाचें तर "न्यायराज्य" (Rule of Justice) असेंच करावें लागेल. आज हिंदी संघराज्यानें हेंच धर्मराज्याचें प्राचीन ध्येय पुढील शब्दांत घटना–निविष्ट केलेलें असेल. डॉ. आंबेडकर यांच्या कमिटीनें जो घटनाकायद्याचा खर्डा तयार केला आहे, त्याचा प्रारंभ ( Preamble ) पुढीलप्रमाणें आहे:—

" We, the people of India, having solemnly resolved to constitute India into a Sovereign Democratic Republic and to secure to all its citizens justice, social, economic and political,...................... ..............do hereby adopt, enact and give to ourselves this constitution. "

हा प्रारंभिक भाग वाचल्यास आजच्या घटना–परिषदेपुढें आलेल्या मसुद्याचें ध्येय, "न्यायाचें राज्य" म्हणजेच 'धर्मराज्य' या शब्दानें प्राचीन काळीं ज्या ध्येयाचा बोध होत असे तसलें राज्य स्थापन करण्याचें आहे व शिवाय त्याला लोकशाही सार्वभौम स्वरूप द्यावें हें आधुनिक ध्येयहि त्यांत अंतर्भूत झालेलें आहे. त्याला हिंदुराज्य हें नांव देण्यानें मात्र प्राचीन हिंदूंचें व्यापक ध्येय संकुचित बनणार आहे. हल्लींचे हिंदुत्वनिष्ठ लोक संकुचित व असहिष्णु बनल्यामुळेंच ते 'धर्मराज्य' यांतील 'धर्म' हा शब्द गाळून 'हिंदु' हा संकुचित शब्द तेथें योजण्याचा आग्रह धरतात. प्राचीन हिंदूंचें 'धर्मराज्य' व्यापक होतें; घटना–परिषद् त्याला लोकशाहीचें स्वरूप देऊन अधिक व्यापक बनवीत आहे, हाच राष्ट्रवाद्यांचा व समाजवाद्यांचा गोंधळ काय ?

## इस्लामी धर्म–संस्थापकाचें ध्येय

लेखकानें इस्लामी राज्यशास्त्रावर जो असहिष्णुतेचा आरोप केला आहे तोहि तात्त्विक दृष्टीनें एकांगी व अतिशयोक्त आहे. यासंबंधीं पुढील उतारा वाचकांस सादर करतां येईल:—

" After his expulsion from Mecca, when the prophet was firmly seated at Medina, he publicly declared that the Muslims and non-Muslims should form one nation ( " Umviat " ). He took the Jews, the Christians, Sabines and other communities into the commonwealth, he established and aimed at national unity and not at racial and sectarian uniformity. According to him the test of nationhood is not the possession of the same religion but of community of interests and national sentiment."( " Theory of Sovereignty in Islam, " by Wahed Hussain, P. 104. ) §

वरील उतारा वाचल्यास सर्व धर्मांच्या लोकांना समतेनें वागवून एकराष्ट्रीयत्व निर्माण करण्याचें ध्येय महंमद पैगंबरानेंहि उपदेशिलेलें आहे असें मानण्यास आधार सांपडतो, हें दिसून येईल. अर्थात् हें ध्येय मान्य करूनच आजच्या घटना–परिषदेचें कार्य चाललें असल्यानें खऱ्या हिंदुत्वनिष्ठांस व इस्लामनिष्ठांस त्यांत कांहीं गोंधळ होत आहे असें मानण्याचें कारणच नाहीं.

## द्व्यर्थी शब्दयोजनेनें घोंटाळा माजतो

हिंदुधर्म सहिष्णु व उदार आहे असें म्हणणारांनीं " हिंदुस्थान " हा हिंदूंचा की हिंदेतरांचा, असा वाद उपस्थित करण्याचें काय कारण आहे ? तो

---

§ Pakistan Examined, P. 77.








## धर्मराज्य म्हणजे हिंदुराज्य नव्हे

सर्व धर्मांतील उदार व सहिष्णु लोकांचा व या देशास मातृभूमि मानणारांचा आहे असें आमच्या राज्यघटनेंत नमूद होणार आहे व तेंच इष्ट आहे. तो हिंदूंचा आहे असें आग्रहपूर्वक प्रथम प्रतिपादावयाचें व मग " हिंदू " ही केवळ भौगोलिक संज्ञा आहे, म्हणजे तिनें या देशांत राहणाऱ्या सर्वधर्मीयांचा निर्देश होतो असें म्हणावयाचें, हें प्रा. पुणतांबेकर यांचें तर्कशास्त्र अजब वाटतें ! याला पुरावा म्हणून ते देतात कीं, अमेरिकेंत हिंदी मुसलमानांना सुद्धां हिंदूच म्हणतात ! पण हिंदुस्थानांत कोणीहि असा अर्थ समजत नाहीं. हा पुरावा अमेरिकनांचें अज्ञान सिद्ध करण्यास पुरेसा नाहीं काय:? हिंदुस्थानांतील पुष्कळ लोक आयरिश लोकांना इंग्रज म्हणतात. यावरून कांहीं इंग्रज व आयरिश हा भेद खोटा ठरत नाहीं. बरें, हिंदू या संज्ञेनें जर या देशांत राहणाऱ्या सर्वधर्मीयांचा स्पष्ट निर्देश होत असेल, तर हा देश हिंदूंचा कीं हिंदेतरांचा या प्रश्नाला कांहीं अर्थ उरतो काय? हा देश परस्थांचा नाहीं, या देशांतल्या सर्व नागरिकांचाच तो आहे, हें सत्य सांगण्यासाठीं तो हिंदूंचा आहे असा द्व्यर्थी शब्द योजिल्यामुळें घोंटाळा माजूं नये म्हणूनच घटनापरिषदेनें तसा प्रयोग केला नाहीं.

तात्पर्य, हिंदुत्व–निष्ठ समजतात त्याप्रमाणें आधुनिक राष्ट्रवादी व समाजवादी ज्याला धर्मभेदातीत राज्य ( Secular State ) म्हणतात, त्यांत हिंदूंच्या व मुसलमानांच्या धर्मराज्याच्या प्राचीन कल्पनांतील जो ग्राह्य भाग आजच्या काळास उपयुक्त वाटण्यासारखा आहे तो समाविष्ट होत असतो; त्याशिवाय त्यांत आर्थिक, सामाजिक व राजकीय न्यायसंस्थापनेचीं, लोकशाहीचीं व समाजवादाचीं तत्त्वेंहि अंतर्भूत झालेलीं आहेत. यामुळें हिंदु–संस्कृति किंवा इस्लाम–संस्कृति यांच्यावर त्यामुळें कांहीं आघात होत आहे ही भीति वा ओरड व्यर्थ दिसते. उलट प्राचीन हिंदु-ग्रंथांत " धर्मराज्य " असे शब्द असतांना त्यांतील " धर्म " शब्द काढून 'हिंदु' शब्द घालण्याचा आग्रह धरणें हेंच त्या उदार वृत्तीला व संस्कृतीला मारक आहे.

— —

## जीवनांतील अडचणी नैतिक जीवनाला उपकारक.

अमक्या एका तऱ्हेनें आपल्या विश्वाची रचना असावी असें आपणांस वाटत असतें. आपल्या या अपेक्षेप्रमाणें जर खरोखरच विश्वाची रचना झाली आणि त्यांत जर आपणांस राहावयास मिळालें, तर आपलें जीवन जसें असावयास पाहिजे तसें तें असणार नाहीं. हल्लींचें आपलें जीवन भवितव्यतेच्या गूढतेनें भरलेलें असून, त्यांत अव्यवस्थितपणा, चमत्कारिकपणा किती दिसून येतो ! किती नाना प्रकारचे विघात आणि वैफल्य हीं दिसून येतात ? आपणांस वाटतें जीवन किती घोर अडचणींनीं भरलें आहे ! पण खरोखरीं या अडचणी नाहींत. उलट त्यांचेंच आपल्या जीवनाला मोठें साहाय्य होत असतें. त्यांच्यावरच अपूर्ण मानवाचें नैतिक जीवन प्रामुख्यानें अवलंबून आहे.

—बेजहॉट

# शाकुंतलांतील प्रतीक : मृग

प्रा. म. अ. मेहेंदळे

महाकवि कालिदासाच्या लेखनांत आढळून येणाऱ्या नाट्यगुणांविषयीं व काव्यगुणांविषयीं प्राचीन वा अर्वाचीन, एतद्देशीय वा विदेशीय टीकाकारांत दुमत नाहीं. त्याच्या नाटकांपैकीं अभिज्ञानशाकुंतल हें सर्वानुमतें उत्कृष्ट ठरलें आहे. पाश्चात्य टीकाकारांपैकीं अनेकांनीं हें नाटक तर नुसत्या भाषांतरावरूनच वाचलें असेल; पण तेवढ्यावरूनहि त्या नाटकाची योग्यता ध्यानीं येऊन त्यांनीं त्याची मुक्तकंठानें स्तुति केली आहे ! परंपरेनें कालिदासाला अवगत झालेल्या दुष्यंत–शकुंतलेच्या प्रणयकथेंत कांहीं योग्य ते फेरफार करून त्यानें जी चिरंजीव अशी नाट्यकृति तयार केली तीबद्दल कालिदास सर्वांच्या कौतुकाचा विषय होऊन राहिला आहे.

## शापविस्मृतीमागील खरें रहस्य

हे फेरफार करतांना त्यानें ज्या नवीन गोष्टी नाटकांत आणल्या त्यांपैकीं दुर्वास ऋषींचा शाप व उःशाप या अति महत्त्वाच्या आहेत. ह्या गोष्टींचें नाट्यदृष्ट्या महत्त्व अनेकांनीं वर्णिलें असल्यामुळें त्यांचा येथें पुनः उल्लेख करण्याची आवश्यकता नाहीं. परंपरागत गोष्टींत दुष्यंत हा एक विलासी राजा असल्यासारखा वाटतो; परंतु दुर्वासाच्या शापाचा प्रसंग नाटकांत आणून कालिदासानें दुष्यंताला शकुंतलेच्या बाबतींत तरी निर्दोष ठेवण्याचा प्रयत्न केला आहे. प्राचीन काळीं एकादा राजा मृगयेसाठीं वनांत गेला असतां तेथल्या एकाद्या वनबालेशीं कांहीं काल संबंध ठेवून पुनः आपल्या राजधानीस तसाच एकटा निघून जाणें मुळींच अशक्य नव्हतें आणि राजाच्या अशा वर्तनाबद्दल त्याला कोणीं दोषीहि ठरविलें नसतें. ह्यांपैकीं कांहीं वनबाला राजाशीं संबंध घडल्यामुळें झालेल्या मुलाला घेऊन पुढें राजदरबारीं न्याय मागावयाला जातहि असतील ! अशाच तपोवनांतील कन्यांपैकीं शकुंतला एक होती. महाभारतकालीं जेव्हां ही गोष्ट सांगण्यांत आली तेव्हांच लोक दुष्यंताला त्याच्या ह्या वर्तनाबद्दल सर्वस्वीं निर्दोष मानण्यास तयार नव्हते. तेव्हां त्या वेळच्या कथेकऱ्यानें महाभारतांत वर्णिलेली शकुंतला–त्यागाची सबब पुढें केली, तींत एका आकाशवाणीची भर घातली आणि तेवढ्यानें त्याच्या श्रोत्यांचें समाधान झालें. पण कालिदासाच्या काळीं त्याच्या नाटकाच्या प्रेक्षकांचें समाधान येवढ्यानें होणारें नव्हतें. त्या वेळीं संस्कृतीच्या कल्पना महाभारत–काळापेक्षां अधिक प्रगत असल्यामुळें त्या प्रेक्षकांनीं कालिदासाकडून दुष्यंताला शकुंतलेचें जें विस्मरण झालें त्याबद्दल त्यांना पटेल अशा एकाद्या घटनेची अपेक्षा केली. महाभारतांतील दुष्यंताचें शकुंतलेशीं झालेलें वर्तन मुळींच समर्थनीय वाटत नाहीं. राजाला एकादा धक्का बसून त्याला त्याच्या पूर्वायुष्याचें अजीबात विस्मरण व्हावें अशासारखी ती घटना नव्हती. तो आपल्या पूर्वायुष्यांतील एकच प्रसंग विसरला होता आणि ही गोष्ट मानसशास्त्रदृष्ट्याहि चमत्कारिक असल्यामुळें कालिदासाला दुष्यंताला ह्या प्रसंगांतून निभावून नेण्यासाठीं दैवी चमत्काराचा आश्रय घेण्यावांचून गत्यंतर उरलें नाहीं. दुष्यंत शकुंतलेला तपोवनांत एकटी सोडून राजधानींत निघून गेल्यावर ती साहजिकच राजाच्याच विचारांत निमग्न असते आणि अशा वेळीं आलेल्या अतिथीचें तिच्या हातून योग्य तें स्वागत होत नाहीं. तिच्या हातून चुकून घडलेल्या ह्या गोष्टीबद्दल 'दुष्यंताला तुझें












विस्मरण घडेल ' असा शाप दुर्वास तिला देतो आणि नंतर तिच्या सखीनें केलेल्या प्रार्थनेमुळें 'अभिज्ञानाच्या दर्शनानें शापाचा परिणाम नाहींसा होईल ' असा उःशापहि देऊन ठेवतो व असल्या पुरातन गोष्टींत घडलेल्या दैवी चमत्कारांविषयीं कोणालाच शंका घेण्याचें कारण नसल्यामुळें कालिदासाचा कार्यभाग उत्कृष्टपणें साधतो.

नाटकाच्या दृष्टीनें हें सर्व ठीक झाल. दुष्यंत शकुंतलेला विसरला तो केवळ दुर्वासाच्या शापामुळें, नाहीं तर तो तिला विसरणें शक्यच नव्हतें, असें प्रेक्षकांना वाटणें शक्य आहे. पण कविवर्य टागोरांनीं एके ठिकाणीं म्हटल्याप्रमाणें शाकुंतलांत पांचव्या अंकाच्या सुरुवातीला जें हंसपदिकेचें गाणें आहे त्यावरून दुर्वासाच्या शापानें जी गोष्ट घडवून आणली तिचें खरें बीज माणसाच्या मनोदौर्बल्यांतच आहे हीं गोष्ट उघड होते.

## शकुन्तला आणि ' आश्रममृग ' ह्यांमध्यें सुचविलेलें साम्य

राजाच्या ह्या चंचल प्रेमाची जाणीव कालिदासाला प्रथमपासूनच पूर्णपणें होती असें शाकुंतल नाटक वाचतांना वाटतें. दुर्वासमुनींच्या शापाची हकीकत कथानकांत आणून त्यानें दुष्यंताच्या विस्मृतीचें समर्थन करण्याचा एक शक्य तों चांगला प्रयत्न केला आहे हें खरें; पण तेवढ्यामुळें नाटककार स्वतःच्या मनाचें समाधान करूं शकला असें मात्र होत नाहीं. वस्तुस्थिति काय आहे हें राजाला व प्रेक्षकांना कोणत्या तरी युक्तीनें दाखवून द्यावें असा त्याचा प्रयत्न असणें शक्य आहे. त्यासाठीं नाटक-कार शाकुंतलाच्या थेट पांचव्या अंकापर्यंत थांबणें शक्य नव्हतें. तेथें सुरुवातीलाच हंसपदिकेचें गाणें घालून, दुर्वासाचा शाप नसता तरीहि शकुंतलेची अवस्था कदाचित् पुढेंमागें हंसपदिकेसारखीच झाली असती, असें कांहींएक आगापिछा नसतां एकदम नाटककारानें सुचविलें आहे असें म्हणणें धाष्टर्याचें होईल. नाटकाच्या मध्यापर्यंत नायकाचें पात्र उत्कृष्ट रंगांनीं रंगवून झाल्यावर मग एकदम त्याच्या मनाची वाईट बाजू दाखवून त्या उत्कृष्ट चित्रावर फटकन डाग पाडून ठेवावा हें खऱ्या नाटककाराला शोभण्यासारखें नाहीं. पण ही टीका आपणावर होऊं नये म्हणून कालिदासानें योग्य ती व्यवस्था करून ठेवली आहे. त्यासाठीं नाटकाच्या अगदीं सुरुवातीलाच वैखानसाच्या तोंडीं कालिदासानें जे शब्द घातले आहेत त्यांचा नीट अर्थ आपण समजून घ्यावयाला पाहिजे. 'ह्या आश्रममृगाला मारूं नको ' असें वैखानसाच्या तोंडून वदवितांना 'शकुंतला ही एक आश्रमकन्या आहे, तिला एकादी शहरांतील कन्या समजून तिच्याशीं आज लग्न कर व उद्यां तिला विसरून जा असला प्रकार राजानें करूं नये ' अशी कळकळीची विनंतीच नाटककारानें वैखानसाच्या मुखानें त्याला केली आहे. वैखानसाच्या शब्दांतील हा ध्वनि जर आपण समजून घेतला नाहीं तर नाटकाच्या सुरुवातीच्या ह्या प्रसंगाचें महत्त्व नष्ट होईल.

दुष्यंत राजा एकदां शिकारीच्या निमित्तानें बाहेर पडला असतां एका मृगाचा पाठलाग करीत करीत एका तपोवनाजवळ येऊन ठेपतो. समोर पळणारा मृग त्याच्या बाणाच्या टप्प्यांत आल्यावर तो राजा त्याच्यावर बाण सोडणार इतक्यांत एक वैखानस त्या दोघांच्या मध्यें येऊन उभा राहतो आणि राजाला त्याचा बाण परत भात्यांत टाकण्यास सांगतो. राजाला असें करण्यास सांगतांना वैखानस राजाच्या नजरेस ही गोष्ट आणून देतो कीं, हा पुढें पळणारा मृग तपोवनांतील असल्यानें राजानें त्याचा वध करूं नये. येवढें म्हणून झाल्यावर लगेच तो वैखानस राजाला हेंहि समजावून देण्याचा प्रयत्न करतो कीं तसेंच पाहिलें तर राजानें कोणत्याहि मृगाचा वध करूं नये. कारण, कोठें मृगाचें मृदु शरीर आणि कोठें राजाचे वज्रासारखे कठोर बाण ! तेव्हां पुष्पराशि आणि अग्नि यांच्यासारखा या दोहोंतला फरक लक्षांत घेऊन राजानें खरें म्हणजे कोठल्याहि मृगावर बाण सोडण्यासारखें घोर कृत्य करूं नये. पण राजाला असें सांगण्यापूर्वी वैखानसानें प्रथम 'ह्या आश्रमांतील मृगावर बाण सोडूं नको ' असें बजावून तो **आश्रमीय** मृग होता हें राजाच्या ठळकपणें निदर्शनास आणलें आहे. तसेंच पाहिलें तर वैखानसाच्या दृष्टीनें आश्रममृग आणि अरण्यमृग ह्यांत असा भेद करण्याची आवश्यकता कोठें होती ? त्याला तर सर्वच मृग सारखे ! आश्रमांतील मृगांविषयीं दयाबुद्धि दाखविणें हा जितका त्याचा










धर्म होता तितकाच कोठल्याहि अरण्यांतील मृगांबद्दल दयाबुद्धि दाखविणें हाहि होता आणि वैखानसानें आपला तो धर्म नीट पाळलाहि आहे. त्या दोन प्रकारच्या मृगांत त्यानें जो भेद केला आहे तो त्याच्या स्वतःच्या दृष्टीनें नव्हे, तर राजाच्या दृष्टीनें. राजाला मृगयेची चटक असते हें वैखानसाला ठाऊक होतें. तेव्हां त्याला असें वाटलें असावें कीं आपण जर राजाला आश्रमांतील पावित्र्याची जाणीव करून दिली तर कदाचित् त्या मृगाचा जीव वांचेल. वैखानसानें ह्या आश्रममृगाला वांचविण्यासाठीं मृगांचे दोन भाग पाडून राजाला जी निरनिराळी विनंति केली तिचें मर्म नीट लक्षांत घेतलें कीं नाटककारानें ह्या नाटकाचा जो मुख्य कथाभाग त्याला अनुलक्षून राजाला केलेली गर्भित सूचना पूर्णपणें उघड होते. वैखानसाच्या तोंडून आश्रममृग हा शब्द बाहेर पडतांच आपणांस आश्रमवासी शकुंतलेची आठवण होतेच आणि ती झाली कीं तसें करतांना नाटककाराला काय सुचवावयाचें आहे हें पण आपल्या लक्षांत येतें. ही सूचना अशी असते कीं, राजानें आश्रमांत वाढलेली शकुंतला आणि इतर शहरांत वाढलेल्या मुली ह्यांतला फरक नीट लक्षांत घ्यावा. त्या काळच्या पद्धतीस अनुसरून त्या घटकेपर्यंत राजानें किती तरी मुलींवर प्रेम करून पण नंतर त्यांना विसरून जाऊन त्यांना मरणप्राय दुःख दिलें असेल ! पण तीच स्वच्छंदी वृत्ति राजानें आश्रमांत वाढलेल्या अतएव जगरहाटीपासून वेगळ्या असलेल्या शकुंतलेच्या बाबतींत दाखवूं नये, तिच्यावर आज प्रेम करून आणि मग तिला विसरून जाऊन तिला एक प्रकारें 'मारण्याचें' साहस करूं नये. नाटककारानें नाटकाच्या सुरुवातीस योजिलेलें हें मृगाचें प्रतीक लक्षांत घेतलें कीं ह्या सुरुवातीच्याच दृश्यांत सगळ्या नाटकाचें प्रतिबिंब पडलें असल्याचें आपल्या ध्यानांत येतें. राजा अरण्यांत आल्यावर तो मृग कांहीं राजाच्या भेटीस गेला नव्हता, उलट तो राजाच त्याला पाहून त्याच्या मागें लागला होता. नंतर तो मृग राजाकडून अगदीं मारला जाण्याच्या बेतांत होता; पण तेवढ्यांत अगदीं आकस्मिक रीत्या तेथें येऊन ठेपलेल्या वैखानसामुळें तो वांचला ! त्याचप्रमाणें तपोवनांत गेल्यावर राजाच प्रथम शकुंतलेला पाहतो, तिच्यावर प्रेम करूं लागतो, आणि पुढें तिचा त्याग करून तिला मारण्याच्या बेतांत असतो. इतक्यांत एक दैवी चमत्कार अकल्पितपणें घडून येऊन शकुंतला वांचते. ह्या दोन्ही घटनांतील हें साधर्म्य आणि त्यांतून काढलेला ध्वन्यर्थ, अर्थातच आपण 'आश्रममृग' ह्याचा जो अर्थ केला आहे त्यावर आधारलेलीं आहेत. त्यावरून शकुंतला व आश्रममृग ह्यांचें जवळजवळ पूर्ण ऐक्य सूचित होतें. आणि नाटककाराला जर हा पहिल्याच दृश्यांतला गूढार्थ अभिप्रेत असला तर शकुंतला व आश्रममृग यांच्यांतलें अतिसाम्य प्रेक्षकांच्या मनांवर ठसविण्याचा त्यानें अवश्य प्रयत्न केला असला पाहिजे. शाकुंतल नाटक वाचीत असतां कालिदासानें असा प्रयत्न केला असल्याचें आपल्या प्रत्ययास जरूर येतें.

## मृग—प्रतीकामागील कालिदासाचा हेतु

नाटकांत ठिकठिकाणीं शकुंतलेचें वर्णन करतांना कालिदासानें तिची तुलना निसर्गांतील विविध वस्तूंशीं तर केलीच आहे; पण शकुंतलेचें मृगाशीं असलेलें साम्य दाखविण्याची कालिदासाला विशेष आवड होती असें वाटतें व तीहि इतकी कीं हें नुसतें साम्य दर्शवूनच त्याचें समाधान होत नाहीं, तर कित्येक ठिकाणीं कांहीं घटनांचें वर्णन करतांना त्याची मजल त्या दोघांत पूर्णपणें ऐक्य दर्शविण्यापर्यंत गेली आहे. ह्यासाठीं सुरुवातीला कांहीं उदाहरणें द्यावयाचीं झाल्यास दुसऱ्या अंकांतील कांहीं श्लोकांचीं देतां येतील. त्यांतील अठराव्या श्लोकांत शकुंतला ही आश्रमांतील मयूरांच्या संगतींत लहानाची मोठी झाल्याचें वर्णिलें आहे. त्याच अंकांतील तिसऱ्या श्लोकांत राजा म्हणतो कीं आपणाला शकुंतलेला पाहिल्यापासून मृगया करावीसें वाटेनासें झालें आहे. कारण, त्यांचे चंचल नयन जेव्हां त्याच्या दृष्टीस पडतात तेव्हां त्यांनींच जणूं शकुंतलेला मुग्ध कटाक्ष टाकण्याचे पाठ दिले असावे असें त्याला वाटतें. अशा रीतीनें ह्या दोन श्लोकांत शकुंतलेची एकाद्या मृगासारखीच त्यांच्या संगतींत झालेली वाढ व तिचाच दृश्य परिणाम म्हणजे तिनें त्यांच्याकडून घेतलेले पाठ हें मोठ्या चतुराईनें वर्णिलें आहे.








# शाकुंतलांतील प्रतीक : मृग

पण ह्यापेक्षांहि नाटकांतील इतर दोनतीन घटना ह्या मृगप्रतीकाच्या दृष्टीनें अतिशय महत्त्वाच्या आहेत. चवथ्या अंकांत शकुंतला तपोवन सोडून हळूहळू राजधानीकडे जात असलेली आपल्या दृष्टीस पडते. त्या वेळेस ती तात कश्यप व तिच्या सख्या येवढ्यांचाच निरोप घेऊन थांबत नाहीं, तर आश्रमांतील मृग--मयूरांचा व लता–वृक्षांचाहि निरोप घेते. शकुंतला त्या वेळेस गर्भवती असते आणि तिचें मृगांशीं असलेलें साम्य–नव्हे ऐक्य, प्रेक्षकांच्या मनांवर ठसविण्यासाठीं कालिदासानें एका दृश्य घटनेची योजना केली आहे. शकुंतला जात असतांना तेथेंच झोंपडीच्या कडेशीं एक मृगी घोंटाळत असते आणि गंमत अशी कीं तीहि शकुंतलेसारखीच गर्भवती असते. त्या मृगीच्या सुखरूप सुटकेबद्दल शकुंतला स्वतःच्या सुटकेइतकीच सचिंत असते. शकुंतलेचें मृगीशीं असलेलें साम्य दर्शविण्यासाठीं घेतलेल्या येवढ्या एका दृश्यानेंच कालिदासाचें समाधान होत नाहीं; लगेच आणखी एक पाऊल पुढें टाकून तो शकुंतलेचा एक मृगरूपी पुत्रच रंगभूमीवर दाखल करतो ! शकुंतलेचा हा मानलेला पुत्र म्हणजे तिनें ज्याचें लहानपणापासून मातृविहीन स्थितींत पालनपोषण केलेलें असतें असा एक मृग असतो. शकुंतला देखील ह्या तिच्या मानीव मुलासारखीच मातृविहीन स्थितींत आश्रमांत वाढलेली असते. त्या दोघांतील ह्या साम्यामुळेंच कीं काय त्यांना एकमेकांविषयीं खूप प्रेम वाटतें व शकुंतला त्या मृगाची आई बनते. ह्या तिच्या 'मृग–पुत्रा'चा उल्लेख पुनः एकदां पांचव्या अंकांत येतो. तेथें दुष्यंताला शकुंतलेचें विस्मरण पडल्याचें दिसून आल्यावर त्याची स्मृति जागविण्यासाठीं शकुंतला आश्रमांत घडलेल्या पूर्वीच्या एकांतांतील कांहीं घटना त्याला सांगत असते : एकदां दुष्यंत व शकुंतला लतागृहांत बसून गोष्टी करीत असतां तेथें तो मृग आला; दुष्यंत त्या वेळेस हातांतील कमलपत्रांतून पाणी पिण्याच्या बेतांत होता; दुष्यंताला त्याची करुणा येऊन त्यानें त्या पुत्राला तें पाणी पिण्यास दिलें; पण राजाची व त्याची ओळख नसल्यानें तो तें पाणी पिईना. तेव्हां शकुंतलेनें तेंच पाणी स्वतःच्या हातानें पुढें करतांच तो मृग मोठ्या आवडीनें तें पाणी प्याला; राजाला त्या प्रकाराची गंमत वाटून त्यानें विनोद केला कीं सर्वांनाच आपल्या नातेवाइकांविषयीं विश्वास वाटतो. ह्या दोन्ही प्रसंगांमुळें शकुंतलेचें त्या मृगाशीं आईचें नातें असल्यानें एकाद्या आश्रमीय मृगींत व तिच्यांत कांहींच फरक नाहीं हें दाखविण्याचा प्रयत्न कालिदासानें मोठ्या कौशल्यानें केला आहे.

ह्या सर्व घटनांचा नीट विचार करतां असें स्पष्टपणें नजरेस येतें कीं शकुंतला ही सगळ्यांना आश्रमांतल्या मृगासारखीच वाटत असे आणि म्हणून नाटकाच्या सुरुवातीला आणलेल्या प्रसंगांतील मृग–प्रतीक प्रेक्षकांच्या लक्षांत आणून देण्याचा नाटककाराचा हेतु असावा. दुर्वासाचा शाप नसता तरीहि त्यागाची भीति शकुंतलेच्या आयुष्यांत सदैव होतीच. आणि कालिदासालाहि त्याची पूर्ण जाणीव होती. परंतु दुष्यंत हा राजा असल्यामुळें आणि कालिदास हा एक राजकवि असल्यानें राजेलोकांच्या प्रेमांतला पोकळपणा त्याला स्पष्टपणें दाखवितां येत नव्हता. त्यामुळें त्याला ह्या प्रतीकात्मक प्रयोगाचा अवलंब करणें भाग पडलें असावें. एकाद्या मुलीशीं आज प्रेमविवाह करून कालांतरानें तिला विसरून जाण्याची राजाची वृत्ति त्यानें शकुंतलेबावतहि दाखवावी हें कालिदासाला मानवण्यासारखें नव्हतें. शकुंतलेला या आपत्तींतून सोडविण्याची कालिदासाला एकच आशा होती. आणि ती म्हणजे राजाच्या नजरेंत शकुंतला व इतर स्त्रिया ह्यांच्यांतला फार महत्त्वाचा फरक आणून देणें हीच होय. वैखानसानें ज्याप्रमाणें एकंदरींत कोणत्याच मृगाला राजानें मारणें अयोग्य होय असें म्हटलें आहे, त्याचप्रमाणें खरें पाहिलें तर राजानें कोणत्याच स्त्रीच्या बाबतींत लग्नानंतर तिला विसरून जाण्याची अनुदारवृत्ति दाखविणें योग्य नव्हे; पण जर त्या काळच्या परिस्थितीप्रमाणें राजा मधून मधून चैनीसाठीं मृगया करीत असला आणि त्याचप्रमाणें तत्कालीन पद्धतीप्रमाणें एकाहून अनेक स्त्रियांशीं लग्नेंहि करीत असला तरी त्यानें निदान तपोवनांत आल्यावर इतर मृग व आश्रममृग आणि इतर स्त्रिया व शकुंतला ह्यांच्यांतला मूलभूत फरक तरी लक्षांत ठेवावा. आणि त्यांना मारूं नये. ह्यांपैकीं पहिली सूचना वैखानसा-








नें " आश्रममृगोऽयं न हन्तव्यो न हन्तव्यः " असें हात उंच करून राजाला बजावतांना प्रत्यक्ष केली आहे आणि दुसरी सूचना मृगप्रतीकाचा सुंदर उपयोग करून त्याच्या द्वारें कालिदासानें साधली आहे.

### कालिदास अशी संधि कशी दवडील ?

हें सगळें म्हटल्यावर देखील एक गोष्ट सांगावीशी वाटते, ती ही कीं 'आश्रममृग' ह्या वैखानसानें उपयोजिलेल्या शब्दांचा जो प्रतीकात्मक अर्थ येथें दाखविला आहे, तो कांहीं अगदींच उघड उघड दिसत नाहीं. त्या अर्थाच्या समर्थनार्थ वर शकुंतलेचीं जीं वर्णनें, तसेंच नाटकांतले जे प्रसंग उद्धृत केले आहेत ते देखील संस्कृत साहित्यांत कोठल्याहि विशिष्ट प्रयोजनाशिवाय सहजासहजीं सांपडण्यासारखे आहेत. शिवाय ह्या नाटकाचा पूर्वभाग तपोवनांत घडत असल्यानें शकुंतलेचें मृगाशीं दाखविलेलें साम्य वा ऐक्य तेथील वातावरणाशीं सर्वथैव सुसंगत आणि सहज खुलून दिसण्यासारखें आहे. अर्थात्‌च तसें करतांना नाटककाराचा कांहीं विशिष्ट हेतु कदाचित् नसेलहि. शकुंतलेचें मृगाशीं अथवा तिच्या डोळ्यांचें हरिणाच्या डोळ्यांशीं साम्य हा नुसता संस्कृत–काव्य-संकेताचाहि भाग असेल. पण हें जर खरें असेल तर कालिदासानें एक मोठी संधि हाताशीं आली असतां निव्वळ वायां घालविली असेंच म्हणावें लागेल. पण प्रतीक हें केव्हांहि झालें तरी नुसतें सुचवावयाचें असतें, शब्दांनीं स्पष्ट करून दाखवावयाचें नसतें. आणि कालिदासाच्या काव्य–नाट्य–गुणांचा प्रकर्ष त्याच्या प्रभावी सूचकतेंतच आढळतो हें लक्षांत घेतलें तर त्याच्यावर संधि फुकट दवडल्याचा आरोप करणें जरा धाष्टर्याचेंच होईल. तेव्हां एकंदरींत विचार करतां वर विवेचन केलेलें मृग–प्रतीक कालिदासालाहि बहुधा अभिप्रेत असावें असेंच म्हणावेंसें वाटतें.

---

## स्वतःचें उत्कृष्ट व्यंगचित्र !

'आपणांस एकदां स्वतःचेंच एक उत्कृष्ट व्यंगचित्र कसें पाहावयास मिळालें' याबद्दल जॉर्ज बर्नार्ड शॉ यांनीं आपली एक मजेदार आठवण सांगितली आहे. ते एकदां एके ठिकाणीं निमंत्रणावरून भोजनाला गेले. घरच्या यजमानीणबाई पुढें येऊन शॉसाहेबांचें स्वागत करूं लागल्या. त्या स्वागत करीत असतांना शॉसाहेबांना त्यांच्यामागें थोडें पलीकडे आपलें स्वतःचें चित्र असलेलें दिसून आलें. तें स्वतःचें चित्र पाहून शॉसाहेब स्वतःशीं पुटपुटले—" वाः ! हें मात्र आहे हं आपलें हुबेहूब चित्र ! आपली मुलुखावेगळी छबी यांत अगदीं बरोबर साधलेली दिसते आहे ! अर्थात् सत्य कठोर असलें तरी कबूल केलें पाहिजे कीं आपलें इतकें हुबेहूब चित्र आपण कधीं जन्मांत पाहिलें नसेल ! ". शॉनीं पुढें म्हटलें आहे,—" मी मनाशीं असा विचार करीत त्या चित्राजवळ जाऊं लागलों तों आश्चर्य असें कीं, जसजसा त्या चित्राजवळ मी जाऊं लागलों तों प्रत्येक पावालागणीक माझें चित्र अधिकच हुबेहूब उठून दिसूं लागलें ! शेवटीं माझ्या डोक्यांत प्रकाश पडला कीं हा तर आरसाच आहे ! "











# सद्धर्म कोणता ?

[ भारतीयांना परिचित असलेल्या तीन सनातन पंथांचें एकत्र अवलोकन करणें विचारप्रवर्तक व उद्बोधक आहे. ]

— १ —

हें विश्व कोणीं कधिं निर्मियेलें ?
उत्पन्न झालें अथवा स्वतः हें ?
तें गूढ कोणासहि आकळेना,
नाना जनीं चालत तर्क नाना॥

ज्या अंत, आरंभ मुळींच नाहीं,
आकार नाहीं, गुण ज्यास नाहीं,
ज्या वर्णितां वेदहि 'नेति' बोले,
त्या ईश्वरानें जग निर्मियेलें.

त्यालाच ज्ञानी म्हणतात ब्रह्म,
ज्यापासुनी विश्व असे उदेलें.
अन् सांख्य सांगे प्रकृती पुरूष
हीं आदितत्त्वें जग निर्मितात.

वेदान्त बोले, "प्रकृती पुरूष
समर्थ नाहींत तसें कराया,
संयोग त्यांचा घडवून माया
निर्मावया विश्व करी सहाय्या."

वेदान्त सांगे उकलून गूढ,
"जें जें दिसे तें सगळेंच खोटें;
मिथ्या जगत्, एकच सत्य ब्रह्म;
त्या ब्रह्मरूपा भज ईश्वराला."

— २ —

हें विश्व कोणीं कधिं निर्मियेलें ?
उत्पन्न झालें अथवा स्वतः हें ?
तें गूढ कोणासहि आकळेना,
नाना जनीं चालत तर्क नाना.

चार्वाक बोले, "जग हें स्वयंभू.
भूमीवरी वाहत जेथ पाणी,
शेवाळ तेथें उगवे; तसें हें
उत्पन्न होई, विलयास जाई.

"ते वेद थोतांडचि ब्राह्मणांचें.
कर्ता नियंता न कुणी जगाचा.
तें ब्रह्म, आत्मा, परमात्मबोल
सब् झूट! जाणा जग नाशवंत.

"ना देव, ना स्वर्ग, न पापपुण्य,
नाहीं पुनर्जन्म, न कर्मबन्ध.
हा देह चाले तइं सौख्य भोगा,
हा दग्ध होतां सुख सांग कैचें ?

"जा कर्ज काढा, सुख आज भोगा.
होई उद्यां काय ? कशास चिंता ?"
चार्वाक झाले बहु सौख्यवादी,
आहेत, होतील पुढें असंख्य.

— ३ —

हें विश्व कोणीं कधिं निर्मियेलें ?
उत्पन्न झालें अथवा स्वतः हें ?
तें गूढ कोणासहि आकळेना,
नाना जनीं चालत तर्क नाना.

भेटे कुणी पृच्छक गौतमाला,
शंका विचारी, तइं बुद्ध बोले,
"बा! देव आहे अथवा नसे तें
नाहीं मला माहित सांगुं कैसें ?








"हें विश्व हो भिन्न पळापळाला
ज्योती दिव्याची बदले जशी ती.
विश्वावरी चालत कर्मसत्ता,
प्राणी जगीं सर्वहि कर्मबद्ध
जो टाळतो कर्मविपाक त्याला
निर्वाण लाभे, न पुनश्च जन्म.
वा ! देव आहे अथवा नसे ही
पृच्छा नको, आचर कर्मधर्म.

"संसार दुःखें भरला असे हा—
डोळ्यांतुनी आजवरी गळालें
सातां समुद्रांहुनि जास्त पाणी !
तूं दुःख–निर्मूलन–मार्ग जाण."

सद्धर्म सांगे मग बुद्धदेव,
"दारू पिणें, वादन, नृत्य, गान,
शय्या मऊ, भोजनही अकाल,
हीं त्याज्य सारीं; धनलोभ सोडीं,
घेऊं नये तें न दिलें तुला जें,
(अस्तेय याला म्हणतात जाण.)
वा ! ब्रह्मचर्याहि मनें शरीरें
पाळींच मानीं परनार माता।

"सत्यासि मानीं, वद सत्य वाणी,
पाळीं अहिंसा जननी दयेची,
शांती, दया, प्रेम मनीं धरोनी
जा वेंच आयुष्य परोपकारें."

—भि. अ. परब.

---

## कलावंताचें रहस्य

चीनमधील सर्वश्रेष्ठ सुतार चिंग हा लांकूड कापून त्याचा वाद्यें ठेवण्याकरितां एक स्टँड बनवीत होता. स्टँड तयार झाल्यावर तो जेव्हां लोकांनीं पाहिला तेव्हां त्यांतील अप्रतिम कारागिरी बघून ते आश्चर्यानें थक्कच झाले ! हा स्टँड तयार करणारा कारागीर निःसंशय देवकोटींतीलच असावा, असें त्यांना वाटलें. त्या स्टँडच्या सौंदर्यानें आश्चर्यचकित झालेया 'लू'च्या राजपुत्रानें चिंगला विचारलें, "तुझ्या कलेमध्यें येवढी काय जादू आहे रे ?"

चिंगनें उत्तर दिलें, "महाराज, त्यांत जादूबिदू कांहीं नाहीं, पण एक गोष्ट मात्र आहे. जेव्हां मला असा स्टँड बनवावयाचा असतो, तेव्हां माझी शक्ति दुसऱ्या कोणत्याहि कामांत खर्च होऊन कमी होऊं नये याची मी खबरदारी घेतों. पहिल्या प्रथम मी माझें मन अगदीं निश्चिंत, शान्त करतों. अशा अवस्थेंत तीन दिवस गेले म्हणजे 'ह्या कामापासून आपल्याला कांहीं बक्षीस मिळावयाचें आहे,' याचाहि मला संपूर्णपणें विसर पडतो. अशा स्थितींत पांच दिवस जातात. नंतर 'ह्यापासून आपल्याला पुढें कांहीं कीर्ति मिळावयाची आहे' हा देखील विचार माझ्या मनांतून मी काढून टाकतों. असे सात दिवस जातात. मग 'मला हातपाय आहेत, शरीर आहे,' याचें देखील भान राहत नाहीं. मग राजा किंवा राजाचा दरबार याचें अस्तित्वहि मी विसरून जातों. माझ्या सर्व शक्ती, तसेंच माझें सर्व कौशल्य एकवटतें, कोणत्याहि बाह्य गोष्टींनीं माझा चित्तविक्षेप होत नाहीं. अशा समाधींत मी पर्वताच्या पायथ्याशीं असलेल्या अरण्यांत शिरतों आणि योग्य असें झाड शोधून काढतों. मला जो आकार पाहिजे असतो त्याच आकाराचें झाड मला सांपडतें. माझ्या मनश्चक्षूसमोर करावयाचा स्टँड उभा राहतो. लगेच मी कामाला सुरुवात करतों—येवढ्या विशिष्ट गोष्टींशिवाय माझ्याजवळ दुसरें खरोखरीं कांहीं नाहीं. माझ्या नैसर्गिक शक्ती त्याचप्रमाणें अरण्याचें सामर्थ्य या दोन्हींमध्यें सुसंवाद किंवा एकतानता मी निर्माण करूं शकतों. माझ्या कृतींत जें दिव्यत्व दिसून येत असेल, त्याला कारण हेंच."

—च्यूअँग त्सू



अनुक्रमणिका








# आर्यांची विवाहसंस्था

डॉ. के. ल. दप्तरी

मागील लेखांत फार प्राचीन काळचें आर्यांच्या विवाह–संस्थेचें मुख्य स्वरूप वर्णन केलें. त्या स्वरूपांत कोणता बदल झाला व तो कोणत्या कारणानें झाला हें आतां दाखवावयाचें आहे.

पूर्वी एकाच गोत्रांतील स्त्रीपुरुषांना त्यांमध्यें चार पिढ्यांचें अंतर असल्यास विवाह करतां येत असत. पण पुढें एकाच प्रवराच्या व अर्थात् एकाच गोत्राच्या स्त्री–पुरुषांस विवाह करण्याची मनाई झाली; सपिंड शब्दाची व्याख्या बदलून सापिंड्य–संबंध सात पिढ्यांपर्यंत मानण्यांत येऊं लागला. आणि अशा सपिंडांना विवाह करण्याची मनाई झाली. ह्यालाच Sept-Exogamy आणि सपिंड Exogamy असें म्हणतात. मागील लेखांत जें वर्णन केलें आहे, त्यावरून हे सध्यां चालू असलेले प्रतिबंध पूर्वकाळीं नव्हते, हें अगदीं उघड आहे. ह्यासंबंधीं श्री. करंदीकर ह्यांनीं लिहिलेला Hindu Exogamy हा ग्रंथ वाचनीय आहे. त्यांनींहि प्रतिबंध मागाहून उत्पन्न झाले हें आपल्या ग्रंथांत उत्तम रीतीनें दाखविलें आहे. म्हणून त्यासंबंधीं येथें विचार करण्याची गरज मला दिसत नाहीं. हे प्रतिबंध कां व कसे उत्पन्न झाले ह्याचाच विचार मी ह्या लेखांत करणार आहें.

## सगोत्रविवाह–प्रतिबंधाची उपपत्ति

ह्या प्रतिबंधाची उपपत्ति अनेकांनीं अनेक तऱ्हांनीं लावण्याचा प्रयत्न केला आहे; परंतु ते सर्व प्रयत्न समाधानकारक नाहींत असेंहि श्री. करंदीकरांनीं आपल्या ग्रंथांत दाखविलें आहे; आणि त्यांनीं स्वतःचीहि एक उपपत्ति दिली आहे. ती उपपत्ति अशी कीं हिंदुस्थानच्या मूळच्या रहिवाशां-( Aboriginals ) मध्यें जे असे प्रतिबंध चालू होते, तेच आर्यांनीं आपण त्या मूळच्या रहिवाशांपेक्षां नीतीनें वरचढ आहों असें दाखविण्याकरतां आणि त्यांच्यावर नैतिक विजय मिळविण्याकरितां आपणांत चालू केले. परंतु ही श्री. करंदीकरांची उपपत्ति मला ग्राह्य वाटत नाहीं. त्याचें कारण असें : शतपथ ब्राह्मणामध्यें हे प्रतिबंध नाहींत हें मागील लेखांत आपण पाहिलेंच आहे. शतपथ ब्राह्मण हें पांडवांचा नातू जनमेजय ह्याच्या कारकीर्दींत इसवी सनापूर्वी ११५० च्या सुमारास रचलें गेलें. हे प्रतिबंध अर्थात्च त्या काळानंतर उत्पन्न झाले; आणि त्या काळापर्यंत आर्यांनीं निदान उत्तर हिंदुस्थानांत तरी मूळच्या रहिवाशांवर नैतिक विजय मिळविला होता. शतपथ ब्राह्मणाच्या काळापर्यंत मूळ रहिवाशांवर नैतिक विजय मिळविण्याकरितां आर्यांना हे प्रतिबंध चालू करण्याची आवश्यकता जर वाटली नाहीं, तर त्यानंतर तरी ती कां वाटावी ह्याची कल्पना करतां येत नाहीं. ह्यावरून श्री. करंदीकरांची ही उपपत्ति इतरांच्या उपपत्तींप्रमाणेंच असमाधानकारक आहे हें उघड आहे.

मला तर ह्या प्रतिबंधांची उपपत्ति निराळ्याच प्रकारानें लागते असें वाटतें. मूळच्या मनुस्मृतीमध्यें विवाह–प्रतिबंध–नियम सांगतांना महाभारतांतील

* मागील ज्या लेखाचा उल्लेख लेखकानें या लेखांत जागोजाग केला आहे तो नवभारताच्या पहिल्या म्हणजे ऑक्टोबर १९४७च्या अंकांत प्रसिद्ध झाला आहे.—का. सं.








उताऱ्यांत योजले आहेत त्याप्रमाणेंच अन्वय आणि सपिंड हे शब्द योजिलेले असावे. किंबहुना असें देखील म्हणतां येईल कीं महाभारतांतील उताऱ्यांतच हे शब्द मूळ मनुस्मृतीवरुन घेतले असले पाहिजेत. महाभारतांतील उताऱ्यांत ह्या शब्दांचा अर्थ कसा असावा हें मीं दाखविलेंच आहे. परंतु पुढें वेद अपौरुषेय आहेत व मनुस्मृति अपौरुषेय आहे अशी कल्पना जेव्हां रूढ झाली तेव्हां त्यांतील प्रतिबंधक शब्दांचा करतां येईल तितका विस्तृत अर्थ करणें हेंच धर्म्य असें वाटूं लागलें असावें. "न जाणों, 'सपिंड म्हणजे चार पिढ्यांपर्यंतच' असा अर्थ केला, परंतु मूळ अर्थ जर 'सात पिढ्यांपर्यंत' असा असेल तर केवढा धार्मिक अनर्थ होईल," ह्या भीतीमुळें 'सपिंड म्हणजे सात पिढ्यांपर्यंत' असाच अर्थ करण्याची प्रवृत्ति रूढ झाली असली पाहिजे. अन्वय शब्दाचा अर्थ देखील असाच विस्तृत केला गेला असावा. मागें दाखविल्याप्रमाणें पूर्वी सपिंड म्हणजे तीन पिढ्यांपर्यंत किंवा दोन पिढ्यांपर्यंत असा अर्थ होता; परंतु आतां सपिंड ह्याचा सात पिढ्यांपर्यंत असा अर्थ केला गेला. अन्वय ह्याचा अर्थ देखील तीन पिढ्यांपर्यंत असाच होता हें मागें दाखविलेंच आहे. तो आतां सर्व गोत्रजांस अनंत पिढ्यांपर्यंत लागू करण्यांत आला. ह्याप्रमाणें सगोत्र–विवाह–प्रतिबंध आणि सांप्रत चालू असलेला सपिंड–विवाह–प्रतिबंध हे रूढ झाले असावे असें मला वाटतें. हे रूढ होतांना 'समानप्रवर' म्हणजे 'एकाच प्रवराचे' जे लोक ते 'एकाच गोत्राचे' पुरुष, अशी कल्पना रूढ झाली असावी. वेद अपौरुषेय आहेत ही कल्पना बुद्धानंतर कांहीं काळानें बुद्धाचें वजन कमी करण्याकरितां उत्पन्न झाली असावी. अर्थात् ह्याच सुमारास हे दोन प्रकारचे प्रतिबंध निर्माण झाले असावे. सगोत्र–विवाह–प्रतिबंध सांगणारा बौधायन हाच पहिला ग्रंथकार आहे आणि तो ह्याच काळाच्या सुमारास झाला आहे. गौतमस्मृति व वासिष्ठ–स्मृति ह्यांत सगोत्रविवाह–प्रतिबंधाचा थोडासा निर्देश आहे; पण तो मागाहूनहि घातला असण्याचा संभव आहे. तथापि त्यांचाहि काळ बौधायनाच्या फार पूर्वीचा नाहीं, एकूण बुद्धानंतर वेदांना व मनुस्मृतीला जें अपौरुषेयत्व आलें त्यामुळें हे दोन विवाह–प्रतिबंध सुरू झाले असावे असें मानण्यास कोणतीच हरकत नाहीं. ह्याप्रमाणें आर्यांच्या विवाहसंस्थेचें मुख्य स्वरुप आणि त्यांत झालेला बदल व त्याचें कारण यांचें वर्णन केलें आहे. आतां आर्यांच्या विवाह–संस्थेची दुसरी अप्रधान लक्षणें आहेत त्यांचेंहि वर्णन करणें जरूर आहे.

## बहुपत्नीकत्वास मनाई नव्हती

ह्यांपैकीं एक महत्त्वाचें लक्षण असें आहे कीं जरी एक मनुष्य बहुधा एकच पत्नी करीत असे, तरी प्रसंगविशेषीं त्याला अधिकहि स्त्रियांशीं विवाह करतां येत असे. ह्यासंबंधींचा पुरावा इतका भरपूर आहे कीं तो येथें देण्याची गरज वाटत नाहीं. डॉ. अ. स. अळतेकर ह्यांच्या ' The Position of Women in Hindu Civilization' या ग्रंथांत व I. J. Meyer ह्यांच्या ' Sexual Life in Ancient India ' ह्या ग्रंथांत तो पुरावा पाहावयास मिळेल.

## विधवांचा पुनर्विवाह होऊं शकत असे.

दुसरें एक लक्षण विधवांना पुनः विवाह करतां येत असे किंवा नियोग–विधीनें संतति उत्पन्न करतां येत असे, हें आहे. महाभारतांतील आदिपर्वांतील १०४व्या अध्यायांत दीर्घतम्याचा इतिहास दिलेला आहे. त्यावरून त्या ऋषीच्या पूर्वी विधवांचा पुनर्विवाह होऊं शकत असे हें स्पष्ट दिसतें. तो ऋषि आपल्या जन्मापासून आंधळा होता; तरीहि तो वेद-वेत्ता असल्यामुळें आतांच्या विद्वानांस जशा सुंदर बायका मिळतात, त्याप्रमाणें त्याला सुंदर बायको मिळालेली होती. परंतु तो आंधळा असल्यामुळें, त्याला व त्याच्या मुलाला पोसण्याकरितां त्याच्या बायकोस श्रम करावे लागत, म्हणून ती त्याचा द्वेष करीत असे. पुढें ती त्यास सोडून गेली तेव्हां दीर्घ–तमा ऋषीनें विधवाविवाह–प्रतिबंधक कायदा सुरू केला. तो म्हणाला:—

अद्यप्रभृति मर्यादा मया लोके प्रतिष्ठिता ॥३४॥
एक एव पतिर्नार्या यावज्जीवं परायणं ॥
मृते जीवति वा तस्मिन् नापरं प्राप्नुयान्नरम्॥३५॥
अभिगम्य परं नारी पतिष्यति न संशयः ॥
अपतीनां तु नारीणां अद्यप्रभृति पातकम् ॥३६॥








यद्यस्ति चेद्धनं सर्वं वृथाभोगा भवन्तु ताः ॥
अकीर्तिः परिवादाश्च नित्यं तासां भवन्तु वै !॥३७॥
—महाभारते, आदिपर्वणि, अध्यायः १०४.

अर्थः—आजपासून मीं एक नवीन मर्यादा समाजांत निर्माण केली आहे. ॥ ३४ ॥ कोणत्याहि स्त्रीला ती जिवंत आहे तोंपर्यंत एकच पति राहील, मग तो पति मेलेला असो किंवा जिवंत असो; तिला दुसरा पति करतां येणार नाहीं. ॥ ३५ ॥ त्या पतीशिवाय इतर मनुष्यांशीं गमन केल्यानें तिचा अधःपात होईल. त्याचप्रमाणें ज्या स्त्रिया कोणत्याहि मनुष्याशीं विवाह करणार नाहींत, त्याहि पापी होतील ॥ ३६ ॥ अशा पति न करणाऱ्या बायकांजवळ जरी पुष्कळ धन असलें आणि त्यांना जरी पुष्कळ मुलें झालीं, तरी तीं त्यांचीं कायदेशीर मुलें होणार नाहींत (वृथाभोगा). पण ज्या पुरुषापासून तीं मुलें झालीं असतील, त्याचीं मात्र ती कायदेशीर मुलें होतील. अशा स्त्रियांची अपकीर्ति आणि निंदा देखील होईल. ॥ ३७ ॥

ह्या दीर्घतमा ऋषीचा काळ इसवी सनापूर्वी १६७७च्या सुमारास येतो, असें तो बलीचा समकालीन असल्यामुळें ठरतें; आणि बलीचा काळ हा आहे असें मी ' Astronomical Method and its Application to the Chronology of Ancient India ' ह्या ग्रंथांत दाखविलें आहे (Para. 58.).

ह्या महाभारतांतील वचनावरून असें ठरतें कीं इसवी सनापूर्वी १६७७च्या अगोदर विधवा स्त्रियांना पुनः विवाह करितां येत असे. परंतु ह्यानंतरहि ज्या मुलींचा विवाह मैथुन–विधीनें पूर्ण झाला नसेल, त्यांना त्यांचा पति मेल्यानंतर पुनः विवाह करितां येत असे, हें वसिष्ठ–स्मृतींतील पुढील वचनांत सांगितलें आहेः—

पाणिग्रहे मृते बाला केवलं मन्त्रसंस्कृता ।
सा चेदक्षतयोनिः स्यात् पुनः संस्कारमर्हति॥६६॥
—वसिष्ठ–स्मृति, अध्याय १७.

अर्थः—जर एकाद्या मुलीचा पाणिग्रहण करणारा म्हणजे पति मरण पावेल आणि त्याच्याशीं ती फक्त मंत्रानें युक्त झाली असेल,पण मैथुन–विधीनें युक्त झाली नसेल, तर तिला पुनः दुसरा पति करून देणें योग्य आहे. ......' इतर स्मृतींतहि अशींच वचनें आहेत.

## नियोग–विधीची चाल

आतां नियोगाबद्दल विचार करावयाचा आहे. नियोगविधि हा पति मेल्यावर किंवा पति जिवंत असतांनाहि करितां येत असे. पति जिवंत असतांना तो आपल्या स्त्रीला दुसऱ्या कोणा पुरुषाशीं संततीकरितां मैथुन करण्याची आज्ञा देत असे व त्या पुरुषाशीं असा करार करून घेत असे कीं जी संतति होईल ती त्या पुरुषाची न होतां आपली (मूळ पतीची) होईल. पति मेल्यानंतर त्याचे नातलग त्याच्या पत्नीला कोणा एकाद्या पुरुषाशीं मैथुन करण्याला सांगत असत आणि त्या पुरुषाकडून असा करार करून घेत असत कीं उत्पन्न होणारी संतति ही त्या स्त्रीच्या पतीची होईल. दोन्ही प्रसंगीं होणारी संतति त्या स्त्रीच्या पतीची होत असे, मैथुन करणाऱ्या पुरुषाची होत नसे; ह्यालाच नियोग असें म्हणतात. पुत्राचे जे बारा प्रकार सांगितले आहेत त्यांमध्यें औरस हा सर्वांत श्रेष्ठ असला तरी नियोगापासून उत्पन्न झालेला पुत्र त्याच्याच खालचा इतर दहांहिपेक्षां श्रेष्ठ समजला जात असे. वासिष्ठ म्हणतो—

द्वादश इत्येव पुत्राः पुराणदृष्टाः ॥ १२ ॥
स्वयमुत्पादितः स्वक्षेत्रे संस्कृतायां प्रथमः ॥१३॥
तद ाभे नियुक्ताया क्षेत्रजो द्वितीयः ॥ १४ ॥

अथः—पुराणांमध्यें बारा प्रकारचे पुत्र सांगितले आहेतः पहिला, सर्वश्रेष्ठ म्हणजे मनुष्यानें मंत्रानें संस्कृत केलेल्या आपल्या पत्नीच्या ठिकाणीं स्वतः उत्पन्न केलेला औरस पुत्र. असा पुत्र न झाला तर गुणक्रमानें दुसरा, त्याच्या बायकोच्या ठिकाणीं दुसऱ्यानें त्याच्या किंवा त्याच्या बांधवांच्या आज्ञेनें उत्पन्न केलेला; ह्याला क्षेत्रज पुत्र असें म्हणतात.

नियोगाविषयींचा पुरावा इतका प्रसिद्ध आणि भरपूर आहे कीं तो येथें देण्याची गरज वाटत नाहीं.

## आर्य विवाहसंस्थेचें मुख्य साध्य : पुरुषसंतति

आर्य विवाह–संस्थेचें आणखी एक लक्षण असें आहे कीं विवाहाचा हेतु केवळ इंद्रियसुख मानलें जात नसे, तर संतति, पुरुषसंतति, हें त्याचें मुख्य साध्य मानलें जाई. म्हणूनच कायद्यानें नियोगाची परवानगी होती. आणि म्हणूनच नियोगानेंहि पुत्र










न झाला तर दत्तक पुत्र घेण्याची व देण्याची कायद्यानें परवानगी होती. नियोग जसजसा बंद झाला तसतसें दत्तक पुत्राचें महत्त्व वाढत गेलें. हें, विवाहाचा उद्देश पुरुष--संतति होता, ह्यामुळेंच घडून आलें.

प्रत्यक्ष विवाहविधि कसा होता ह्याचें विवेचन मी येथें करणार नाहीं. प्रत्येक समाजामध्यें हा विवाह–विधि निरनिराळ्या प्रकारचा असतो व तो कसाहि प्रकारचा असला तरी तो चांगला समजला गेला पाहिजे. कारण, त्यामुळें त्या त्या समाजांत पति–पत्नीत्व उत्पन्न होतेंच. म्हणून मी आतां विवाहामुळें जे कायदेशीर हक्क उत्पन्न होतात, त्यांचें वर्णन करतों. त्या हक्कांचा विचार चार प्रकरणांत केला पाहिजे. काम म्हणजे मैथुनाचा अधिकार, संततीची मालकी म्हणजे प्रजा, संपत्तीची मालकी म्हणजे अर्थ, आणि धर्मविधि करण्याचा अधिकार म्हणजे धर्म. आजहि सरासरी इसवीसनपूर्व २००० वर्षें या काळापासून विवाहविधीमध्यें पति 'धर्मे चार्थे च कामे च नातिचरामि' म्हणजे 'धर्म, अर्थ आणि काम ह्यांमध्यें मी तुझें अतिक्रमण करणार नाहीं' असा आपल्या स्त्रीशीं, शपथ घेऊन, करार करतो. मला असें वाटतें कीं काम ह्या शब्दामध्येंच संततीच्या मालकीचा अंतर्भाव होतो. आणि त्यावरून ह्या शपथेचा अर्थ असा होतो कीं उत्पन्न झालेली संतति कायदेशीर रीतीनें आपल्या दोघांचीहि होईल. ह्या चारहि प्रकरणीं अत्यंत प्राचीन काळीं काय स्थिति होती याचा विचार आतां पुढें करूं,

---

## स्वप्नाळू जीवन आणि वाङ्मयनिर्मिति

राबर्ट लुई स्टीव्हन्सन यांच्या डॉ. जेकील आणि मि. हाइड ह्या सुप्रसिद्ध गोष्टीचें मूळ स्टीव्हन्सनला पडलेल्या एका स्वप्नांत आहे. स्टीव्हन्सनच्या पत्नींनीं त्यासंबंधीं म्हटलें आहे कीं, "एकदां पहांटे मी दचकून जागी झाल्यें. लुई हे झोपेंतच भिऊन ओरडत आहेत असें मला दिसलें. त्यांना कांहीं भयंकर स्वप्न पडलें असावें असें मला वाटून मीं त्यांना जागें केलें. जागे झाल्यावर ते मला रागावून म्हणाले, 'मला कशाला जागें केलेंस? किती सुंदर आणि कल्पनारम्य गोष्ट मी स्वप्नांत अनुभवीत होतों!' त्या गोष्टीतील रूपपरिवर्तनाचा पहिला प्रसंग घडला त्याच वेळीं मी त्यांना उठविलें होतें." स्टीव्हन्सनच्या कादंबऱ्यांतील संविधानकें, प्रसंग, पात्रें व कांहीं ठिकाणचे संवाद यांच्यापाठीमागें त्याला पडलेल्या स्वप्नांची फार मोठी प्रेरणा आहे.

बाल्झॅकच्या कादंबरींतील पात्रें नाना प्रकारचीं आणि असंख्य असून त्यांत मानवी स्वभावांचे निरनिराळे अनुभव व नमुने दिसून येतात. न्हावी, गुलहौशी विलासी, मोठमोठ्या घराण्यांतील स्त्रिया, वेश्या, मोठमोठे व्यापारी, शेतकरी, कंजूष, कलावंत, गूढवादी, गुन्हेगार अशा किती तरी व्यक्तींचीं शब्दचित्रें त्यानें रंगविलीं आहेत! पण त्याचें स्वतःचें जीवन मात्र एकाद्या भिक्षूप्रमाणें माणूसघाणें आणि एकलकोंडें होतें. त्याचा जगाशीं संबंध क्वचित् येत असे. कधीं काळीं तो जर एकांतांत बाहेर आला तर बाह्य जगाला एकाद्या दिवाभीताप्रमाणें बुजत असे. अति अंतर्मुख होऊन स्वप्नाळू बनलेल्या, कांहीं अत्याचारी कृतीकरितां आसुसलेल्या अशा आपल्या कल्पनाशक्तीनें निरनिराळी वाङ्मयसृष्टि निर्माण करून त्यानें आपली जीवनाची भूक भागविली.संपत्ति, साहस आणि कीर्ति यांबद्दलची त्याची नैसर्गिक क्षुधा त्याच्या स्वप्नमय जीवनांत अवतरून तिनें वाङ्मयाचें स्वरूप धारण केलें.








# प्रतारणा

स्टीफन झ्वाएग [ अनुवादक : श्री. शान्तिकुमार शहा ]

* गेल्या वर्षी उन्हाळ्यांत मीं कॅडेनाबिया इथें एक महिना घालविला. लेक कामोच्या तीरावर जीं लहान लहान शहरं वसलीं आहेत तिथेंच कॅडेनाबिया आहे. त्या ठिकाणीं असलेल्या दाट झाडीमधून दिसणाऱ्या पांढऱ्या शुभ्र बंगल्यांमुळं तर त्या ठिकाणाला विलक्षणच शोभा प्राप्त झाली आहे. पावसाळ्याच्या दिवसांत ज्या वेळीं तिथें लोकांची अतिशय गर्दी असते त्या वेळीं देखील तिथें सर्वत्र सामसूम असते असं म्हणतात. मी तिथें गेलों ते ऑगस्ट महिन्यांतील उन्हाळ्याचे दिवस होते आणि त्या वेळीं तर साहजिकपणेंच तिथें विलक्षण शांतता होती. मी ज्या हॉटेलांत उतरलों होतों तें तर जवळजवळ रिकामंच होतं. त्या वेळीं हॉटेलांत जे कांहीं थोडे लोक होते ते सारे एक-मेकांकडं आश्चर्यानं पहात. कारण, अशा या दिवसांत तिथें राहणाऱ्या इतर साऱ्या व्यक्तींविषयीं प्रत्येकाला आश्चर्य वाटावं हें साहजिक होतं. तिथें राहणाऱ्या इतर साऱ्या व्यक्तींपेक्षां तिथें असलेल्या एका वयस्क व्यक्तीविषयीं मला सर्वांत जास्त कुतूहल वाटत होतं. सिगरेटच्या धूम्रवलयांकडं पहात विचार करण्यांत अथवा एकाद्या पुस्तकाचीं पानं विमनस्क-पणें चाळण्यांत तो दिवसाचा सारा वेळ घालवीत असे. एकदोन दिवस सारखा पाऊस पडत होता आणि त्या वेळीं आमची दोघांची ओळख झाली. त्याची वागणूक इतक्या आपुलकीची होती कीं लवकरच आमच्या दोघांच्या वयांतील सारं अंतर नाहींसं झालं आणि आमची चांगलीच मैत्री जमली. लिव्होनिया इथें त्याचा जन्म झाला होता आणि इंग्लंड व फ्रान्स या दोन देशांत त्याचं शिक्षण झालं होतं. राहण्याचं असं त्याचं कुठलंहि विशिष्ट ठिकाण नव्हतं, कीं त्याचा स्वतःचा असा कुठलाहि व्यवसाय नव्हता. घरादाराचे पाश नसलेला तो एक भटक्या होता. योगायोगानं आपण ज्या ज्या ठिकाणीं जाऊं तेथील सौंदर्याची मनसोक्त लूट करणं हा त्याच्या मनोवृत्तीचा धर्म होता. साऱ्या कला त्याला थोड्याफार प्रमाणांत अवगत होत्या; पण त्यांतली कुठली तरी एक व्यवसाय म्हणून पत्करणं त्याला पसंत नव्हतं. या साऱ्या कलांमुळं त्याच्या जीवनांत किती तरी सुखाचे क्षण निर्माण झाले असतील! पण त्यानं मात्र या कलांच्या निर्मिती-करितां स्वतःच्या आयुष्यांतील एक क्षण देखील वेंचला नव्हता. त्याचं आयुष्य अगदीं निरर्थक आणि निष्क्रिय असल्याप्रमाणंच वाटे. कारण, आजवर त्यानं जो कांहीं अनुभव स्वतःच्या अंतःकरणांत जतन करून ठेवला होता, तो सारा त्याच्या मृत्यूनंतर धुळीला मिळणार होता.

एक दिवस रात्रीचं जेवण संपल्यानंतर आम्ही दोघे हॉटेलच्या समोरच्या पटांगणांत गप्पा मारीत बसलों होतों. समोरच असलेल्या सरोवरावर नकळत हळू हळू अंधाराची छाया पसरत होती. गप्पा मारतां मारतां मीं माझ्या मनांत उद्भवलेला विचार सूचक-पणें त्याला बोलून दाखविला.

"तुम्ही म्हणतां तें कदाचित् बरोबर असेल," त्यानं हंसून बोलण्यास सुरुवात केली, "गतजीवनांतील

* स्टीफन झ्वाएगच्या 'The Flower Snared' या गोष्टीचा हा अनुवाद आहे.








आठवणींविषयीं मला बिलकुल आस्था वाटत नाहीं. एकदां एकाद्या गोष्टीचा अनुभव घेतला कीं झालं......संपलं...... पुनः तीविषयीं विचार करायचा नाहीं असा माझा स्वभावधर्म आहे. कथां-कादंबऱ्यांतील कल्पना देखील कालांतरानं पुसट होत जातातच ना ? दहा, वीस, पन्नास किंवा शंभर वर्षांच्या कालानंतर त्या देखील नष्ट होत नाहींत का ? मी तुम्हांला अशी एक घटना सांगतों कीं जिच्या आधारें एक सुरेख गोष्ट लिहितां येईल. आपण कुठें तरी बाहेर फिरायला जाऊं या. कारण, चालत असतांना मी जास्त मनमोकळेपणानं बोलूं शकतों. ''

त्या सरोवराच्या कांठाकांठानं जो सुंदर रस्ता दूरवर गेला होता त्या रस्त्यावरून आम्ही चालत होतों. रस्त्याच्या दोन्ही बाजूंना नारळाच्या आणि सुरूच्या झाडांच्या रांगा पसरलेल्या दिसत होत्या. त्या वेळीं सर्वत्र सामसूम झालं होतं. वाऱ्याच्या झुळुकीनं हललेलं सरोवराचं पाणी चंद्रप्रकाशांत चमकत होतं आणि हें सारं समोर पसरलेल्या वृक्षांच्या पर्णराजींतून स्पष्टपणें दिसत होतं. माझ्या मित्रानं पुनः बोलण्यास सुरुवात केली. तो मला म्हणाला, " गेल्या वर्षी ऑगस्टमध्यें मी याच ठिकाणीं आलों होतों आणि त्या वेळीं देखील मी याच हॉटेलांत उतरलों होतों. या गोष्टीचं तुम्हांला खात्रीनंच आश्चर्य वाटेल. कारण, थोड्याच वेळापूर्वी मीं तुम्हांला सांगितलं कीं कुठल्याहि गोष्टीची पुनरावृत्ति मी कटाक्षानं टाळीत असतों. पण आतां मी जें कांहीं तुम्हांला सांगणार आहें तें सारं ऐकल्यानंतर या वेळीं मीं माझा हा नियम कां मोडला तें तुमच्या लक्षांत येईलच.

"अर्थातच त्या वेळीं देखील हें हॉटेल आजच्याप्रमाणंच रिकामं होतं. दिवसाचा सारा वेळ मासे पकडण्यांत घालविणारा तो मिलान येथील माणूस— तो देखलि त्या वेळीं इथें होता. दुसऱ्या दिवशीं मासे पुनः जाळ्यांत सांपडावे म्हणून सांपडलेले मासे पुनः पाण्यांत टाकण्याचा त्याचा क्रम आजच्याप्रमाणंच त्या वेळीं देखील चालू होता. त्याच वेळीं दोन इंग्रज व्यक्ती इथें रहात होत्या; पण त्या व्यक्ती इतक्या शांतपणें सर्वत्र वावरत कीं त्यांचं अस्तित्व सहजासहजीं कुणाच्याहि लक्षांत येणं शक्य नव्हतं. याशिवाय, इथें त्या वेळीं एक देखणा तरुण मनुष्य होता व त्याच्याबरोबर एक अशक्त परंतु अतिशय सुंदर अशी तरुणी होती. त्या दोघांचं एकमेकांवर विलक्षण प्रेम असल्यासारखं दिसत होतं. आणि म्हणूनच, ती त्याची बायको असावी कीं नाहीं या-विषयीं अद्याप देखील माझं मन साशंक आहे.

" या सर्वांव्यतिरिक्त इथें एक जर्मन कुटुंब होतं. त्यांच्या एकंदर राहणीवरून तें उत्तर जर्मनींतील असावें असं वाटे. त्यांच्यांत एक अशक्त आणि सडपातळ अशी वयस्क स्त्री होती. तिच्याकडं पाहिलं असतां, तिच्या तरुण वयांत ती सुंदर दिसत असावी हें कुणाच्याहि सहज लक्षांत येण्यासारखं होतं. तिच्याबरोबर जी सुंदर स्त्री होती ती खात्रीनंच तिची बहीण असावी. कारण, त्या दुसऱ्या स्त्रीचीहि ठेवण अगदीं हुबेहूब तिच्यासारखी होती. फरक इतकाच कीं ती दुसरी स्त्री थोडीशी नाजूक होती. त्या दोघी नेहमींच एकत्र असत व सारा वेळ कसल्या तरी विणकामामध्यें गर्क असत. दिवसाचा सारा वेळ त्या त्यांतच घालवीत. त्यांच्याबरोबर जी एक सोळासतरा वर्षांची तरुण मुलगी होती ती त्या दोघींपैकीं कुणाची तरी एकीची मुलगी असावी. त्या दोघींमध्यें प्रत्ययाला येणारा अवयवांचा रांकटपणा या मुलीच्या बाबतींत पुष्कळच कमी झालेला होता. तिच्या नाजूक अवयवांच्या विकासाला नुकतीच कुठें सुरुवात झाली होती. ती वयानं अद्याप लहान व अंगानं अतिशय सडपातळ असल्याकारणानं एकाद्या सर्वसाधारण मुलीप्रमाणंच दिसत असे. तिचे कपडे देखील नेहमींच अत्यंत अव्यवस्थित असत. असं जरी असलं तरी आकर्षक असं कांहीं तरी तिच्यांत खासच होतं. . . .

" तिचे डोळे टपोरे आणि अत्यंत तेजस्वी होते; परंतु तिचा स्वभाव मात्र इतका भित्रा आणि लाजाळू होता कीं कुणाच्याहि दृष्टीला दृष्टि देण्याचं धैर्य तिच्या ठिकाणीं नव्हतं. आई आणि मावशी यांच्याप्रमाणंच तिच्या हातांत देखील कसलं ना कसलं तरी विणकाम असे. परंतु त्या विणकामाकडं तिचं लक्ष क्वचितच असे. विणकाम करतांना मधून मधून तिच्या हाताची हालचाल मंद होई, बोटांची हालचाल सर्वस्वीं बंद पडे आणि विमनस्कपणें समोरच्या








सरोवराकडं पहात ती स्वस्थ बसे. त्या वेळीं मला तिच्यांत आकर्षक असं काय आढळलं याची आज देखील मला नीटशी कल्पना नाहीं. आईशेजारीं उभ्या असणाऱ्या एकाद्या तरुणीला पाहून ज्या भावना मनांत येतलि तशाच प्रकारच्या त्या भावना होत्या कीं काय कोण जाणे! वस्तु आहे तिथें छाया आहे, तारुण्य आहे तिथें वार्धक्य आहे, सुख आहे तेथें दुःख आहे आणि जिथें स्वप्न आहे तिथेंच निराशा आहे, याची जाणीव झाल्यानंतर जे विचार मनांत येतात तशाच प्रकारचे ते विचार होते कीं काय याविषयीं अद्याप देखील माझं मन साशंक आहे. तिच्या वयाच्या कुठल्याहि तरुणीच्या डोळ्यांत जी आकांक्षा प्रत्ययाला येते तीच तिच्या नेत्रांत देखील प्रत्ययाला येत होती आणि कुणास ठाऊक कदाचित् या गोष्टीचाच माझ्या मनाला मोह पडला असावा! कारण कांहीं कां असेना मला तिच्याकडं पाहण्याचा सारखा मोह होत असे हें मात्र खरं! ती ज्या वेळीं कुत्र्यांशीं अथवा मांजरांशीं लडिवाळपणें खेळत असे त्या वेळीं तिच्याकडं सारखं पहात राहावं असं मला वाटे. ती नेहमींच विमनस्कपणें एक काम सोडून दुसरं हातीं घेई आणि क्षणभरानं तेंहि तसंच अर्धवट सोडून देत असे. अशा वेळीं तिच्या त्या मोहक हालचालींकडं पहात राहण्याचा मोह मला आवरतां येत नसे. हॉटेलच्या वाचनालयांत असलेल्या भिकार पुस्तकांचीं पानं किंवा तिच्याजवळ असलेल्या काव्यसंग्रहाचीं पानं ती ज्या उत्सुकतेनं चाळीत असे त्यांत आकर्षक असं कांहीं तरी खासच होतं आणि ज्या बेफिकिरीनं ती गोएथे आणि बाउमबॅच यांच्या काव्यांच्या ओळी गुणगुणत असे त्यांत देखील मोहक असं कांहीं तरी खासच होतं."

बोलतां बोलतां तो क्षणभर थांबला आणि त्यानं मला विचारलं, "कां, हंसलां कां?"

हंसल्याबद्दल मीं त्याची चटकन् क्षमा मागितली आणि त्याला विचारलं, "गोएथे आणि बाउमबॅच या दोघां कवींचीं नांवं एकत्रित गुंफणं हें थोडंसं चमत्कारिकच नाहीं का?"

"चमत्कारिक? कदाचित् तसंहि असेल. पण त्यांत तितकंसं विचित्र असं कांहींच नाहीं. आपण जें काव्य वाचतों तें चांगलं आहे कीं वाईट आहे, अस्सल आहे कीं नकली आहे याची तिच्यासारख्या तरुण मुलीला तितकीशी फिकीर नसते. काव्याच्या ओळी या तिच्या दृष्टीनं मद्याच्या सुरईसारख्या असतात. त्या सुरईतील मद्य उंची आहे कीं हलकं आहे याची तिला तितकीशी पर्वा नसते. कारण, मदिरेचा प्याला ओंठाला लावण्यापूर्वीच तिला त्याचा उन्माद चढलेला असतो.

"या मुलीच्या बाबतींतहि असंच होतं. तिच्या प्रत्येक हालचालींत कसली ना कसली तरी अपेक्षा प्रत्ययाला येत होती. तिचे डोळे नेहमींच धुंद असत. ती ज्या तऱ्हेनं स्वतःचीं बोटं टेबलावर नाचवी त्यांत देखील एक प्रकारची आतुरता प्रत्ययाला येत होती. उत्सुकता आणि भय या भावनांनीं तिचं अंतःकरण बेचैन झालेलं होतं आणि त्यामुळं तर ती जास्तच सुंदर दिसत असे. कुणाशीं तरी बोलावं, स्वतःच्या भावना कुणाजवळ तरी व्यक्त कराव्या, असं तिला सारखं वाटत असावं. पण ज्या व्यक्तीजवळ ती स्वतःच्या आशाआकांक्षा व्यक्त करूं शकेल अशी एकहि व्यक्ति त्या ठिकाणीं नव्हती. विणकामांत दंग असलेल्या त्या दोन वयस्क स्त्रियांच्या सान्निध्यांत असतांना देखील आपण एकटीच आहों असंच तिला वाटत असावं. मला स्वतःला तिच्याविषयीं खूप अनुकंपा वाटे. पण आपण होऊन कुठलंहि पाऊल पुढं टाकतां येणं मला शक्य नव्हतं. माझ्या वयाच्या पुरुषाविषयीं तिच्यासारख्या तरुण मुलीला आकर्षण तें कसलं वाटणार? शिवाय आपण होऊन कुठल्याहि कुटुंबाची ओळख करून घेणं मला आवडत नाहीं आणि अशा वयस्क स्त्रियांची ओळख आपण होऊन करून घेणं तर मला बिलकुलच आवडत नाहीं.

"माझ्या मनांत एक विचित्र कल्पना आली. ही मुलगी आयुष्यांत प्रथमच इटलीला येत असावी असा विचार माझ्या मनांत आला. सारे जर्मन लोक शेक्सपिअरचीं नाटकं वाचतात आणि इटली देश म्हणजे प्रेम, प्रणय आणि साहस यांचं माहेरघर अशीच त्या साऱ्यांची समजूत झालेली असते. त्या मुलीला देखील अशाच रम्य गोष्टींचीं स्वप्नं पडत असावीं याविषयीं माझ्या मनाची खात्री











होती. तिच्यासारख्या तरुण मुलीच्या स्वप्नांना मर्यादा ती कुठून असणार ? कुठलीहि गोष्ट अशक्य अथवा असंभवनीय असं तिच्या मनाला वाटणं शक्य नव्हतं. तिच्याकरितां एक प्रियकर निर्माण करण्याचं मीं मनाशीं ठरवलं. .........

"त्या दिवशीं संध्याकाळीं मीं एक प्रेमपत्र लिहिलं. तें जरी मी जर्मन भाषेत लिहिलं होतं, तरी पत्राची भाषा शक्य तितकी सुंदर आणि उन्मादक वाटावी याची खबरदारी घेतली होती. त्या पत्राखालीं सही नव्हती. पत्र लिहिणाऱ्या व्यक्तीनं कांहींहि देऊं केलेलं नव्हतं कीं कांहींहि मागितलेलं नव्हतं. कुठल्याहि सर्वसाधारण कादंबरींत आढळणारं असं तें प्रेमपत्र होतं. अंतरींच्या अस्वस्थतेमुळं ती मुलगी सर्वांच्या अगोदर ब्रेकफास्टच्या खोलींत येत असे या गोष्टीची मला कल्पना होती आणि म्हणूनच मीं तें पत्र तिच्या टेबलावरील नॅपकिनच्या खालीं लपवून ठेवलं.

"दुसऱ्या दिवशीं सकाळीं मी बगीच्यांत गेलों आणि काय होतं तें पाहूं लागलों. आंत जें जें घडत होतं तें तें सारं खिडकींतून मला स्पष्टपणें दिसत होतं. तें पत्र पाहतांच तिला खूपच आश्चर्य वाटल्यासारखं दिसलं. तिला नुसतंच आश्चर्य वाटलं नसावं, तर तिला एक प्रकारचा गोड धक्का बसला असावा. कारण, एकाएकीं तिच्या गालांवर आणि मानेवर रक्तिमा पसरला. बावरून तिनं आजूबाजूला पाहिलं. क्षणभर तिचे हात थरारले. परंतु दुसऱ्याच क्षणीं तिनं तें पत्र लपविलं. त्या पत्रामुळं तिचं मन अत्यंत बेचैन झालं आणि खाण्यावरचं तिचं लक्ष पार उडालं. कुठें तरी दूर—ज्या ठिकाणीं कुणीहि फिरकणार नाहीं अशा स्थळीं—जाऊन केव्हां एकदां आपण तें पत्र वाचूं असं तिला झालं होतं. ...तुम्हीं कांहीं विचारलं कां ?"

मीं नकळत कसली तरी हालचाल केली होती; पण मीं तसं कां केलं याची मला स्वतःलाच कल्पना नव्हती. मी म्हणालों, "तुम्ही फारच मोठं साहस करीत होतां. ती मुलगी त्या पत्राविषयीं चौकशी करील, कदाचित् तेथील वेटरला ती त्या पत्राविषयीं विचारील, असं नाहीं तुम्हांला वाटलं ? आपल्या आईला ती तें पत्र दाखवील अशी शंका सुद्धां तुम्हांला नाहीं आली ?"

"या साऱ्या गोष्टी घडणं शक्य आहे याची मला कल्पना होती, नाहीं असं नाहीं. तुम्हीं जर त्या मुलीला पाहिलं असतं, तिचा स्वभाव किती भित्रा आहे याची जर तुम्हांला कल्पना आली असती, तर तुम्हीं असा हा प्रश्न विचारलाच नसता. कांहीं तरुण स्त्रिया इतक्या लाजाळू आणि भित्र्या असतात कीं एकाद्या पुरुषाला त्यांच्या या स्वभावाचा हवा तसा फायदा घेतां येतो. त्या वाटेल तें सहन करतात; कारण त्याविषयीं तक्रार करण्याचं धैर्य त्यांच्या अंगीं नसतं. ...

"माझा प्रयोग यशस्वी होत असल्याचं पाहून मला आनंद होत होता. ती मुलगी ज्या वेळीं बगीच्यांतून परत आली त्या वेळीं मात्र तिला पाहतांच माझं अन्तःकरण धडधडूं लागलं. तिनं नुकतंच तारुण्यांत पदार्पण केलं असल्याकारणानं तिच्या चालण्यांत एक प्रकारची मिजास प्रत्ययाला येत होती. काय करावं याविषयीं तिचं मन सर्वस्वीं गोंधळून गेल्यासारखं दिसत होतं. या वेळीं तिचे गाल एकाएकीं आरक्त झाले होते. याअशा गोंधळलेल्या मनःस्थितींत देखील ती अतिशय मोहक दिसत होती यांत शंकाच नाहीं. असं हें सारा दिवसभर चाललं होतं. त्या रहस्याचा एकादा तरी धागा आपल्या हातीं लागेल या आशेनं तिनं समोरच्या साऱ्या खिडक्यांकडं नजर टाकली, आणि याच अपेक्षेनं ती जवळून येणाऱ्या जाणाऱ्या प्रत्येक व्यक्तीकडं निरखून पहात होती. एकदां तिची व माझी दृष्टिभेट झाली, पण मीं चटकन माझी दृष्टि दुसरीकडं वळवली. कारण, चुकून सुद्धां त्या रहस्याचा कुठलाहि धागा तिच्या हातीं लागूं नये अशी माझी इच्छा होती. तिचं मन त्या रहस्याविषयींच्या उत्सुकतेमुळं किती बेचैन झालं आहे याची मला क्षणार्धांत कल्पना आली आणि हें सारं ज्या वेळीं माझ्या लक्षांत आलं त्या वेळीं मात्र माझं मलाच भय वाटलं. एकाद्या तरुण मुलीच्या अन्तःकरणांत अशा प्रकारची उत्सुकता निर्माण करण्यांत सुख असतं यांत शंकाच नाहीं. या सुखाइतकं भयंकर असं दुसरं कुठलंहि सुख नाहीं असं जें मीं कित्येक वर्षांपूर्वीं वाचलं होतं त्याची मला या क्षणीं आठवण झाली आणि एकाएकीं माझ्या साऱ्या अंगावर शहारे आले !








"नंतर ज्या वेळीं मीं त्या मुलीला पाहिलं त्या वेळीं ती त्या दोन वयस्क स्त्रियांच्या सांनिध्यांत बसलेली होती. नेहमींप्रमाणंच त्या दोघीहि कसल्या तरी विणकामामध्यें दंग होत्या; परंतु तिच्या हातांत मात्र कसलंच विणकाम दिसत नव्हतं आणि म्हणून तिच्या बोटांची कसलीच हालचाल होत नव्हती. मधून मधून तिचा हात वक्षःस्थलाकडं मात्र जाई. कारण, तिनं तें पत्र खात्रीनंच त्या ठिकाणीं लपवून ठेवलं असावं. या साऱ्या खेळाविषयीं माझ्या मनाला वाटणारं आकर्षण एकसारखं वाढतच होतं. त्या दिवशीं संध्याकाळीं मीं तिला दुसरं एक तसलंच पत्र लिहिलं आणि नंतर कित्येक दिवस हा क्रम असाच चालू ठेवला. प्रेमाच्या आणि काल्पनिक प्रणयाच्या भावना त्यांत गुंफतांना मला आतां जास्तच मौज वाटूं लागली. केवळ मासे किंवा हरणं पकडण्याच्या शौकाखातरच जो जाळं पसरतो त्यालाहि अशीच गम्मत वाटत असली पाहिजे. माझ्या प्रयोगाला हें जें अनपेक्षित असं यश येत होतं त्यामुळं आतां माझं मलाच भय वाटूं लागलं आणि हा प्रयोग असाच अर्धवट सोडून द्यावा कीं काय याविषयीं मी मनाशीं विचार करूं लागलों. हा प्रयोग असाच अर्धवट सोडून द्यावा असंच क्षणभर मला वाटलं. परंतु दुसऱ्याच क्षणीं मनांत विचार आला : ज्या प्रयोगाची सुरुवात इतकी सुरेख झाली आहे तो असाच अर्धवट सोडून द्यायचा का ? तो प्रयोग तसाच चालू ठेवण्याचा मोह अखेर माझ्या मनाला आंवरतां आला नाहीं हेंच खरं. ...

"अलीकडं ती मुलगी विलक्षण सुंदर आणि मोहक दिसूं लागली होती. चालतांना जणूं काय ती नाचते आहे असाच भास आजकाल होत होता. सकाळीं मिळणाऱ्या पत्राची अपेक्षा करण्यांत तिच्या साऱ्या रात्री जात असाव्या; कारण जागरणामुळं तिच्या डोळ्यांच्या खालच्या बाजूंना काळीं वलयं पडूं लागलीं होतीं. स्वतःच्या सौंदर्यप्रसाधनांकडं आजकाल तिनं जास्त लक्ष द्यायला सुरुवात केली होती. प्रत्येक गोष्टीला आतां ती मुद्दामच हलक्या हातानं स्पर्श करूं लागली होती. तिच्या नजरेसमोर येणाऱ्या प्रत्येक व्यक्तीकडं आतां ती जास्त उत्सुकतेनं पाहूं लागली. कारण, पत्र लिहिणारी व्यक्ति तिच्या अगदीं जवळपासच आहे, असं मी त्या पत्रांमधून सूचित केलं होतं. ती व्यक्ति तिच्या साऱ्या हालचाली पाहत आहे, पण मुद्दामच अदृश्य राहिली आहे, अशी मीं त्या पत्रांमधून तिची कल्पना करून दिलेली होती. तिच्या वागणुकींत हा जो बदल होत होता तो इतका स्पष्ट होता कीं, तिच्याबरोबरच्या त्या रूक्ष स्वभावाच्या स्त्रियांच्या देखील लक्षांत तो आल्यावांचून राहिला नाहीं. तिच्या गालांवर जी लाली चढत होती आणि तिच्या चालण्यांत आजकाल जी मिजास प्रत्ययाला येत होती त्यांकडे त्या दोघी उत्सुकतेनं पहात आणि एकमेकींकडं बघून अर्थपूर्ण नजरेनं हंसत. अलीकडं तिचा आवाज जास्त स्पष्ट व मधुर झाला होता. आजकाल तिच्या बोलण्यांत क्षणाक्षणाला एक प्रकारचा आत्मविश्वास प्रत्ययाला येत होता. कधीं कधीं तर असेंहि वाटे कीं तिच्या या साऱ्या दबलेल्या भावनांचा एकाद्या उन्मादक गीतांत स्फोट होणार. कधीं कधीं असं वाटे कीं ...... . या वेळीं तुम्ही पुनः एकदां हंसलां ! खरंच काय झालं ?...... ."

"छे, तसं कांहींच नाहीं. तुमची गोष्ट चालूं द्या. कृपा करून गोष्ट सांगण्याचं थांबवूं नका. गोष्ट सांगण्याची तुमची शैली किती सुरेख आहे याचाच मी मनाशीं विचार करीत होतों. तुम्हांला खरोखरींच ती देणगी आहे असं मला वाटतं. एकाद्या कादंबरीकाराला देखील ही गोष्ट तुमच्यापेक्षां जास्त चांगल्या तऱ्हेनं सांगतां येणार नाहीं."

"तुमच्या जर्मन कादंबरीकाराप्रमाणंच माझी भाषाशैली पाल्हाळिक, कृत्रिम आणि आलंकारिक आहे असंच म्हणायचं आहे ना ? शक्य तितकं थोडक्यांत सांगण्याचा मी आतां प्रयत्न करतों. एकाद्या खेळांतील बाहुलीप्रमाणं ती मुलगी नाचत होती आणि मी तिला कौशल्यानं नाचवीत होतों. माझा तिला संशय येऊं नये म्हणून पत्र लिहिणारी व्यक्ति कॅडेनाबिया इथें रहात नसून इथून जवळच असलेल्या दुसऱ्या एका शहरीं रहाते व दररोज ती व्यक्ति बोटीनं इथें येते अशी त्या पत्रांमधून मीं तिची समजूत करून दिलेली होती. त्यानंतर दररोज ज्या वेळीं बोट येण्यापूर्वीं सूचना म्हणून घंटा होई, त्या वेळीं आई आणि मावशी यांच्या








सांनिध्यांतून सुटण्याकरितां म्हणून कांहीं ना कांहीं तरी सबब काढून ती बाहेर येई आणि शांतपणें खिडकीच्या एका कोपऱ्यांत उभी राहून येणाऱ्या उतारूंकडे पाहत राही.

"त्यानंतर एके दिवशीं एक विचित्र घटना घडली. त्या दिवशीं दुपारीं आकाश ढगांनीं भरून आलेलं होतं आणि म्हणून त्या मुलीकडं पाहत राहण्यापलीकडं दुसरं कांहीहि करतां येणं मला शक्य नव्हतं. त्या दिवशीं बोटींतून जे अनेक उतारू उतरले त्यांत एक देखणा तरुण होता. तो ज्या वेळीं बोटींतून खालीं उतरला, त्या वेळीं साहजिकच त्याची नजर या मुलीकडं गेली. या मुलीच्या डोळ्यांत जी उत्सुकता भरली होती ती त्याच्या लक्षांत आल्यावांचून राहिली नाहीं. नकळत तिच्या ओंठांवर हास्य विलसलं आणि एकाएकीं तिचे गाल आरक्त झाले. तें लक्षांत येऊन तो तरुण एकदम दचकला आणि त्यानं तिच्याकडं मुद्दामच पाहिलं. साहजिकपणेंच तो तरुण तिच्याकडं पाहून प्रत्युत्तरादाखल हंसला आणि चटकन् तिच्याकडं वळला. ती मुलगी मात्र भीतीनं दूर पळून जाऊं लागली होती. थोडंसं दूर गेल्यानंतर तिच्या मनांत विचार आला : ज्याच्या भेटीची आपण इतके दिवस अत्यंत उत्सुकतेनं वाट पहात होतों तो आपला प्रियकर हाच तर नसेल ना ? क्षणभर ती तशीच जागच्या जागीं थांबली; परंतु, नंतर पुनः तिनं दूर दूर जाण्यास सुरुवात केली. तिथून बरंच दूर गेल्यानंतर मात्र तिनं मागं वळून त्या तरुणाकडं पाहिलं. इच्छा आणि भय, आकांक्षा आणि लज्जा, अशा नाजूक भावनांची ती गुंतागुंत होती आणि अशा वेळीं बहुधा मनाच्या कमकुवतपणाचाच विजय होतो. तिच्या या वागणुकीचा त्या तरुणानं स्वतःला अनुकूल असा अर्थ घेतला आणि तिच्या पाठोपाठ जाण्यास सुरुवात केली. जागच्या जागीं थांबण्याऐवजीं ती मुलगी तिथून दूर पळून जात असल्याचें पाहून मात्र त्याला विलक्षण आश्चर्य वाटलं. तो अगदीं तिच्या जवळ गेल्याचं ज्या वेळीं माझ्या लक्षांत आलं त्या वेळीं मात्र मला अतिशयच भय वाटलं आणि एकाएकीं माझ्या मनांत विचार आला : आजवर इतक्या प्रयासानं मीं हा जो मनोरा रचला होता तो आतां असा एकाएकीं ढांसळून पडणार कीं काय ? इतक्यांत सुदैवानं त्या दोन वयस्क स्त्रिया त्या ठिकाणीं आल्या. भीतीनं बावरलेल्या एखाद्या पांखरांप्रमाणं संरक्षणाकरितां या मुलीनं त्यांच्या दिशेनं धांव घेतली. तो तरुण हलकेंच मागं फिरला; परंतु तो परत फिरण्यापूर्वींच त्या दोघांची पुनः एकदां दृष्टिभेट झालीच ! मी रचीत असलेलं नाटक संपविण्याची ती मला सूचनाच होती; परंतु कांहीं केल्या मला त्या खेळाचा मोह आंवरतां येईना. या खेपेला माझ्या खेळांत दैवाची मदत घेण्याचा मीं मनाशीं निश्चय केला. त्या दिवशीं संध्याकाळीं मी तिला नेहमींपेक्षां मोठं पत्र लिहिलं आणि तिच्या मनांत संशयाचं जें बीज पेरलं गेलं होतं तें जास्त खोलवर रुजेल याची दक्षता घेतली. आतां या वेळीं दोन खेळणीं माझ्या हातीं आलीं होतीं आणि त्यामुळं साहजिकपणेंच खेळांतील मौज दुपटीनं वाढली होती. . . . . . . .

"तेथील वातावरणांत कसला तरी बिघाड झाला आहे हें दुसऱ्या दिवशीं सकाळीं ज्या वेळीं माझ्या लक्षांत आलं त्या वेळीं मात्र मला भय वाटलं. त्या मुलीच्या हालचालींतील गोड उत्सुकता आतां पार मावळली होती; त्या उत्सुकतेची जागा आतां दुःख आणि निराशा यांनीं घेतली होती. तिच्या गालांवर अश्रूंचे ओघळ स्पष्टपणें दिसत होते आणि या वेळीं जरी ती शांत दिसत होती तरी तिचे डोळे पुनः केव्हां पाण्यानं भरून येतील याचा नेम नव्हता. पत्र पाहून ती आनंदानं वेडी होईल अशी माझी अपेक्षा होती; परंतु तसं तर कांहींच झालेलं दिसत नव्हतं. या साऱ्या प्रकारामुळं माझं मन मात्र एकाएकीं उदास झालं. इतक्या दिवसांत आज प्रथमच फांसे उलटे पडत होते. कारण आज माझा बाहुली माझ्या मनाप्रमाणं नाचत नव्हती. काय झालं असावं, याविषयीं मीं मनाशीं खूप विचार केला; पण माझ्या लक्षांत कांहींच येईना. या साऱ्या खेळाला हें जें अनपेक्षित असं विचित्र वळण लागलं होतं, त्यामुळं माझं मन मात्र निष्कारण बेचैन आणि उदास झालं होतं. याकरितांच, तिची दृष्टि टाळण्याचा मीं मनाशीं निश्चय केला आणि तो सारा दिवस हॉटेलच्या बाहेरच काढला. मी ज्या









वेळीं बाहेरून परत आलों त्या वेळीं मात्र मला साऱ्या गोष्टींचा पूर्णपणें उलगडा झाला. त्या कुटुंबानं त्या दिवशींच तें शहर सोडलं असावं हें माझ्या चटकन् लक्षांत आलं. कारण, त्या दिवशींच संध्याकाळीं जेवणाच्या खोलींत त्यांचं टेबल मांडलं गेलं नव्हतं. आपल्या प्रियकराशीं एक शब्द देखील न बोलतां त्या मुलीला तें शहर सोडावं लागलं होतं. दुसरा दिवस आपल्या दृष्टीनं किती महत्त्वाचा आहे हें आईला किंवा मावशीला सांगण्याचं धैर्य तिच्या ठिकाणीं खासच नव्हतं! त्या दोघींनीं तिचं सारं स्वप्न धुळीला मिळवलं होतं. मीं शेवटचं ज्या वेळीं तिला पाहिलं त्या वेळीं तिच्या डोळ्यांत संताप, निराशा आणि दुःख या भावनांची गर्दी झालेली होती. एकाद्या आरोपी व्यक्तीकडं पाहावं त्याप्रमाणं तिनं त्या वेळीं माझ्याकडं पाहिलं. तिची त्या वेळची ती विचित्र नजर आज या क्षणीं देखील मला स्पष्टपणें आठवत आहे. तिच्यासारख्या तरुण मुलीच्या जीवनांत त्या वेळीं मीं जें दुःख निष्कारण निर्माण केलं त्याविषयीं आज देखील माझ्या मनांत विचार येतात आणि वाटतं, त्या मुलीच्या जीवनांतील तें दुःख पुढं किती वर्षे तसंच टिकणार होतं कुणास ठाऊक ? ''

त्याची गोष्ट संपली होती. या वेळीं सर्वत्र काळोख पडला होता. आकाशांत चंद्र उगवला होता. परंतु या वेळीं तो ढगांआड लपलेला होता. एकमेकांशीं कांहीं न बोलतां आम्ही तसेच कांहीं-अंतर पुढं गेलों. माझ्या मित्रानें आतां पुनः बोलण्यास सुरुवात केली. तो म्हणाला, " संपली माझी गोष्ट. एकाद्या निष्णात लेखकाला हिच्या आधारें एकादी सुंदर गोष्ट नाहीं का लिहितां येणार ? ''

" लिहितां येईल कदाचित् ! तुम्हीं आजवर मला जें जें म्हणून सांगितलं आहे त्यांतील एक अत्यंत अमोल ठेव या दृष्टीनं मी तिचं खासच जतन करीन. परंतु येवढ्याच सामग्रीच्या आधारावर सहजासहजीं एकादी गोष्ट लिहितां येईल असं मात्र मला वाटत नाहीं. कारण, ही तर केवळ पुढं घडणाऱ्या घटनांची नांदी आहे. कुठल्याहि गोष्टीला शेवट असणं जरूर आहे. ''

" तुम्हांला काय म्हणयचं आहे तें माझ्या लक्षांत आलं. त्या मुलीचं पुढं काय झालं, ती घरीं परत केव्हां गेली, तिच्या जीवनांत हें जें नवीनच दुःख निर्माण झालं होतं त्याचं पुढं काय झालं, या गोष्टी समजून घेण्याची तुमची इच्छा दिसते. ''

" छे ! त्याविषयीं मी मुळींच विचार करीत नव्हतों. त्या तरुण मुलीच्या भवितव्याविषयीं आतां माझ्या मनांत बिलकुल उत्सुकता उरलेली नाहीं. तरुण मुलींची स्वतःविषयीं कांहींहि कल्पना असली तरी त्यांच्यांत आकर्षक असं कांहीं नसतं हेंच खरं ! त्या साऱ्या जणींचे अनुभव कृत्रिम असतात आणि म्हणून ते बहुधा एकाच प्रकारचे असतात. तुमच्या गोष्टींतील ती मुलगी कालांतरानं एकाद्या श्रीमंत पुरुषाशीं लग्न करील. आपल्या आयुष्यांतील एक उत्कट आठवण यापेक्षां जास्त तिला स्वतःला या घटनेविषयीं कांहींहि वाटणार नाहीं, हें मला माहीत आहे. त्या मुलीच्या भवितव्याविषयीं मी मुळींच विचार करीत नव्हतों. ''

" आश्चर्य आहे. त्या तरुणाविषयीं तुम्हांला उत्सुकता कां वाटावी हेंच मला समजत नाहीं. त्या मुलीची आणि त्याची योगायोगानं दृष्टिभेट झाली. त्यांत विशेष असं काय आहे ? प्रत्येक तरुणाच्या आयुष्यांत अशा गोष्टी घडतात; परंतु आपणांपैकीं बहुतेकांच्या लक्षांत त्या क्वचितच येतात आणि ज्यांच्या लक्षांत येतात ते कालांतरानं त्या विसरूनहि जातात. आयुष्यांत ज्या ज्या म्हणून गोष्टी आपल्या वांट्याला येतात, त्यांतील सर्वांत उदात्त आणि उत्कट गोष्टी याच असतात. केवळ योगायोगानं आपल्या वांट्याला येणाऱ्या या गोष्टी म्हणजेच आपल्या आयुष्यांतील खरी दौलत असते. परंतु दुर्दैवानं हें सारं आपल्या लक्षांत येतं वृद्धपणीं.''

" त्या तरुणाविषयीं मी मुळींच विचार करीत नव्हतों. ''

" तर मग कशाविषयीं विचार करीत होतां ? ''

" पत्र लिहिणाऱ्या त्या व्यक्तीचं पुढं काय झालं तें सांगावंसं मला वाटतं. कुठल्याहि प्रकारची किंमत दिल्याशिवाय एकाद्या व्यक्तीला, मग ती व्यक्ति कितीहि वयस्क असो, अशीं खोटीं प्रेमपत्रं लिहितां येतील किंवा प्रेमाचं असं एकादं नाटक रचतां येईल असं मला वाटत नाहीं. तो खेळ पुढं कसा










रंगत गेला, आपण केवळ एक खेळ खेळतों आहों अशी ज्या व्यक्तीची सुरुवातीला समजूत होती ती व्यक्ति स्वतःच पुढें त्या खेळांतील एक खेळणं कशी बनली याचं चित्रण करावं असं मला वाटतं. त्या मुलीच्या वाढत्या सौंदर्याकडं आपण केवळ निर्विकारपणेंच पाहत आहों अशी त्या व्यक्तीची सुरुवातीला तरी समजूत होती; परंतु त्याच सौंदर्याचा पुढं त्याला विलक्षण मोह पडला आणि तो स्वतःच त्या मोहजालांत गुरफटला गेला, असंच आपण क्षणभर समजू या. तो विचित्र खेळ संपला असं ज्या वेळीं त्याच्या लक्षांत आलं त्या वेळीं मात्र तो खेळ तसाच चालू राहावा, तीं खेळणं तसंच आपल्या स्वाधीन रहावं, अशी त्याला जबरदस्त इच्छा झाली, अशी कल्पना करा. पत्र लिहिणाऱ्या व्यक्तीच्या भावनांत हा जो बदल होत होता त्याचं चित्रण करण्यांत मला आनंद वाटला असता. कारण, प्रेमाची भावनाच अशी आहे कीं तिच्या प्रभावामुळं एकाद्या वयस्क व्यक्तीच्या भावना देखील एकाद्या तरुणाइतक्याच उच्छृंखल बनतात! त्या मुलीला भेटावं कीं न भेटावं याविषयीं त्याच्या मनाचा चटकन निश्चय होईना; अखेर त्यानं तिला भेटण्याचा मनाशीं निश्चय केला, परंतु अगदीं शेवटच्या क्षणाला त्याचा धीर सुटला असंच मीं दाखवलं असतं. ज्या ठिकाणीं आपण खेळाला सुरुवात केली त्याच ठिकाणीं ती मुलगी पुनः भेटेल या आशेनं तो परत आला; परंतु अखेर त्याची निराशाच झाली, असा मीं त्या गोष्टीचा शेवट केला असता. आणि तो शेवट.....''

'' खोटं आहे, हें सर्वस्वीं खोटं आहे. ''

मी एकदम दचकलों. त्याचे ते शब्द मला एकाद्या धमकीप्रमाणं वाटले. ते शब्द उच्चारतांना एकाएकीं त्याचा आवाज अत्यंत कठोर झाला होता. त्या गोष्टीच्या शेवटाविषयीं निरनिराळे तर्कवितर्क करीत असतांना नकळत मीं नेमकं त्याच्या जखमेवरच बोट ठेवलं होतं हें आतां माझ्या लक्षांत आलं. मीं त्या गोष्टीचा जो शेवट केला होता तो ऐकून त्याला इतकं जबरदस्त आश्चर्य वाटलं कीं क्षणभर तो जागच्या जागींच थबकला. त्याच्याकडं नजर जातांच एकाएकीं माझं लक्ष त्याच्या पांढऱ्या झालेल्या केसांकडं गेलं आणि मला अतिशय वाईट वाटलं.

नकळत मी जें कांहीं बोलून गेलों होतों त्याविषयीं खुलासा करण्याचा मीं प्रयत्न केला, परंतु त्यानं मला तसा कांहीं प्रयत्नच करूं दिला नाहीं. या वेळपर्यंत त्यानं आपल्या मनावरचा तोल सांवरला होता. त्यानं पुनः बोलण्यास सुरुवात केली. या वेळीं त्याचा आवाज अगदीं शांत आणि गंभीर वाटत होता खरा, परंतु त्याच्या आवाजांत आतां कसल्या तरी दुःखाची छटा मात्र प्रत्ययाला येत होती.

'' कदाचित् तुम्ही म्हणतां तेंच बरोबर असेल! गोष्टीचा शेवट करण्याचा तोहि एक उत्कृष्ट मार्ग आहे यांत शंकाच नाहीं. मला वाटतं बॅल्झाकनंच कुठं तरी म्हटलं आहे कीं, प्रेमाची किंमत तरुणांपेक्षां वयस्क व्यक्तींनाच अधिक द्यावी लागते. ...... त्यानं लिहिलेल्या एका अत्यंत हृदयस्पर्शी गोष्टीचं तें नांव आहे आणि याच नांवाखालीं आणखी किती तरी लिहितां येणं शक्य आहे. परंतु ज्यांना या साऱ्या गोष्टींची जाणीव असते अशा वयस्क व्यक्ती मात्र बहुधा स्वतःच्या यशाविषयींच बोलतांना आढळतात. यश आणि अपयश या साऱ्या योगायोगाच्या गोष्टी आहेत याची त्यांना कल्पना असते, नाहीं असं नाहीं; परंतु या अपयशामुळं स्वतःच्या व्यक्तित्वाला निष्कारण कलंक लागेल असंच त्यांना वाटत असतं. कॅसनोव्हानं आपल्या स्वतःच्या आयुष्याविषयींच्या ज्या आठवणी लिहिल्या आहेत त्यांतील जीं प्रकरणं गहाळ झालीं आहेत तीं नेमकीं त्याच्या स्वतःच्या अपयशांविषयींच असावीं हा केवळ योगायोग आहे असंच तुम्हांला वाटतं का? स्वतःच्या अपयशाविषयीं लिहिण्याची त्याची कदाचित् इच्छाच नसेल! कुणीं सांगावं? ''

इतका वेळपर्यंत त्याच्या आवाजांत प्रत्ययाला येणारी उत्सुकता आतां पार मावळली होती! त्यानं आपला हात माझ्यापुढं केला आणि तो म्हणाला, '' गुड नाइट. रात्रीच्या वेळीं एकाद्या तरुणाला अशा गोष्टी सांगणं धोक्याचं असतं. कारण, अशा



अनुक्रमणिका








गोष्टीमुळं त्या तरुणाचं मन भ्रान्त आणि विचित्र कल्पनांनीं बेचैन होण्याचा संभव असतो. अच्छा. गुड नाइट."

तो अंधारांत तसाच पुढं चालत गेला. त्याच्या चालण्यांत एक प्रकारची मिजास अद्याप देखील प्रत्ययाला येत होती; परंतु वयोमानामुळं त्याचीं पावलं मात्र सावकाश पडत होतीं. या वेळीं रात्र बरीच झाली होती. एकादी विचित्र गोष्ट घडली कीं माणसाचं मन कसं बेचैन होतं! आणि आज माझं मन देखील असंच बेचैन झालं होतं. अशा या दमट हवेंत इतर वेळीं मला जसा थकवा वाटला असता, तसा तो या वेळीं वाटला नाहीं. या वेळीं रस्त्यावर रहदारी बिलकुलच नव्हती; एकाएकीं सर्वत्र सामसूम झालं होतं. त्याच रस्त्यानं फिरत फिरत मी कॅरलोटा व्हिलापर्यंत गेलों. कॅरलोटा व्हिला आणि समोरचं सरोवर यांच्यामध्यें ज्या पायऱ्या पसरलेल्या आहेत त्यांपैकीं एका पायरीवर जाऊन मी बसलों. हवेंतल्या गारठ्यामुळं त्या पायऱ्या गार लागत होत्या. रात्रीचा तो समय अत्यंत सुंदर होता. बेलागिओ येथील जे दिवे जवळच आहेत असं क्षणापूर्वी वाटत होतं ते किती तरी दूर आहेत असं आतां वाटूं लागलं. या वेळीं चन्द्रप्रकाशांत तें सरोवर एकाद्या मौल्यवान् रत्नाप्रमाणं सुंदर दिसत होतं. पांढऱ्या शुभ्र हातांप्रमाणं दिसणाऱ्या लाटा स्वैरपणें सरोवराच्या खालच्या पायऱ्यांवर नाचत होत्या. आकाशांत चांदण्या चमकत होत्या. आकाशाकडे नजर जातांच एकाएकीं माझ्या मनांत विचार आला: आकाशाची पोकळी खरंच किती अनंत आहे! आजवर कुणालाच तिचा पत्ता लागलेला नाहीं. आकाशांतील एकादा तारा निखळून एकाद्या खोल दरींत, एकाद्या पर्वतावर किंवा खोल अशा एकाद्या समुद्रांत पडावा, तसंच मला या वेळीं वाटलं. आकाशांतून तारा निखळून पडला कीं एकाएकीं त्याचं दगडांत रूपांतर होतं. आपल्याला अज्ञात अशी एक शक्ति आपलं भवितव्य घडवीत असते आणि त्या ताऱ्याचं भवितव्य तीच शक्ति घडवीत असते!

---

सैनिकांकरितां खास बोलपट दाखविण्यांत येणार होता. सर्व व्यवस्था सैनिकांच्या हातांत असल्यामुळें बोलपट नक्की सव्वाआठला सुरू होणार याविषयीं सर्वांची खात्री होती. सैनिक तिकिट काढून वेळेवर हजर राहिले. ८। झाले. परंतु पडदा उघडून बोलपट सुरू होईना. ८ वाजून २९ मिनिटें झाली, तरी नाहीं. जमलेले लोक अधीर होऊं लागले होते. चालू असलेल्या संगीतामधून त्यांचा गोंगाट व शिट्ट्या ऐकूं येत होत्या. इतक्यांत लोकांना पाठीमागील रांगांतून गडबड ऐकूं आली. त्यांनीं मागें वळून पाहिलें. आतांपर्यंत रिकाम्या असलेल्या पहिल्या दोन रांगा भरत होत्या. एकदम नाटयगृहांतून टाळ्यांचा कडकडाट ऐकूं आला. जनरल मार्शल हे आलेले दिसले. त्यांचें प्रेक्षकांनीं उत्स्फूर्त स्वागत केलें होतें. जनरल मार्शल मागें येऊन शांतपणें बसले. दिवे अंधुक झाले. एकदम शांतता पसरली. बोलपट सुरू झाला. त्या क्षणीं जनरल मार्शल आपल्याबरोबर असलेल्या महिलेशीं हळूच बोलतांना पुढील रांगेंतील कांहीं लोकांना ऐकूं आलें, "काय योगायोग! आपण अगदीं वेळेवर आलों, नाहीं?"








# मराठी निबंध : विष्णुशास्त्री ते विनोबा

डॉ. माधव गोपाळ देशमुख

एथौनि शब्दश्री भली शास्त्रिक
आणिक महाबोधीं कोवाळिक। दुणावली ॥
—ज्ञानेश्वर.

' निबंध ' हा शब्द दृष्टीस पडतांच मराठींतील सामान्य सुशिक्षित वाचकांस देखील इंग्रजींतील त्या शब्दाचा पर्याय ' Essay ' हा शब्द आठवणें अगदीं स्वाभाविक आहे. परंतु इंग्रज लोकांच्या आगमनापासून तों निर्गमनापर्यंतच्या शेंदीडशें वर्षांच्या काळांत क्रमशः विकसित झालेल्या मराठी निबंधाचा इतिहास जरा बारकाईनें पाहिला तर आपणांस ' निबंध ' आणि ' एसे ' यांच्या चेहऱ्यामोहऱ्यांत साम्यापेक्षां विरोधच अधिक आढळून येईल. किंबहुना असें काल्पनिक साम्य गृहीत धरून केलेल्या विवेचनामुळें मराठींतील निबंधविषयक वाङ्मयांत मोठे गमतीदार प्रकार निर्माण झाले आहेत.

वस्तुतः यूरपमध्यें ' एसे ' हा वाङ्मयप्रकार मॉंटेन् या फ्रेंच लेखकानें १५७१ सालींच सुरू केला व तो मराठी निबंधकारांना ज्ञातहि होता. पण तिकडे 'एसे' हा एक ललितवाङ्मयप्रकार म्हणून वाटला, तर मराठींतील निबंधाचें स्वरूप वाङ्मयीन असलें तरी त्यांत लालित्याऐवजीं गांभीर्यच प्रामुख्यानें आढळून येईल. मराठी निबंधकारांचा पिंड केवळ ललित वाङ्मय निर्माण करणाऱ्या कलावंताचा नसून रचनाबद्ध, वस्तुनिष्ठ व कसलेल्या शैलीनें आपले बिचार व्यक्त करणाऱ्या साहित्याचार्यांचा आहे व याचें कारणहि उघड आहे. ज्ञानेश्वरादिकांनीं गौरविलेल्या मऱ्हाटीला ' केवळ कलाविलास ' करण्याला फारशी फुरसत अशी मिळालीच कधीं ! त्यामुळेंच शब्दश्री असली तरी ती 'शास्त्रिक' असावी व उलटपक्षीं 'महाबोध' असला तरी त्यांत 'कोवळीक' असावी, हा उच्च वाङ्मयाचा ज्ञानेश्वरप्रणीत आदर्श आजवरच्या मराठी निबंधकारांनीं सोडला नाहीं.

## संस्कृत वाङ्मय व निबंध

खुद्द निबंध या शब्दाची मूळपीठिका हीच गोष्ट सिद्ध करील. हा शब्द मूळ संस्कृतांतील. त्याचा धात्वर्थ ( निबध्यते अस्मिन् इति नि + बन्ध् + ल्युट्, अधिकरणे निबन्धनम् ) म्हणजे जींत विषय गोंवला जातो ती रचना, असा आहे. संस्कृत वाङ्मयांत हा शब्द वाङ्मयरचना अशा अर्थानें सुप्रसिद्ध ' वासवदत्ता ' या गद्यकथेचा कर्ता सुबंधु यानें प्रथमतः वापरलेला दिसतो. आपल्या ' वासवदत्ते 'च्या प्रस्तावनेच्या शेवटीं तो

सरस्वतीदत्तवरप्रसादः चक्रे सुबन्धुः सुजनैकबन्धुः
प्रत्यक्षरश्लेषमयप्रबन्धविन्यासवैदग्ध्यनिधि**र्निबन्धम्** ॥

म्ह. " सरस्वतीनें आपला वरद हस्त ज्याच्या मस्तकीं ठेवला आहे व त्यामुळें प्रत्यक्षरीं श्लेष साधून शब्दरचना करण्याचें अपार चातुर्य ज्याच्या ठायीं वसतें आहे, असा सज्जनैकबन्धु सुबन्धु पुढील ' **निबंध** ' रचिता झाला" असें म्हणतो. ' वासवदत्ता ' व मराठी निबंध हे दोन्ही गद्यवाङ्मयप्रकार आहेत, याखेरीज त्यांचा परस्पर कांहींच संबंध नाहीं. तथापि सुविख्यात बाणाच्या ' कादंबरी 'वरून आजच्या मराठींत कादंबरी हा सर्वसामान्य शब्द रूढ झाला, त्याचप्रमाणें दुसरा एक सुविख्यात गद्यलेखक सुबंधु याच्या 'निबंधा'वरून एका निराळ्याच वाङ्मयप्रकारासाठीं ' निबंध ' हा शब्द रूढ झाला हा योगायोग खरोखरच मोठा कुतूहलजनक आहे !












• संस्कृत 'शिशुपालवध' महाकाव्याचा कर्ता माघ यानेंहि आपल्या काव्यांत 'निबंधन' हा शब्द पुढील श्लोकांत 'भाष्यग्रंथ' व 'शाश्वत दान' अशा श्लिष्ट अर्थानें उपयोजिला आहे:—

अनुत्सूत्रपदन्यासा सद्वृत्तिः **सन्निबन्धना**
शब्दविद्येव नो भाति राजनीतिरपस्पशा ॥ २, ११२.

संस्कृत काव्याप्रमाणें संस्कृत 'दर्शन'कारांनींहि आपापल्या छोट्या–मोठ्या सार्‍या लेखांना निबंध या संज्ञेनेंच संबोधिलें आहे. उदाहरणार्थ, वाचस्पतिमिश्र (इ.स. ८४१) याचा न्यायसूचि निबंध किंवा विश्वरूप (इ. स. १५२०) याचा पाणिनिदर्शनासंबंधीं विश्वरूप–निबंध. यांशिवाय धर्मशास्त्रावरील निबंध-चंद्रिका, निर्णयसिन्धु, धर्मसिन्धु हे ग्रंथहि 'निबंध' ह्याच नांवानें सुप्रसिद्ध आहेत. या निबंधांत स्मृति-ग्रंथांतील एकाद्या विवाद्य मुद्द्यावर साधक–बाधक प्रमाणें देऊन निबंधकाराच्या विशिष्ट मताचें प्रतिपादन केलेलें असतें.

## अधिकरण व निबंध

संस्कृतांत निबंध या संज्ञेची विशिष्ट अशी व्याख्या आढळत नाहीं, पण निबंधासारखाच 'अधिकरण' हा शब्द संस्कृतांत आढळतो, त्याची मात्र मीमांसकांनीं अशी व्याख्या केली आहे:—

विषयो विशयश्चैव पूर्वपक्षस्तथोत्तरम् ।
निर्णयश्चेति पञ्चांगं शास्त्रेऽधिकरणं स्मृतम् ॥

व्यास आणि जैमिनि यांचीं सूत्रें अध्यायांत विभागलीं असून प्रत्येक अध्यायांत कांहीं पाद व प्रत्येक पादांत कांहीं अधिकरणें (किंवा विभाग) असतात. 'अधिकरणा'चीं पांच अंगें वरील श्लोकांत दिलीं आहेत, तीं अशीं:— १ विषय म्हणजे प्रतिपाद्य वस्तु, २ विशय म्हणजे संशय, विषयासंबंधीं मनांत येणार्‍या शंका ३ पूर्वपक्ष म्हणजे विरुद्ध बाजूचे मुद्दे ४ उत्तर किंवा उत्तरपक्ष म्हणजे सिद्ध करावयाचें प्रमेय आणि पूर्वपक्षाला प्रतिकूल असलेले मुद्दे आणि ५ निर्णय म्हणजे दोन्ही पक्षांचे अनुकूल प्रतिकूल युक्तिवाद तोलून पाहून फलित झालेला निश्चय किंवा अंतिम सिद्धांत. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे एकादा विषय घेऊन साधकबाधक युक्तिवादानें त्याची सांगोपांग चर्चा करणारा लेख म्हणजे अधिकरण होय.

आजच्या मराठी निबंधाचें मूळ बहुतांशीं आपणांस संस्कृतांतील निबंधांत आणि संस्कृत दर्शनांतील वर वर्णन केलेल्या अधिकरणांत सांपडतें.

## प्राचीन मराठी व निबंध

'निबंध' हा शब्द संस्कृतांतूनच मराठींत आला. विष्णुशास्त्री चिपळूणकरांची 'निबंधमाला' सर्वश्रुतच आहे. तथापि त्यापूर्वींहि अनेक ठिकाणीं हा शब्द वापरला गेला आहे. 'मराठी निबंध' या पुस्तकांत प्रा. म. वि. फाटक यांनीं दिलेल्या माहितीप्रमाणें चिपळूणकरांच्या फार पूर्वीं म्हणजे १८४३पासूनच हा शब्द रूढ झाला होता. "जुन्या मराठी वाङ्मयांत हा शब्द आढळेल असें वाटत नाहीं" हा प्रा. फाटक यांचा तर्क मात्र चुकीचा आहे. कारण, प्राचीन मराठी गद्यग्रंथ महीमभट्टकृत 'लीलाचरित्र' (एकांक) यांत "निबंध काढविले" (पृ. ९) असा स्पष्ट उल्लेख आहे. त्याचप्रमाणें दुसराहि एक प्राचीन महानुभाव ग्रंथकार गोपाळ कवि यानें आपल्या 'रुक्मिणी–स्वयंवर' नामक काव्याच्या प्रस्तावनेंत

सकळ मूळें अव्हेरिती । प्रतिष्ठानीं **निबंध** पढती
तेथ शुद्ध मराठी वर्तती । म्हणोनियां ॥

या ठिकाणीं निबंध हा शब्द वापरलेला आहे. या उद्गारावरून गोपाळ कवीच्या काळांत प्रतिष्ठान (पैठण) हें शुद्ध मराठीचें मूळ असून तेथें मराठी निबंधकार आपले निबंध वाचून पारखून घेत असत हें स्पष्ट दिसतें.

संस्कृतांतील निबंधांचें किंवा अधिकरणांचें स्वरूप अगदीं रेखीव आणि काटेकोर आहे; त्यांत आत्माविष्काराच्या कलेला मात्र मुळींच वाव दिसत नाहीं. प्राचीन मराठींत निबंध हा शब्द क्वचित् आढळला तरी त्याची निश्चित कल्पना आज करतां येत नाहीं. किंबहुना आजच्या कल्पनेप्रमाणें अव्वल इंग्रजींत होऊन गेलेल्या मिसेस् फरार, रे. विल्सन, छत्रे, महाजन, जांभेकर, गुंजीकर, कृष्णशास्त्री चिपळूणकर, इतकेंच काय, पण लोकहितवादी यांच्याहि लेखांना 'निबंध' ही संज्ञा देणें फारसें उचित होणार नाहीं. 'ज्ञानप्रसारकां'तील (इ. स. १८५०) व्याख्येप्रमाणें "कोणताहि विषय न्यायरीतीनें उद्घाटून आणि त्याची यथाशक्ति जुळणी करून जें वर्णन










करणें तो निबंध होय ". या निबंधाच्या कल्पनेंत यांपैकीं पुष्कळांचे लेख बसतील यांत शंका नाहीं. येवढें कशाला, १८७०मध्यें प्रसिद्ध झालेल्या ' मराठी भाषेचा नवा कोश ' यांत वरील प्रकारच्या लेखावरून निबंध शब्दाचा अर्थ " कांहीं एक गोष्टीवर बांधल्याप्रमाणें लिहिलेलें जें व्याख्यान तो " असा दिला आहे.

चिपळूणकर पूर्वकालीन निबंधसदृश लेखांत केवळ विषयाचें उद्घाटन व त्याची यथाशक्ति जुळणीच काय, पण लोखंडाच्या गोळ्याप्रमाणें थंड झालेल्या तत्कालीन महाराष्ट्राचें चित्रण आहे व त्या अडाणी महाराष्ट्राला शहाणा करून सोडण्याची तळमळहि आहे. पण राजशेखराच्या उक्तीप्रमाणें वक्ता, शब्द, अर्थ व रस असूनहि त्यांत वाङ्मयीन माधुर्याचा परिपाक मात्र नाहीं[1]. ! प्रा. वि. वा. आंबेकरांच्या मताप्रमाणें " सांगितलेली विद्या आणि दिलेली शिदोरी या पद्धतीवर हें सारें लेखन झालें. त्यांत आत्मीयता, स्वतःच्या मनाशीं मतें पक्कीं करून घेण्याची प्रवृत्ति, आपली बुद्धि विशेष प्रखरपणें व्यक्त करण्याची लालसा, स्वतःच्या सामाजिक सृष्टीशीं समरस होण्याची भावनाशीलता, वाङ्मयीन आनंद उत्पन्न करण्याची एकतानता, लेखनशैलीचा प्रासादिकपणा आणि मांडणीचें लालित्य अंगीं जडवून घेण्याची परिश्रमशीलता इत्यादि कोणतेच गुण दिसत नाहींत[2] ".

## मराठी निबंधांचे विशेष

वाङ्मयीन स्वरूपाच्या निबंधनिर्मितीसाठीं कोणकोणते प्रमुख गुण आवश्यक आहेत हेंहि वरील उताऱ्यांत ओघानेंच सूचित झालें आहे. मराठी निबंधाचे आद्य प्रवर्तक विष्णुशास्त्री चिपळूणकर यांच्यापासून तों त्यांत सकस भरीवपणा आणणाऱ्या आचार्य विनोबांपर्यंतच्या निबंधकारांच्या श्रेष्ठ कृती आपण वरवर चाळून पाहिल्या तरी त्यांचीं कांहीं प्रमुख वैशिष्ट्यें स्थूलमानानें आढळून येतील:—

(१) निबंधांचे विषय गंभीर, प्रतिष्ठित, समाजोपयोगी व भरदार निवडलेले आहेत. त्यांनीं कधींहि साध्या, क्षुल्लक, बेचव व दुर्बल विषयांवर निबंध लिहिले नाहींत.

(२) विषयाची मांडणी मुद्देसूद, रचनाबद्ध व नेहमींच प्रतिपाद्य विषयाला धरून आहे. क्वचित् अनुषंगानें कांहीं अवांतर माहिती आली असेल; पण बुद्ध्या वा अनवधानानें कोठेंहि विषयांतर केलेलें नाहीं.

(३) मराठी निबंधकार केव्हां अप्रत्यक्ष उपदेशक, केव्हां विवेचक, केव्हां तत्त्वमीमांसक, तर केव्हां सृष्टिवर्णनकार होऊन लेखन करतो. अर्थात् कांहीं ठिकाणीं पांडित्य, कधीं परमतध्वंसनाचा आवेश वा उपहासाची बारीक लकेर, कोठें प्रतिपक्षाविषयीं अधिक्षेप तर केव्हां अभिजात रसिकता वा सहृदय मानवता हे गुणविशेष प्रकृतिभिन्नतेमुळें आढळणारच; पण त्या गुणांचा परिपाक कमावलेल्या शैलीमुळें सहजगत्या विषयप्रतिपादनाच्या ओघांत व्यक्त होईल तेवढाच. मराठी निबंधकाराची भूमिका केवळ गुजगोष्टी, मनोविनोदन किंवा परिहासविजल्पन करणाऱ्या गोष्टीवेल्हाळांची कधींहि आढळणार नाहीं. किंबहुना वाचकांशीं सलगी करणें त्याच्या गांवींहि नाहीं.

(४) निबंधाच्या प्रारंभापासून अखेरपर्यंत कांहीं एक उद्दिष्ट हेतु मनांत धरून त्याच्या साफल्यासाठींच निबंध–लेखनाचा संसार मांडलेला. त्यामुळें निबंधाची सुरुवात वाचकांच्या मनाची पकड घेणारी, पण विवेचनांत शैथिल्य नाहीं. निरनिराळ्या युक्तिवादांनीं विषयाची छाननी करून त्यावरून फलित होणारा निष्कर्ष शक्य तों बुद्धिवादानें वाचकांच्या मनांवर ठसविलेला आहे. त्यांचा निबंध वाचून झाल्यावर, आपण कांहीं तरी नवीन वाचलें, आपणांस निराळाच दृष्टिकोण समजला, आपलें विचारांचें क्षितिज वाढलें अशी वाचकांची मनोमन खात्री पटते.

(५) उच्च प्रकारचा वाङ्मयगुण उतरविण्यास आवश्यक येवढें (व येवढेंच) निबंधकाराचें व्यक्तिमत्त्व त्याच्या निबंधांतून खास उमटलेलें दिसेल; पण तो कोठें स्वयंकेन्द्रित झाला आहे किंवा त्याला

१ सति वक्तरि सत्यर्थे शब्दे सति रसे सति ।
अस्ति तन्न विना येन परिस्रवति वाङ्मधु ॥—काव्यमीमांसा, ५, २२.

२ ' मराठी साहित्य ' (पुणें, १९४५.), पृष्ठ ८६.








आत्मचित्र काढण्याचा किंवा आत्मचरित्र वा आत्मानुभव वाचकांच्या माथीं मारण्याचा मोह झालेला आहे असें मराठी निबंधांत सहसा आढळणार नाहीं. विषयप्रतिपादनाच्या एकनिष्ठेंत निबंधकार आपलें व्यक्तित्व, आपला अहंभाव, आपला मीपणा सर्वस्वीं लोपवून टाकतो व त्याच्या आत्माविष्काराच्या प्रवृत्तींचें व अहंगंडाचें जणूं कांहीं उदात्तीकरणच झालें आहे, असाच सर्वत्र अनुभव येतो.

### इंग्रजी 'एसे'ची कल्पना

मराठी निबंधाचीं हीं वैशिष्ट्यें निरखून तुलनेसाठीं आपण जरा इंग्रजी 'एसे'कडे वळलों तर असें दिसेल कीं, सगळेंच मुसळ केरांत! येथील निबंध (एसे) हा मुळीं निबंधच नाहीं; त्याला ना विषयाचा ताळ, ना मांडणीचें तंत्र! सगळाच अनिर्बंध कारभार!! वास्तविक 'Essai' या मूळ फ्रेंच शब्दाचा अर्थ प्रयत्न असा आहे. पण खुद्द 'एसे'-मध्यें प्रयत्नापेक्षां प्रयत्नाचा अभावच प्रामुख्यानें जाणवतो. कोठें विष्णुशास्त्री ते विनोबा यांचे विषयनिष्ठ, विचारपारिपक्व व डौलदार निबंध आणि कोठें इंग्रजी एसेमधली मनाची बेताल लहर व ती अनिर्बंध आणि अपरिपक्व कृति[3] !!!

(१) मराठी निबंधांचे विषय भारदस्त व सुप्रतिष्ठित, तर विषयाच्या बाबतींत 'एसे'चा मुळीं बाणाच हा कीं खास विषयच नको किंवा अमुक एक विषय परका असेंहि नाहीं.[4] वाटेल तो विषय चालतो[5]. आधुनिक इंग्रजी एसे–लेखक गार्डिनर म्हणतो, "मला लिहिण्याची हुक्की आली कीं मी लिहितोंच. विषयबिषय कशाला पाहिजे? हॅट अडकविण्यासाठीं कोणतीहि खुंटी चालेल; हॅट ही मुख्य गोष्ट![6] मुक्तिदिनापासून तों साध्या कात्रीपर्यंत वाटेल तें, रस्त्यावर पडलेली टांचणी देखील, 'एसे'-चा विषय होऊं शकतें.[7] लेखनशुद्धि, विद्वत्व आणि कवित्व, वल्लभोपासना, राष्ट्रीय महोत्सव, मासाची भवितव्यता असले भारदस्त विषय हवे कशाला?–असा त्यांचा खाक्या!

(२) बरें, विषयाला धरून कांहीं व्यवस्थित लिहितील म्हणावें तर, म्हणे, उत्तम 'एसे' म्हणजेच विचाराची अति उल्लसित अशी हलुवार घडण[8]; एसे लिहिणाऱ्याचें कर्तव्यच मुळीं विषयापासून दूर पळण्याचें; त्याला पुष्टि देण्याचें नव्हे![9] विचारा बेकन! येवढा प्रातिभासंपन्न गद्य शैलीकार! त्याची ती भरघोस भाषा व 'एक घाव दोन तुकडे' करणारी तीक्ष्ण विवेचनशक्ति! पण इंग्रजी टीकाकाराच्या मतें, बेकनचा आत्माच मुळीं खऱ्या 'एसे'–लेखकाचा नव्हता![10] कां? तर म्हणे तो सकस आणि समंजस आहे आणि विषयाच्या सत्यदृष्टीपासून कधीं ढळत नाहीं! जी गत बेकनची तीच महापंडित मेकॉलेची. तोहि आपल्या लेखांना 'एसेज' हेंच नांव देतो; पण टीकाकारानें कुरापत काढलीच! त्याचे ऐतिहासिक व वाङ्मयात्मक निबंध ज्ञानांत भर टाकणारे होते; पण त्यांत विषयाची धरसोड कोठें आहे? त्यानें मुख्य उद्दिष्टावरच आपलें लक्ष केंद्रित केलें. एसेला आवश्यक असलेली फुरसतीची थंड वृत्ति त्याची नाहीं आणि विषयांतर तो करीत नाहीं.[11]

(३) यावरून हें दिसून येईल कीं, जो पुष्कळसें विषयांतर करीत नाहीं, त्याला एसेच्या क्षेत्रांत मज्जाव आहे. बेकन–मेकॉलेंच्याप्रमाणेंच कौले, ॲडिसन् व डॉ. जॉन्सन यांचेंहि पुष्कळसें लिखाण टीकाकारांच्या मताप्रमाणें एसेच्या क्षेत्राबाहेरचेंच.

---

3 An essay is a loose sally of the mind ... an irregular, undigested piece.
—Dr. Johnson

4 No subject is special to it, none alien from it.—'The Essay'—Orlo Williams, p. 9.

5 Any subject will suffice.—A. C. Benson.

6 Alpha of the Plough : "On Catching the Train." p. 34.

7 Introduction to ENGLISH ESSAYS : Robert Lynd, p. 10.

8 "It is the most delightfully airy mould of thought." —Orlo Williams, p. 9.

9 "It is the business of the essayist to flit and not to pad."—*Ibid*, p. 42.

10 "He was not at heart an essayist at all"—*Ibid*, p. 26.

11 "His eye is always on the main purpose....His business was not to be leisurely and discursive.—*Ibid*, p. 48.

ॲडिसन् हा अंशतःच मान्य; पण एसे-लेखक या दृष्टीनें डॉ. जॉन्सन् हा असह्य कंटाळवाणा ठरला.[12] कार्लाइल व रस्किन् हे शैलीप्रभू असूनहि केवळ असंबद्ध भावनाप्रलाप (rhapsodies) करणारे, म्हणून बाजूला सारले गेले. कारण हेंच कीं एसे लिहिणाराची भूमिकाच मुळीं चतुरालाप करणाऱ्या स्नेह्याची व कलावंताची, विचाराला चालना देणाऱ्या प्राध्यापकाची नव्हे ![13] एसेचा लेखक विचाराचा एक स्फटिककण घेतो; पण शास्त्रज्ञाप्रमाणें तो त्याचें रासायनिक पृथक्करण व त्याची इतर रासायनिक द्रव्यांशीं तुलना करीत नाहीं, तर एकाद्या चलाख रत्नपारख्याप्रमाणें त्याचा एक एक पैलू घासून पुसून प्रकाशांत धरतो आणि लोकांच्या सौंदर्यदृष्टीचें आकर्षण करून त्यांना तो आपल्याजवळ कायमचा ठेवावासा वाटेल अशा युक्त्याप्रयुक्त्या योजतो. एसे ही लेखकाच्या बुद्धिसामर्थ्याची कसोटी नसून त्याच्या मनोभावनेची कसोटी आहे. किंबहुना तो लेखक विनोदी असो, कवि असो, विदूषक असो, साधा प्रवासी असो किंवा थापाड्या असो, त्याचा एसे म्हणजे त्याचा स्वतःचा कबुलीजबाब असतो.[14]

(४) आतांच पाहिल्याप्रमाणें मराठी निबंध म्हणजे अथपासून इतिपर्यंत एक सहेतुक सुसूत्र विषय-निरूपण असतें; उलट पक्षीं इंग्रजी 'एसे' हा एक अहेतुक कलाकृति म्हणूनच जन्माला आला. एसे-लेखक हा जितका अहेतुक तितकाच विषय-प्रतिपादनाबाबत व निष्कर्षाबाबत उदासीन किंबहुना निष्काळजी असावा असा मुळीं दंडकच ठरलेला ![15] तो सर्व गोष्टींवर प्रकाश पाडूं शकतो; पण त्यानें कांहींहि सिद्ध करण्याच्या भानगडींत पडूं नये.[16] किंबहुना कोठें सिद्धांत सांपडले, कांहीं मतप्रदर्शन मांडलेलें आढळलें, कांहीं वस्तुस्थितीचें वर्णन दिसलें, कांहीं प्रवृत्तींचें दिग्दर्शन केलेलें असलें, कीं तो एसेचा प्रांत नाहीं असें खुशाल समजावें ! निबंध आणि एसे यांची सुरुवात आणि अखेर यांत किती तफावत असेल याची यावरून सहज कल्पना करतां येईल. मराठी निबंधांत 'काय सांगितलें आहे ?' ही गोष्ट मुख्य, तर इंग्रजी एसेचें 'कसें सांगितलें आहे ?' हेंच खरेंखुरें वैशिष्ट्य. अर्थात् तत्त्वशोधन हा एकाचा प्रमुख हेतु, तर सौंदर्यदर्शन हें दुसऱ्याचें सर्वस्व.

(५) मराठी निबंध हा वाङ्मयाचा एक तत्त्व-बोधप्रधान भाग म्हणून वाढला. त्यांत लेखकाच्या व्यक्तिमत्त्वाला वाव आहे; पण तो, वाङ्मय-गुण येण्यासाठीं अपरिहार्य असेल तेवढाच. उलट पक्षीं इंग्रजी एसेचा रोख आत्मनिष्ठापूर्वक गुजगोष्टी सांगण्याचा[17]. 'एसे'चा आद्य प्रवर्तक मॉंटेन् स्पष्टच लिहितो, "माझें उद्दिष्टच हें कीं एसे मध्यें माझें खरेंखुरें व्यक्तित्व साध्यासुध्या व निर्भेळ रीतीनें चित्रित व्हावें. तेथें युक्तिवाद नको, हिकमत नको किंवा साक्षेप नको. कारण मी चित्रण करतों तें माझें स्वतःचेंच असतें."[18] 'कला म्हणजे व्यक्तित्वाचा आविष्कार' ही व्याख्या मॉंटेनप्रणीत एसे-वाङ्मयाला यथास्थितपणें लागू पडते. कारण, एसेला हेतु असतो असें म्हणणें शक्य असेल तर तो विषयाचें उद्घाटन करणें हा नसून लेखकाच्या व्यक्तित्वाचें उद्घाटन करणें हा होय.[19]

---

12 Addison is admirable in selections; but Dr. Johnson is insufferably tedious.
—*Ibid*, p. 34.

13 The true essayist handles his subject like an artist and not like a professor.
—*Ibid*, p. 18. et. seqq.

14 Be he a wit, a poet, a buffoon, a plain journeyman or a mere windbag, his essay will be his own confession.—*Ibid*, p. 9

15 " A man who sits down to write an essay should be careless as to whether his task shall ever be finished or not. "—R. Middleton.

16 It should set out to prove nothing but can illuminate anything.
—Orlo Williams, pp. 9 and 13.

17 The tone of essay should be personal and confidential.—Edmund Gosse.

18 " I desire therein to be delineated in mine own genuine, simple and ordinary fashion; without contention, art or study; for, it is myself I portray." —Montaigne.

19 His aim, if we can call it such, is to reveal, not his subject but himself.
—Prof. Wodehouse.

अर्थात् एसे हा लिरिक् ( भावगीत ) आणि मॅानोलॉग् ( नाट्यछटा ) यांचा सहोदर होय. ललित वाङ्मयाचा तो एक स्वतंत्र प्रकार आहे.

## निबंध आणि एसे यांची प्रकृतिभिन्नता

मराठी निबंध आणि इंग्रजी एसे यांच्या अंतर्बाह्य स्वरूपांतील हें महदन्तर स्थूलमानानें अगदीं थोडक्यांत असें मांडतां येईल:—

| नांव | निबंध | एसे |
|---|---|---|
| १ प्रारंभकाल | जानेवारी १८७५. | मार्च १५७१. |
| २ आद्यप्रवर्तक | विष्णुशास्त्री चिपळूणकर. | मॉंटेन्. |
| ३ स्वरूप | स्वीकृत विषयाचें मुद्देसूद उद्‌घाटन | बेछूट लहरीचा अनिर्बंध चाळा. |
| ४ मांडणी | विषयाला धरून, बांधेसूद व समतोल. | विषयाला सोडून, विस्कळित व खेळकर. |
| ५ भूमिका | तत्त्वविवेचक मीमांसकाची. | गोष्टीवेल्हाळ खेळगड्याची. |
| ६ उद्दिष्ट हेतु | सुसूत्र विषयविवेचन, सम्यक् समाजदर्शन | { विशिष्ट हेतु असा नाहींच; मानला तर, व्यक्तित्वाचा आविष्कार. |
| ७ दृष्टिकोण | विचारप्रधान, बहिर्मुख. | विकारप्रधान, अंतर्मुख. |
| ८ प्रवृत्ति | वस्तुनिष्ठ, अहंगंडाचें उदात्तीकरण. | आत्मनिष्ठ, अहंभावनेची अभिव्यक्ति. |
| ९ वाङ्मयप्रकार | बोधप्रधान, गंभीर. उदा०, चरित्र, इतिहास, व्याख्यान, अग्रलेख इ० | रसप्रधान, ललित. उदा०, भाव–गीत नाट्यछटा, सुनीत, स्तोत्र इ० |

या कोष्टकांत भाषाशैली आणि लेखनविस्तार हीं सदरें बुद्ध्याच घातलीं नाहींत. कारण, प्रत्येक चांगल्या लेखकाची भाषा इतकी स्वतंत्र व प्रत्येक चांगल्या वाङ्मयकृतीची लांबी इतकी प्रमाणशीर असते कीं त्यांच्याबद्दल स्थूलमानानें देखील नियम सांगतां येणार नाहीं.

निबंध आणि एसे यांच्यांतील हें महदन्तर पाहून निबंध शब्दाचें भाषांतर ‘ एसे ’ असें करणें किंवा ‘एसे’ या शब्दाला निबंध हा प्रतिशब्द योजणें किती अनुचित होईल,हें सांगणें नकोच.कारण, निबंध म्हणजे Nibandha आणि Essay म्हणजे एसे होय ! या दोन वाङ्मयप्रकारांत कांहीं सपिंड संबंध तर कोठला, पण समानोदक किंबहुना सगोत्र संबंध देखील दिसत नाहीं ! एका इंग्रज लेखकानें अभिमानानें व विनोदानें म्हटल्याप्रमाणें, एसे हा कांहीं केवळ देशकाल-मर्यादित नाहीं. तरी पण एसेचा मूळ उत्पादक मॉंटेन हा स्वतः फ्रेंच असूनहि खुद्द फ्रेंच व जर्मन लोक देखील एसे हा एक इंग्लंडचाच ‘ मुलकी ’ वाङ्मयप्रकार आहे असें मानतात. कारण, एसे लिहिणाऱ्याच्या एका विशिष्ट मनोरचनेला इंग्लंडचेंच प्रकृतिमान अनुकूल आहे—नव्हे, तेथील हवाच एसे निर्माण करणारी आहे ! त्याच्या म्हणण्याचा भावार्थ हाच कीं, इंग्रज लोकांत जी एक अहंकेन्द्रित, किंबहुना गर्विष्ठपणाची झांक असलेली, पण खेळकर व परमतसहिष्णु अशी विनोदवृत्ति आहे, ती जशी इंग्लंडखेरीज इतर देशांत जशीच्या तशी आढळणें प्रायः दुष्कर आहे, तशीच त्याच वैशिष्ट्यांनीं नटलेल्या आत्माविष्कारासह अवतीर्ण झालेली ही कलाकृति देखील इतरत्र आढळणें स्वभावतःच दुर्मिळ आहे[२०].

20 Orlo Williams, pp. 15 and 19.

ऐसे हा जसा इंग्लंडचा वाङ्मयप्रकार, त्याचप्रमाणें निबंध हा महाराष्ट्राचा एक अनन्यसाधारण वाङ्मयविशेष आहे. संस्कृत धर्तीची निबंधरचना हिंदुस्थानांतील सर्व प्रांतांना सर्वसाधारण असली, तरी खराखुरा ' निबंध ' हा महाराष्ट्राचाच 'मुलकी' आहे. कारण, निबंध लिहिण्याच्या एका विशिष्ट मनोरचनेला महाराष्ट्राचेंच प्रकृतिमान अनुकूल आहे; नव्हे, येथील हवाच निबंध निर्माण करणारी आहे. म्हणण्याचा भावार्थ हा कीं, सामान्यतः महाराष्ट्रीय लोकांत जी एक पूर्वेतिहासांत रमणारी, स्वजनगौरवाची, परमतविषयक असहिष्णुतेची, तत्त्वान्वेषणाची व रूक्ष, पांडित्यप्रधान अशी विवादवृत्ति आहे ती ज्याप्रमाणें जशीच्या तशी महाराष्ट्राबाहेर आढळणें कठिण, त्याचप्रमाणें तींच वैशिष्ट्यें प्रामुख्यानें मिरविणारा मराठी निबंधहि इतरत्र आढळणें वस्तुगत्याच दुर्लभ आहे.

## विष्णुशास्त्री ते विनोबा

ऐतिहासिक दृष्टीनें पाहतां इंग्रजांच्या येथील आगमनानंतरच निबंध वाढीला लागला, हा एक तात्कालिक योगायोग आहे. तथापि विष्णुशास्त्री चिपळूणकरांनीं तो जेव्हां प्रथम नांवारूपास आणला, तेव्हां इंग्रजांचें आगमन होऊन बरींच वर्षें लोटलीं होतीं. अव्वल इंग्रजींत हतप्रभ झालेला महाराष्ट्र आपलीं शस्त्रास्त्रें सांवरूं लागला होता व निबंध–मालाकारांची विषदिग्ध लेखणी खड्गाचें रूप धारण करून इंग्रजांच्या सत्तेला १९४७ सालीं लागणाऱ्या खग्रासाचे वेध लावीत होती. विष्णुशास्त्री, आगरकर व टिळक यांची निबंधविषयक कामगिरी केवळ वाङ्मयाच्याच नव्हे तर भाषिक, सामाजिक व राजकीय क्षेत्रांतहि किती गाजली याचा इतिहास अगदीं ताजा आहे.

विष्णुशास्त्री चिपळूणकरांनीं निरनिराळ्या क्षेत्रांत केलेलें कार्य कदाचित् विवाद्य असेल; पण मिसेस् फरारपासून 'लोकहितवादी'पर्यंत मराठींत जें निबंधसदृश लेखन केलें जात असे, त्याऐवजीं त्यांनीं आपल्या लेखांना 'निबंधा'च्या नियमबद्ध चौकटींत बसाविलें. जानेवारी १८६२मधील 'ज्ञानप्रसारकां'-तील " निबंध लिहिणें " या विषयावरील लेखकानें " अलीकडे निबंध लिहिण्याचे प्रकार पुष्कळ झाले आहेत; त्यांतून कित्येकांत प्रतिज्ञा नाहीं; इतकेंहि असलें तरी हेतु नसतो; हेतु असला तर उदाहरण मिळत नाहीं; तें मिळालें तर त्याशीं निगमनाचा ठिकाणाच लागत नाहीं, " अशी तक्रार केली आहे. चिपळूणकरांनीं अशा अनेक उणिवा दूर करून मराठी निबंधाला बाळसेदार स्वरूप दिलें. किंबहुना लेसिंगच्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे He has within himself the evidence of all rules-निबंधाचें तंत्र निर्माण करण्यासाठीं आवश्यक असे सर्व नियम व असें सर्व साहित्य आपणांला त्यांच्याच निबंधांत सांपडतात. निबंधाच्या शिरोभागीं समर्पक सुभाषित ठेवून द्यावें चिपळूणकरांनींच. शिवाय, प्रस्तावना विषयाचा एकदम ठाव घेणारी कशी असावी, साधकबाधक मुद्द्यांची मांडणी मुद्देसूद कशी करावी, परपक्षाचें खंडन किंवा स्वपक्षाचें मंडन करीत असतांना प्रतिपादनांतील आवेश, प्रौढ भाषेचा डौल, उपमादृष्टांतादिकांचें औचित्य व समर्पक श्रुतयोजना हें साहित्य कौशल्यानें वापरून निबंधाची अखेर कशी बहारीनें साधावी, याचें वळणदार तंत्र शास्त्रीबुवांनींच मराठी निबंधकारांना घालून दिलें. विष्णुशास्त्री 'मराठी भाषेचे शिवाजी' भलेहि असोत; पण, ते 'मराठी निबंधाचे पहिले बाजीराव' आहेत याबद्दल दुमत होणार नाहीं.

आगरकरांनीं मूर्तिभंजकाची भूमिका स्वीकारली. मराठी निबंध त्यांच्या हातानें अधिक सडेतोड, चित्तभेदक व भावनोत्कट झाला.

लोकमान्य टिळकांनीं अलंकारादि प्रसाधनें त्या मानानें कमी वापरलीं; पण विचारजागृतीची तळमळ मात्र तीच! केवळ परिस्थितीच्या जुलमानें त्यांच्याकडे राजकीय पुढारीपण आलें; एरव्हीं विद्यार्थ्यांसंगी प्राध्यापकाचीच त्यांची भूमिका. त्यामुळें टिळकांनीं निबंधाला ठसठशीत, तर्कशुद्ध व ओजस्वी स्वरूप दिलें.

शि. म. परांजपे व अ. ब. कोल्हटकर यांच्या निबंधांचा आत्मा चिपळूणकरांचाच. शास्त्रीबुवांची सूत्रबद्धता, आगरकरांची चित्तभेदकता व टिळकांची तेजस्विता यांच्यांतहि उतरल्या आहेत; पण एकंदरीनें निबंधाच्या अंतर्गत आशयापेक्षां बाह्यप्रसाधनें व भाषाशैली यांवरच या दोघांचा जोर अधिक.



अर्थात् अर्थापेक्षां शब्द, सडेतोडपणाऐवजीं वक्रोक्ति, व चौफेर पांडित्याच्या बदलीं मर्मभेदक कल्पकता या गुणांची खुमारी त्यांनींच मराठी निबंधांत आणली.

पांगारकर, वा. म. जोशी आणि न. चिं. केळकर यांनीं प्रामुख्यानें वाङ्मयीन प्रश्न अधिक प्रौढतेनें व संयमानें हाताळले. परांजपे–कोल्हटकरांनीं शैलीचा चढविलेला तार स्वर या त्रयीनें मन्द्र करून मराठी निबंधाला बांधेसूद, रेखीव व समतोल केलें. विशेषतः पांगारकरांनीं संतकवींची भक्तिभावना, तशीच समाधानी वृत्ति निबंधांत ओतली; वा. म. जोशी यांनीं निबंधाला अधिक विचारप्रवण व उद्बोधक केलें, तर केळकरांनीं आधींच्या निबंधकारांतील सर्वच गुण–विशेषांचा संयम करून सुवर्णमध्य साधला.

साने गुरुजी, काका कालेलकर व विनोबा हे आजचे प्रमुख निबंधकार आहेत. यांनींच आज मराठी निबंधाची परंपरा चालविली असून तिचें भवितव्यहि हेच ठरवितील. साने गुरुजींच्या निबंधांतील हळुवार गोडवा व सहृदयता, कालेलकरांचीं उदात्तसुंदर निसर्गवर्णनें, तशीच त्यांची रसिकता, विनोबांचें कसलेलें भाषाप्रभुत्व व समृद्ध मानवता हे सर्व विशेष कशाचे सूचक आहेत ? मराठी निबंधाचें वळण आतां केवळ साहित्यिक वा पुस्तकी स्वरूपाचें राहिलें नसून तें अधिक व्यापक, उन्नत, समाजप्रवण व मानवी होत आहे याचीच ही एक जिवंत खूण आहे.

विष्णुशास्त्री ते विनोबा या कालखंडांतील प्रमुख निबंधकारांनीं मराठी निबंधास जो एक विशिष्ट आकार आणला आहे त्याच्या विकासाचें हें एक धांवतें दृश्य आहे. हींच अकरा नांवें सर्वस्पर्शी आहेत असें नव्हे; ही यादी केवळ सूचक आहे. संपूर्ण निबंधकारांचा उल्लेख करण्याचा इरादा असता तर राजवाडे, वैद्य, डॉ. केतकर, सावरकर, माटे, माडखोलकर, बनहट्टी, पोतदार, फडके, न. र. फाटक, र. धों. कर्वे, वा. ना. देशपांडे अशा अनेक ख्यात–नाम निबंधकारांना आवाहन करावें लागलें असतें. यांखेरीज, एकाददुसरा सुरेख निबंध लिहिणारे मराठी लेखक तर किती तरी आहेत ! ही झाली शुद्ध निबंध लिहिणाऱ्यांची स्थिति. टीका–परीक्षणें, स्वभावचित्रें, प्रवासवर्णनें, पत्रें, विनोदी लेख, असे अनेक वाङ्मयप्रकार पुष्कळ वेळां निबंधाच्या आविर्भावानें प्रकट होतात. इतर दृष्टींनीं समृद्ध परंतु निबंधाची केवळ छटा असलेल्या अशा निबंधसदृश वाङ्मयप्रकारांचा परामर्श घेण्याचें हें स्थल नव्हे.

## 'विद्यालयीन निबंध' कसा असावा ?

अलीकडे गुजगोष्टी, ललित निबंध किंवा लघुनिबंध या नांवांनीं संबोधिल्या जाणाऱ्या एका नवीन वाङ्मयप्रकाराचा मात्र येथें निर्देश केला पाहिजे. हा निर्देश 'निबंधां'च्या तुलनेसाठीं करावयाचा नाहीं. कारण, वरील विवेचनावरून निबंध आणि एसे यांच्या अंतर्बाह्य स्वरूपांत साम्यापेक्षां तफावतच किती जास्त आहे हें स्पष्ट झालेंच आहे. इंग्रजी एसेप्रमाणेंच मराठींतीलहि आजकालच्या फडके, खांडेकर, काणेकर, कुसुमावती देशपांडे प्रभृति ललित–लेखकांच्या तथाकथित 'लघुनिबंधां'ची माधुरी कोणीं चाखली नाहीं ? तथापि त्यांच्या सर्वस्वीं आत्मलक्षी लेखनाला—' लघु ' काय किंवा ' ललित ' काय—' निबंध ' या संज्ञेनें संबोधणें मात्र सर्वथैव अनुचित आहे; नव्हे ही त्यांच्या लेखनाची किंवा निबंध या शब्दाची थट्टाच करणें होय ! वस्तुतः 'लघुनिबंधा'ला प्रा. फडके यांनीं प्रथम सुचविलेलें "गुजगोष्ट" हेंच अभिधान अन्वर्थक आहे. हें नवें लेणें युरोपमधील मॉंटेन्, हॅझ्लिट्, लॅम्ब्, स्टीव्हन्सन, ल्यूकस्, चेस्टर्टन्, चेकव्ह, गार्डिनर प्रभृति एसे–लेखकांकडून नुकतेंच उसनें आणलेलें आहे. महाराष्ट्रीय मनोवृत्तीला तें कितपत मानवेल हें अद्यापि ठरावयाचें आहे. तथापि तें ठरेपर्यंत त्याला कोणतेंहि नांव दिलें तरी ' विष्णुशास्त्री ते विनोबा ' या मराठी निबंधांच्या परंपरेंतील तें नाहीं हें अगदीं स्पष्ट झालें पाहिजे. केवळ 'लघुनिबंध' या नांवावरून नव्हे, तर मराठी निबंध–वाङ्मयाचें समालोचन करणाऱ्या बहुतेक सर्व विवेचकांनीं निबंध आणि एसे यांच्यामधील ही अंतर्बाह्य प्रकृतिभिन्नता सम्यक् रीतीनें लक्षांत घेतलेली आहे असें दिसत नाहीं.

केवळ वाङ्मयविवेचनाच्या क्षेत्रांतच नव्हे, तर विद्यालयीन वातावरणांत देखील निबंध आणि एसे यांच्यामधील प्रकृतिभेद लक्षांत न घेतल्यामुळें निबंध–








लेखनाच्या स्वरूपाविषयीं विचारांत आणि कृतींत बरीच गल्लत झालेली दिसून येते. वस्तुतः विद्यालयांतील निबंध हा दिलेल्या विषयावर, दिलेल्या वेळांत व दिलेल्या शब्दमर्यादेंत लिहावयाचा असतो. बरें, दिलेले विषयहि बऱ्याच अंशीं गंभीर स्वरूपाचे असतात. या सर्व मर्यादा सांभाळून जें लेखन करावयाचें तें निबंधाच्या स्वरूपाचें असावें कीं एसेच्या ? ऑलॉ विल्यम्सनें आपल्या 'एसे'वरील निबंधांत विद्यालयीन निबंध (—त्याला तो theme हें नांव सुचवितो—) व एसे यांच्यांतील भेद सांगतांना, शाळेंतील आठवण म्हणून पहिला विद्यालयीन निबंध (किंवा थीम्) लिहितांना आपली कशी तारांबळ उडाली व मोठमोठ्या एसे—लेखकांना देखील दिलेल्या विषयावर ठराविक तासांत निबंध लिहिणें कसें जड जाईल याचें सुंदर चित्र काढलें आहे. पण शाळेंत असे निबंध लिहावयाला लावणें मूर्खपणाचें आहे हा त्याचा निष्कर्ष मात्र चिन्त्य आहे. " This feature of the Oxford Tutorial System...... is by no means intended to encourage the sprouts of individual imaginations : it is looked on as a means of acquiring knowledge and showing that the acquisition has been digested." हें त्याचें म्हणणें अगदीं खरें आहे व अशा शालेय लेखनपद्धतीला 'एसे' म्हणूं नये हा त्याचा सिद्धान्तहि रास्तच आहे. त्याच्याचसारखी विचारसरणि ल्यूकस् याच्या एसेज्‌ना प्रस्तावना लिहिणाऱ्या प्रो. वुड्हाउसनें मांडली असून तिचा अनुवाद प्रा. वा. ल. कुळकर्णी यांनीं "वाङ्मयांतील वादस्थळें" यांत केला आहे. ऑक्सफर्ड विद्यापीठांतील निबंधलेखनपद्धतीचें समर्थन येथें करावयाचें नाहीं. पण एसेचें उपरिवर्णित स्वरूप लक्षांत घेतां असे 'एसेज्' विद्यालयांत घालणें कितपत उचित होईल याचा विचार करावयास कोणी शिक्षणतज्ज्ञच आणावयास नको. ज्या वयांत व्यक्तित्वाचा पूर्ण विकास अजून व्हावयाचाच असतो अशा वेळीं लेखनाचा अभ्यास या दृष्टीनें आत्मनिष्ठ व ललित स्वरूपाचा एसे लिहिणें इष्ट कीं रचनाबद्ध व विषयनिष्ठ निबंध लिहिणें श्रेयस्कर हें प्रत्येकाला स्वानुभवावरूनच ठरवितां येईल. निबंधाच्या अपेक्षेनें 'एसे'ची महती कमी लेखण्याचा हा प्रश्न नाहीं. कारण, या दोहोंची तुलनाच अशक्य आहे. येवढें मात्र येथें नमूद केलेंच पाहिजे कीं आत्मनिष्ठा ही मर्यादित असूनहि विषयनिष्ठ निबंधांचें स्वरूप कसें वाङ्मयीन व भरदार असूं शकतें हें ऑलॉ विल्यम्स् किंवा प्रो. वुड्हाउस वा त्यांचे अनुवादक यांनीं लक्षांत आणलें असतें तर विद्यालयांत निबंधांऐवजीं एसेज् लिहावयाला द्यावे असा नेमका गैरवाजवी उपदेश ते करते ना ! आपल्या देशाच्या दृष्टीनें ही वृत्ति महाराष्ट्रीय मनाचें प्रकृतिमान न ओळखणारी व कालिदासभवभूतींच्या ऐवजीं शेक्स्पिअर शिकावयाला लावणारी इंग्रजी—धार्जिणी आहे, असें मोठ्या दुर्दैवानें म्हणावें लागतें.

विशेषेंकरून विद्यालयाच्या कामासाठीं एसे—लेखनाचा पुरस्कार करणाऱ्यांना सुप्रसिद्ध एसे—लेखक विल्यम् हॅझ्लिट् याचे पुढील उद्गार 'घरचा अहेर' म्हणून बहाल करावयाला हरकत नाहीं. तो म्हणतो, " What abortions are these Essays ! What errors, what ill-pieced transitions, what crooked reasons, what lame conclusions ! How little is made out, and that little how ill !" विद्यालयीन निबंधांच्या बाबतींत हे उद्गार कितपत परमार्थानें घ्यावयाचे हें सुज्ञ वाचक ठरवितीलच. किंबहुना कांहीं इंग्रजी टीकाकार म्हणतात त्याप्रमाणें बेकन, मेकॉले प्रभृति लेखकांच्या वाङ्मयकृतींना एसेचाच एक प्रकार मानतांहि येईल, नाहीं असें नाहीं. पण एसेचें खरेंखुरें वैशिष्ट्यच त्यांत नसल्यामुळें त्यांना 'एसे' हें वैशिष्ट्यपूर्ण नांव न देतां Treatise, Paper किंवा Article असें सर्वसाधारण नांव देणेंच युक्त. मराठी निबंधाची परंपरा संस्कृतांतून निर्माण झाली व त्याला सध्यांचें सलग व स्वतंत्र असें वाङ्मयीन स्वरूप बेकन, जॉन्सन्, ॲडिसन्, मेकॉले इत्यादिकांच्या संनिकर्षामुळें आलें हेंहि खोटें नाहीं. तथापि हें स्वरूप ज्यांनीं प्रामुख्यानें आणून दिलें, त्या विष्णुशास्त्री चिपळूणकरांच्या शब्दांत सरतेशेवटीं हेंच म्हणावेंसें वाटतें कीं, " स्वतंत्र निबंध-रचनेचा विचार केला असतां हें बहुजनसाध्य कार्य आम्हीं स्वतःच अंगीकारिलें. आम्हीं हा जो








अव्याहत उद्योग केला त्याला आमच्या देशांतच काय, पण पाश्चात्य देशांतहि तोड सांपडणार नाहीं.''

या बहुजनसाध्य व अव्याहत उद्योगाकडे पाहून कोणीहि असेंच म्हणेल कीं,

येथ चातुर्य सिहाणें जालें । प्रेम रुचीसि आलें ॥
आणि सौभाग्य पोखलें । सुखाचें येथ ॥

---

## यहुदी : स्थळवार लोकसंख्या

'नवभारत'च्या जुलै-अंकांतील पॅलेस्टाइनसंबंधींच्या माझ्या लेखांत यहुदी लोकांविषयीं मीं आंकडेवारीनें कांहीं माहिती दिली होती. त्यानंतर ब्रिटिश ट्रेड-ॲडव्हिसरी कौन्सिल या संस्थेची यहुदी लोकांसंबंधींची एक पुस्तिका मला मिळाली. तिच्यांतील माहिती जास्त व्यवस्थित व बिनचूक असल्यामुळें ती खालीं देत आहें.:-

### दुसऱ्या महायुद्धाच्या प्रारंभीं:—

| | | | |
|---|---|---|---|
| युरोप-खंड | ९७,००,००० | [सोव्हिएत-संघ | ३०,००,००० |
| | | ग्रेटब्रिटन | ४,००,००० |
| | | पोलंड | ३३,२५,००० |
| | | इतर | २९,७५,०००] |
| अमेरिका-खंड | ५४,००,००० | | |
| आशिया खंड | ९,००,००० | [पॅलेस्टाइन | ५,००,०००] |
| आफ्रिका-खंड | ६,००,००० | | |
| ऑस्ट्रेलिया-खंड | ४०,००० | | |
| जगांत एकंदर | १,६६,४०,००० | | |

### महायुद्धामुळें झालले फरक:—

ग्रेटब्रिटन व सोव्हिएतसंघ यांच्या बाहेरचे युरोपियन यहुदी ६३,००,००० होते. त्यांपैकीं १०,००,००० या युरोपीय देशांत उरले आहेत, ४०,००,००० ठार झाले आहेत व १३,००,००० निर्वासित झाले आहेत. निर्वासितांपैकीं ५०,००० पॅलेस्टाइनमध्यें, ४,५०,००० युरोपबाहेरच्या देशांत व ८,००,००० सोव्हिएतसंघांत गेले आहेत. पॅलेस्टाइनची यहुदी लोकसंख्या ५,००,०००वरून ५,५०,०००वर गेली आहे.

—दि. के. बेडेकर.



अनुक्रमणिका

# स्टर्लिंग–शिलकेची परतफेड

प्रा. स. वा. कोगेकर

ता. ९ जुलै १९४८ रोजीं हिंद व ब्रिटन यांच्या सरकारांत एक करार होऊन त्याअन्वयें गेल्या महायुद्धांत आपल्या नांवें जमा झालेल्या स्टर्लिंग (उर्फ पौंडी)–ठेवींच्या परत–फेडीसंबंधीं एक योजना आंखण्यांत आली. ही प्रस्तुत ठेवींच्या परतफेडीच्या बाबतींतील तिसरी योजना असून तिचा अंमल ३० जून १९५१पर्यंत व्हावयाचा आहे. यापूर्वी १४ ऑगस्ट १९४७ रोजीं केलेल्या यासंबंधींच्या पाहिल्या कराराअन्वयें १९४७अखेर-पर्यंतच्या कालांत परत मिळण्याच्या स्टर्लिंग–रकमे-बद्दलची योजना झाली होती व तोच करार ता. १५ फेब्रुवारी १९४८ रोजीं पुढें चालू करण्यांत आला होता. त्याची मुदत ३० जून १९४८-पर्यंत होती. ती संपतांच पुनः अल्प मुदतीचा करार करण्याऐवजीं दीर्घकालीन योजना आंखतां आल्यास बरें, या विचारानें हिंदचे अर्थमंत्री श्री. षण्मुखं चेट्टी यांच्या नेतृत्वाखालीं एक वजनदार शिष्टमंडळ विलायतेस रवाना झालें होतें. त्यानेंच ९ जुलैचा करार घडवून आणला. त्यांत मुख्यतः तीन गोष्टींचा समावेश झालेला असून त्या सर्वांचा परिणाम आपल्या पौंडी शिलकेच्या एकंदर रकमेपैकीं किती भाग आपणांस परत मिळावयाचा यावर होणार आहे. पण त्याच्या तपशिलांत शिरण्यापूर्वी ही ठेव निर्माण कशी झाली व तिचें आपल्या अर्थव्यवस्थेंत कोणतें स्थान आहे याचा विचार करूं.

### पौंडी ठेवीचा उगम

या ठेवीचा उगम महायुद्धांत ब्रिटननें हिंदुस्थान-कडून उधारीनें पैदा केलेल्या मालांत आणि युद्धा-प्रीत्यर्थ स्वतःसाठीं हिंदुस्थानवर लादलेल्या इतर खर्चांत झाला. या देशांत होणारा सारा व्यापार रुपयांत चालतो व परदेशांना येथें माल विकत घ्यावयाचा असल्यास त्याची किंमतहि अर्थात् रुपयांतच द्यावी लागते. पण हे रुपये प्राप्त करून घेण्यासाठीं परदे-शांना आपला माल किंवा सोनें या देशाला प्रत्यक्ष-पणें किंवा अप्रत्यक्षपणें विकणें आवश्यक असतें. अप्रत्यक्षपणें विकणें म्हणजे दुसऱ्या एकाद्या देशाच्या मध्यस्थीचा उपयोग करणें. उदाहरणार्थ, फ्रान्सला रुपये हवे असतील, पण या देशाला देण्यासारखा माल त्यापाशीं नसेल; तर दुसऱ्या एकाद्या देशाकडून आपल्या मालाच्या बदलीं रुपये त्याला मिळवावे लागतील. अर्थात् त्या दुसऱ्या देशाला तरी हे रुपये हिंदुस्थानशीं व्यापार करूनच मिळणार. म्हणून या पद्धतीनें, फ्रान्सच्या दृष्टीनें हिंदुस्थानला अप्रत्यक्षपणें माल पाठविला असें म्हणतां येईल. आंतरराष्ट्रीय व्यापारांतील देवाण–घेवाण या प्रकारें होत असल्या-मुळें आपल्याकडून परदेशांत गेलेल्या मालाच्या बदलीं आपल्याला परदेशांचा माल किंवा सोनें मिळणें क्रमप्राप्तच होतें. परंतु युद्धकालांत ब्रि० सर-कारच्या वतीनें या देशांतून जो माल विकत घेतला गेला किंवा ब्रिटिश वा इतर दोस्त फौजांपायीं आम्हांस जो खर्च करावा लागला त्याची किंमत मात्र या नेहमींच्या पद्धतीनें वसूल झाली नाहीं. आपल्या राजकीय सत्तेचा उपयोग करून ब्रि० सरकारनें उधा-रीनें माल नेला. पण त्यामुळें येथील व्यापारी, मजूर, कारखानदार व शेतकरी यांना मिळावयाचे रुपये देण्याचें कांहीं टळलें नाहीं. त्यांना रुपयांत किंमत



अनुक्रमणिका






दिल्याशिवाय मालाची विक्री होणेंच शक्य नव्हतें; कारण वैयक्तिक रीत्या प्रत्येकाकडून उधारी मिळणें कसें शक्य आहे ? तेव्हां ब्रि० सरकारनें आपलें हस्तक जें हिंदी सरकार त्याकडून हे रुपये देवविण्याची व्यवस्था केली. ती अशी कीं, येथील मालाच्या किंमतीइतक्या रकमेचे पौंडी कर्जरोखे हिंदी सरकारच्या हवालीं करावयाचे आणि ते कर्जरोखे रिझर्व बँकेकडे तारण म्हणून देऊन हिंदी सरकारनें त्यांच्या बदलीं रुपयांच्या नोटा मिळवावयाच्या. या नोटांचा उपयोग वरील किंमत रुपयांत देण्यासाठीं करावयाचा. म्हणजे येथील विक्रेत्यांना पैसा मिळाला व रिझर्व बँकेला नव्या छापलेल्या नोटांना तारण म्हणून ब्रि० सरकारचे कर्जरोखे मिळाले. दोघांचीहि तक्रार राहिली नाहीं. रिझर्व बँकेच्या कायद्याप्रमाणें तर पौंडी कर्जरोख्यांबद्दल ठराविक दरानें रुपये देण्याचें बंधनच तिच्यावर लादलेलें असल्यामुळें हा व्यवहार कायद्याला धरूनच झाला ! याप्रमाणें युद्धकालांत जवळ जवळ बावीसशें कोटी रुपये किंमतीची उधारी ब्रि० सरकारनें केली. यांपैकीं सुमारें ४५० कोटी रुपये हिंदी सरकारचें विलायतेंतील कर्ज फेडण्यासाठीं म्हणून वळते करण्यांत आले. तरीहि युद्धाच्या शेवटीं जवळ जवळ साडेसतराशें कोटी रुपयांचे स्टर्लिंग-कर्जरोखे रिझर्व बँकेकडे जमा झालेल्यांपैकीं शिल्लक होते. त्यांपैकीं कांहीं भाग नंतरच्या दोन वर्षांत येथें आयात होणाऱ्या धान्यादि मालाच्या किंमतीपायीं कामास आला आणि १४ ऑगस्ट १९४७चा करार करतांना सुमारें १५५० कोटी रुपये किंमतीचे कर्जरोखे शिल्लक होते.

### ठेव जमविण्याची किंमत

येथून नेलेल्या किंवा येथेंच खर्चलेल्या मालाच्या किंमतीइतक्या रकमेचे कर्जरोखे जरी रिझर्व बँकेंत जमा झाले असले तरी या ठेवीपायीं हिंदी जनतेला जी हलाखी सहन करावी लागली तिची कल्पना केवळ पैशाच्या हिशेबानें येणार नाहीं. एक तर या देशाची उत्पादनशक्ति लोकसंख्येच्या मानानें फारच कमी असल्यामुळें येवढ्या प्रचंड प्रमाणावर मालाचा ओघ येथून बाहेर वळविणें व त्याबदलीं कागदी नोटांशिवाय इतर कोठलाच माल न देणें हा अमानुष प्रकार होय ! आधींच अन्नान्नदशेला पोहोंचलेल्या जनतेला हा ताण सहन न होऊन अधिकच कष्ट सोसावे लागले. बंगालमध्यें तर लाखों लोकांचा बळी पडला आणि इतरत्रहि अन्नवस्त्रांच्या अभावीं दैन्य पसरलें ! बरें, नुसता मालच कमी झाला असें नव्हे, तर उरलेल्या मालाची विभागणीहि अत्यंत विषम पद्धतीनें झाली. त्यामुळें गरीब जनतेवर सर्वांत जास्त बोजा पडला. भरमसाट होत असलेल्या चलनवाढीमुळें किंमती बेसुमार वाढल्या आणि श्रमजीवी व ठराविक वेतन मिळविणाऱ्या सर्व लोकांच्या वेतनांत प्रत्यक्ष वस्तूंच्या दृष्टीनें पहिल्यास भरमसाट कपात होत गेली. (* या पृष्ठाच्या खालीं दिलेल्या कोष्टकांतील आंकड्यांवरून या गोष्टी स्पष्ट होतील.) उलट ज्यांच्यापाशीं कोठलाहि विकाऊ माल

---

*

| सन | स्टर्लिंग ठेव (कोटी रुपये) | चलन (कोटी रुपये) | घाऊक किंमतींचा निर्देशांक (जाने. ते जून १९३९=१००) | मजुरांच्या राहणीच्या खर्चाचा निर्देशांक (मुंबई) (जाने. ते जून १९३९=१००) |
|---|---|---|---|---|
| १९३९ | ७१ | १८२ | १०९ | १०२ |
| १९४० | ९१ | २०९ | १२१ | १०८ |
| १९४१ | १६९ | २४१ | १४१ | १२० |
| १९४२ | २११ | ३०७ | १८७ | १५१ |
| १९४३ | ३९४ | ५१३ | ३११ | २२३ |
| १९४४ | ७५५ | ७७७ | ३०२ | २२९ |
| १९४५ | ११४१ | ९६८ | २९२ | २२७ |
| १९४६ | १७२० | ११६२ | ३२८ | २५० |
| १९४७ (मार्च) | १६१२ | १२४३ | ३७४ | २६० |

होता, त्यांना अतोनात फायदा होऊं लागला. म्हणजेच संपत्तीचा ओघ बहुसंख्य जनतेकडून अल्पशा भांडवलदार वर्गाकडे वळूं लागला. वस्तूंच्या दुर्मिळतेंत या विषमतेनें अधिकच भर टाकली आणि काळा बाजार व नफेबाजी यांना ऊत आला ! अशा परिस्थितींत नियंत्रणांच्या द्वारा किंमती स्थिरावण्याचा प्रयत्न न करतां सरकारनें आपलें चलनवाढीचें धोरण तसेंच शेवटपर्यंत चालू ठेवलें. अगदींच नाइलाज झाला तेव्हां मात्र कांहीं अंशीं वांटप, किंमत–नियंत्रण इत्यादींचा अवलंब करण्यांत आला. पण वाढत्या चलनामुळें या उपायांना फारसें यश आलें नाहीं; त्यांतच सामान्य जनतेच्या अडाणीपणाची आणि व्यापारी–वर्गाच्या बेफाट स्वार्थाची भर पडली. पगार आणि किंमती यांच्या शर्यतींत किंमतींचा नंबर कायम पहिला राहिला. अशा रीतीनें जनतेच्या हालांमुळें स्टर्लिंग–ठेवीचा आंकडा फुगत गेला असल्यामुळें युद्धसमाप्तीनंतर तरी तिची परतफेड झपाट्यानें होऊन आपणांस आवश्यक त्या यांत्रिक सामग्रीची व इतर मालाची आयात करतां येईल या आशेनें तिच्याकडे पाहण्यांत येत असे व जनतेच्या रक्ताचें मोल देऊन निर्माण केलेलें भांडवल म्हणून तिचा उल्लेख करण्यांत येई.

## पुनर्घटनेच्या योजना

या भांडवलाचा उपयोग युद्धोत्तर पुनर्घटनेच्या कामीं जास्तींत जास्त फायदेशीरपणें केला जाईल अशी अपेक्षा करणें अगदीं रास्त होतें. देशाचा औद्योगिक मागासलेपणा लक्षांत घेतां मोठ्या प्रमाणांत परदेशांहून यांत्रिक उपकरणांची आयात केल्याशिवाय प्रगतीचें पाऊल पुढें पडणें शक्य नाहीं ही गोष्ट स्पष्ट होती. त्यांतच युद्धाच्या दीर्घ मुदतींत येथील यंत्रसामग्रींत झालेली झीज विचारांत घेतां सध्यांची उत्पादनशक्ति टिकविण्यासाठीं सुद्धां मोठ्या प्रमाणावर यांत्रिक सामग्रीच्या आयातीची गरज भासूं लागली होती. पुनर्घटनेच्या ज्या योजना तयार करण्यांत येत होत्या त्यांत स्टर्लिंग–ठेवींचा अंतर्भाव भांडवली व्यवस्थेंत करण्यांतहि येत होता. पुढें मागें ब्रिटन ही ठेव परत करण्याच्या कामीं आडवेडे घेईल म्हणून येथील लोकमत त्याविरुद्ध तयार करण्याचें कामहि सुरू झालें होतें. १९४४ सालीं ब्रेटनवुडस् येथें आंतरराष्ट्रीय चलनानिधि स्थापन करण्यासाठीं जमलेल्या परिषदेंत या प्रश्नाचा उल्लेख करण्यांत येऊन ब्रिटनच्या वतीनें लॉर्ड केन्स यांनीं परतफेडीचें आश्वासनहि दिलें होतें. पण युद्ध संपलें आणि सारेंच गाडें पालटलें! ब्रिटनची अंतर्गत आर्थिक परिस्थिति बरीच खालावलेली असल्यामुळें आपली ठेव किती वर्षांत ब्रिटन देऊं शकेल याची चर्चा चालू असतांच अमेरिकेनें ब्रिटनला देऊं केलेल्या कर्जासंबंधींच्या करारांत ब्रिटनकडे असणाऱ्या इतर देशांच्या ठेवींबाबतचा ठराव परस्पर करण्यांत आला. त्याचा आशय, या ठेवी कमी करण्याच्या दृष्टीनें योग्य त्या तजविजीस ब्रिटननें लागावें, असा होता. आपलें कर्ज परत मिळण्याच्या मार्गांत ब्रिटनच्या पूर्वींच्या कर्जाची अडचण येऊं नये हा अमेरिकेचा हेतु होता; पण ब्रिटननेंहि त्यास मान्यता देऊन एकतर्फीच आपल्या इतर धनकोंच्या ठेवींवर गदा आणली व आपल्या कुटिल नीतीचें प्रदर्शन केलें ! तेव्हांपासून आपल्या स्टर्लिंग–शिलकेच्या परतफेडीबद्दल साशंकता निर्माण झाली व तें साशंकतेचें वातावरण अद्यापहि निवळलेलें नाहीं. आतांपर्यंत झालेल्या हिंद–ब्रिटन–करारांना स्टर्लिंग–ठेव परत मिळविण्याच्या दृष्टीनें फारसें यश मिळालेलें नाहीं, यामुळें तर भांडवली खर्चासाठीं तिचा विशेष उपयोग होणार नाहीं असाच निष्कर्ष काढण्याची पाळी निश्चितपणें आलेली आहे.

## पहिला 'स्टर्लिंग–ठेव'–करार

अँग्लो–अमेरिकन कर्ज–कराराच्या नांवाखालीं ब्रिटिश सरकारनें स्टर्लिंग–शिलका परत करण्याच्या कामीं फारच दिरंगाई चालविली आहे. विशेषत: या ठेवींचा जो भाग मालाच्या स्वरूपांत परत करण्यासाठीं देऊं केला आहे त्याचा विनियोग धनकोच्या मनाप्रमाणें व्हावयास हवा असेल तर पौंडी शिलकेच्या अन्य चलनांतील रूपांतरावर निर्बंध लादण्यांत यावयास नको होते. पण नेमकी हीच गोष्ट करावयास आज ब्रि० सरकार तयार नाहीं. आणि याचें कारण म्हणजे स्वत:ला कोठलीहि तोशीस न लागतां जमल्यास परतफेड व्हावी असा ब्रिटनचा कावा आहे. १४ ऑगस्ट १९४७ रोजीं








झालेल्या कराराअन्वयें एकंदर सुमारें ८७ कोटी रुपये हिंदुस्थान(हिंद व पाकिस्तान )च्या ठेवींतून मुक्त करण्यांत आले. पण नंतर आठच दिवसांनीं पौंडांच्या इतर चलनांतील रूपांतरावर कडक निर्बंध बसविल्यामुळें त्यांपैकीं बराचसा भाग निकामी ठरला. पौंडांच्या रूपांतराची गरज पौंडांच्या क्षेत्राबाहेरील देशांशीं व्यापार करण्यासाठीं भासते. विशेषतः अमेरिकेकडून माल आणावयाचा असल्यास त्याची किंमत डॉलरमध्यें द्यावी लागत असल्यामुळें पौंडांचें डॉलरमध्यें रूपांतर करून देण्याची सवलत ब्रिटननें द्यावयास पाहिजे. परंतु तसें करणें ब्रिटनच्या तोट्याचें ठरतें. एकतर डॉलरची चणचण खुद्द ब्रिटिश व्यापाऱ्यांनाहि भासते. आणि दुसरें असें कीं, आपलें गिऱ्हाईक डॉलरच्या जाळ्यांत सांपडूं नये म्हणून प्रयत्न करण्याचीहि त्यांना जरूरी वाटते. कारण, एकदां गिऱ्हाईक गेलें म्हणजे पुनः तें परत मिळविण्यास त्रास होतो हा व्यापारी अनुभव त्यांना पुरतेपणीं पटलेला आहे. पण या प्रकारें गिऱ्हाइकाची गैरसोय होते इकडे मात्र लक्ष देण्याचें त्यांना कारण वाटत नाहीं. कारण मालाची किंमत ठेवींच्या रूपानें त्यांस आगाऊच मिळाली आहे ! १५५० कोटींपैकीं फक्त ८७ कोटी इतकी रक्कम मोकळी करून व तीवर रूपांतरासंबंधीं निर्बंध लादून ब्रिटननें ती रक्कम देऊनहि न दिल्यासारखी केली. कारण, ब्रिटिश कारखानदारांकडे केलेली यंत्रसामग्रीची मागणी त्यांस अल्प किंवा विशिष्ट अशा ठराविक काळांत पुरवितांच येत नाहीं व दुसरीकडून माल मिळविण्याचीहि सोय नाहीं. त्यामुळें धनकोंची फारच कुचंबणा होते. त्यांतून हिंदुस्थानसारख्या दरिद्री धनकोची तर जास्तच गैरसोय होऊन आवश्यक त्या औद्योगीकरणाच्या प्रसाराच्या योजना पुढें सरकविणें शक्य होत नाहीं. शिवाय, देशांत झालेली भरमसाट चलनवाढ, तशीच किंमतवाढ यांवर उपाय करण्याचें एक प्रभावी साधन हातीं लागत नाहीं व अंतर्गत आर्थिक व्यवस्थेंत झालेला बिघाड कायम राहतो.

फेब्रुवारींत झालेल्या दुसऱ्या कराराअन्वयें मागच्याचीच री ओढली गेली; परंतु उपलब्ध केलेली पौंडांची रक्कम मात्र पूर्वींहून कमी केली गेली. मागची बाकी पुढें ओढून तींत फक्त चोवीस कोटी रुपये अधिक मिळविण्यांत यावे असें ठरलें. पण रूपांतरित करण्याची रक्कम फक्त सव्वातेरा कोटीच ठरविण्यांत आली. म्हणजे पूर्ण सहामाहीसाठीं हा करार झाला असूनहि पूर्वींच्या साडेचार महिन्यांच्या करारांतील रक्कमेइतकी रक्कमहि मोकळी करण्यांत आली नाहीं ! त्यांतच रूपांतर–निर्बंध बसविल्यामुळें मोकळ्या केलेल्या रकमेचा उपयोग करून घेण्याची शक्यताहि दुरावली.

### मिळालेली ठेव तशीच पडली

पण याचबरोबर जेवढी रक्कम मिळाली होती तेवढी सर्वच्या सर्व मालाच्या रूपानें पदरांत पाडून घेण्याचा कसोशीचा प्रयत्नहि हिंद–सरकारकडून करण्यांत आला नाहीं असेंहि दिसून येतें. खासगी भांडवलदारांनीं तर नवीन उद्योगधंद्यांबाबत स्वार्थांधतेनें अगदींच उदासीन राहण्याचें ठरविलेलें दिसतें; पण अशा परिस्थितींत सरकारवरील जबाबदारी अधिकच वाढते. सरकारचें औद्योगिक धोरण अजूनहि स्पष्ट झालेलें नसल्यामुळें व सरकारी पुनर्घटनेच्या योजना अजूनहि कागदी टप्प्याच्या पलीकडे गेलेल्या नसल्यानें ती जबाबदारी सरकारनें पार पाडली असें म्हणतां येत नाहीं. याचें डोळ्यांत भरण्यासारखें एक उदाहरण म्हणजे फेब्रुवारींत केलेल्या कराराप्रमाणें सव्वातेरा कोटी रुपये किंमतीच्या पौंडांचें डॉलरमध्यें रूपांतर करून त्यांचा उपयोग अमेरिकेंतून यंत्रसामग्री आणण्याच्या कामीं करून घेतां येणें शक्य असतांना देखील त्या सवलतीचा फायदा घेण्यांत आला नाहीं; येवढेंच नव्हे, तर पहिल्या दोन्ही करारांप्रमाणें उपलब्ध असलेल्या एकूण १११ कोटी रुपये किंमतीच्या ठेवींपैकीं फक्त चारच कोटींचा उपयोग करण्यांत आला व बाकीची रक्कम तशीच कुजत पडली !

### आपली ग्रहणशक्तीच कमी ?

याचें एक कारण खुद्द अर्थमंत्र्यांनीं असें दिलें आहे कीं आपली ग्रहणशक्तीच कमी आहे ! पण देशाची दैन्यावस्था पाहून हें कोणासहि पटणार नाहीं. उलट, व्यापारीवर्गानें सरकारच्या आयात–नियंत्रण–धोरणावर कडक टीका केली असून पौंडांचा उपयोग न केला जाण्याचें तेंच कारण आहे असें प्रतिपादलें आहे. व्यापारीवर्गाची दृष्टि

बाजारांत झटपट विकल्या जाणाऱ्या उपभोग्य वस्तूं-वर असल्यामुळें त्यांच्या आयातीसाठीं पौंडी ठेव खर्च केल्यास त्या वर्गाला आनंदच होईल. परंतु आपण स्टर्लिंग–ठेवीकडे भांडवल म्हणून पाहत असल्यामुळें तिचा खर्च उपभोग्य वस्तूंवर न होतां ज्यामुळें आपली उत्पादनशक्ति वाढवितां येईल अशा भांडवली सामग्रीसाठीं तिचा लाभ व्हावा ही इच्छा सरकारनें जास्त ग्राह्य धरली पाहिजे. पण केवळ तेवढ्यानेंच कार्य भागत नाहीं, तर तिचा प्रत्यक्षांत अंमल करण्याच्या दृष्टीनें योग्य तीं पावलें टाकण्याचें कामहि सरकारनें आपल्या अंगावर घ्यावयास हवें. अधिक उत्पादन हा जर चलनवृद्धीला आळा घालण्याचा मार्ग आहे, तर त्यासाठीं करावयाच्या योजनाहि सरकारच्याच कक्षेंत येतात हें कोणासहि पटण्यासारखें आहे. परंतु त्या दृष्टीनें योग्य तीं पावलें न टाकण्यांत आल्यामुळें उपलब्ध असलेल्या रूपांतर–क्षम स्टर्लिंगांचाहि उपयोग आपण करूं शकलों नाहीं ! जेव्हां जुलै १९४८मध्यें तिसरा करार करण्याचा प्रसंग आला त्या वेळीं ही नालायकीची परिस्थितीच आपल्याविरुद्ध वापरण्यांत आली असेंहि जाहीर झालें आहे. 'दिलेले स्टर्लिंग देखील तुम्हांला वापरतां येत नाहींत, मग कशाला उगीच आणखी द्या म्हणतां ?' असा सवाल ब्रि० सरकारकडून हिंदी सरकारला ऐकावा लागला आणि नव्या करारांत सर्वस्वीं ब्रिटिश सरकारच्या बाजूनें पुढें आलेल्या अटी आपणांवर लादल्या गेल्या !

## तिसरा करार

हा तिसरा करार दीर्घ मुदतीचा असल्यामुळें त्याकडे जास्त बारकाईनें पाहणें अगत्याचें आहे. सुरुवातीस म्हटल्याप्रमाणें या करारांत ज्या तीन मुख्य गोष्टींचा समावेश करण्यांत आला आहे, त्या अशाः—(१) ब्रि० सरकारनें युद्धकाळांत येथें ठेवलेल्या सामग्रीची किंमत ठरवून तीसंबंधींचा व्यवहार मिटविणें, (२) हिंदी सरकारनें दरसाल ब्रिटिश पेन्शनरांना द्यावयाच्या पौंडी रकमेची भांडवली किंमत ठरवून ती एकदम देऊन टाकणें व (३) पुढील तीन वर्षांत हिंदला मिळावयाच्या पौंडी ठेवीची रक्कम ठरविणें. या तिन्ही गोष्टींचा परिणाम पौंडी ठेवीवर होणार असल्यामुळें त्यांबद्दल अत्यंत जागरूक राहणें आवश्यक होतें. परंतु जो करार करण्यांत आला आहे त्यावरून श्री. मनु सुबेदार यांनीं म्हटल्याप्रमाणें देशाचें हित सर्वतोपरी साध्य झालें आहे असें मुळींच दिसत नाहीं. कसें तें पाहूं.

पहिला मुद्दा युद्धकालांत ब्रि० सरकारनें येथें ठेवलेल्या सामग्रीसंबंधींचा. यांत मोटारी, बंदुका, होड्या वगैरे युद्धसाहित्याबरोबरच रस्ते, विमानतळ, पूल यांचाहि समावेश होतो. या सर्वांची पुस्तकी किंमत पांचशें कोटी रु. होती व आतां हिंदुस्थान–सरकारनें त्यांबद्दल १३३ कोटी रुपये देऊन तिची मालकी आपल्याकडे घेतली आहे. युद्धांत झालेली मोडतोड, पडझड इत्यादींचा विचार करतां १३३ कोटी देणें योग्य होतें कीं नाहीं याचा विचार जरी बाजूला सारला, तरी ही किंमत देऊन आपल्या भांडवली ठेवीचा उपयोग आपलें उत्पादन वाढण्याला कितपत झाला हा मुद्दा महत्त्वाचा आहे. 'पूल, रस्ते, विमानतळ या गोष्टी ब्रिटिश सरकारला केव्हांहि येथेंच सोडून जावें लागलें असतें, तेव्हां त्यांची किंमत तरी काय म्हणून द्यावयाची ?' असा प्रश्नहि योग्य मानला पाहिजे. या दृष्टीनें पाहतां केवळ ५०० कोटी व १३३ कोटी यांची तुलना करून केवळ आपलें समाधान होण्यासारखें नाहीं; पण त्यापलीकडे आणखी कोणत्याच प्रकारें समाधान करण्याचा प्रयत्न सरकारी प्रवक्त्यांकडून झालेला नाहीं ! आपली उत्पादनशक्ति यामुळें वाढली असें म्हणणेंहि योग्य नाहीं.

## पेन्शनांची व्यवस्था

दुसरा मुद्दा पेन्शनांसंबंधींचा. याबद्दल असें सांगण्यांत आलें आहे कीं हिंदुस्थान–सरकारवर या पेन्शनांप्रीत्यर्थ सध्यां दरसाल सुमारें आठ कोटी रुपये खर्च पडतो. यापुढें नवीन ब्रिटिश पेन्शनर्स फारसे होणार नसल्यामुळें सालोसाल ही रक्कम कमीकमीच होत जाईल व साठ वर्षांनंतर या खातीं कांहींहि खर्च पडणार नाहीं असा अंदाज आहे. पण दरसाल ही रक्कम देण्यापेक्षां तीऐवजीं एकदम एकमुठीनें रक्कम देणें सोयीचें ( कोणाच्या ? ) ठरेल अशा समजुतीनें हिंदी सरकारनें पौंडी ठेवीपैकीं आणखी २२४ कोटी रुपये ब्रि० सरकारच्या हवालीं केले आहेत; पण तरी सुद्धां पेन्शनें वांटण्याची जबाबदारी हिंदी

# स्टर्लिंग–शिलकेची परतफेड

सरकारवरच राहणार आहे ! ब्रि० सरकार हिंदी सरकारला यापुढील साठ वर्षेपर्यंत उतरत्या दरानें दरसाल कांहीं रक्कम देत जाईल आणि ती घेऊन हिंदी सरकारनें हीं पेन्शनें द्यावीं अशी योजना आहे. आज हीं पेन्शनें हिंदी सरकारच्या तिजोरींतून जातात, म्हणजेच करांच्या रूपानें जनतेच्या खिशांतून येतात. तीं यापुढें द्यावीं लागणार नाहींत; पण म्हणून आनंद होण्याचें फारसें कारण नाहीं. कारण, त्यांबद्दलीं आज एकदम २२४ कोटी रुपये सरकारनें जनतेच्या खिशांतून काढून घेतलेच आहेत ! आजच्या घटकेला येवढी मोठी रक्कम एकदम देण्याची जनतेची तयारी आहे असा सरकारचा समज असला, तरी पुनर्घटनेसाठींच तिचा विनियोग करावा असें आतांपर्यंत वारंवार बोललें गेलें असल्यामुळें, तसेंच सबळ कारण असल्याशिवाय ही गोष्ट कोणीहि जबाबदार माणूस करूं धजणार नाहीं. हें कारण कोणतें हें मात्र सरकारतर्फे जाहीर झालें नाहीं. तसेंच या पद्धतीमुळें सरकारची कोणती विशेष सोय झाली हें समजणेंहि कठिण आहे. ब्रि० पेन्शनदारांची मात्र सोय झाली यांत बिलकुल संशय नाहीं ! कारण, त्यांचीं पेन्शनें त्यांना व्यवस्थितपणें मिळतील अशी निश्चिति उत्पन्न झाली आहे. ब्रि० सरकारच्या दृष्टीनें ही गोष्ट हिताचीच झाली. कारण, या प्रकारें एकंदर स्टर्लिंग–ठेवींपैकीं २२४ कोटी इतकी मोठी रक्कम साठ वर्षांइतक्या दीर्घ कालावर विभागून परत करण्याची सवलत त्याला मिळाली आहे. हिंदी सरकारनें एक भांडवली रक्कम गमावली आणि जनतेच्या खिशांत आठ कोटी जादा रुपये सध्यां तरी टाकले; पण चलनवाढ आधींच इतकी झाली आहे कीं व्यवहारांतील चलन निरनिराळ्या मार्गांनीं काढून कसें घ्यावें हीच विवंचना सरकारला पडली आहे. एकीकडे लहान रकमांची बचत करा म्हणत असतां सरकार दुसरीकडून अधिक पैसा व्यवहारांत ओतूं लागलें, तर चलनवृद्धीचें संकट नाहींसें होण्याचें नांवच नको ! बरें, या २२४ कोटींच्या बदलीं कांहीं चलन कमी केलें जाईल म्हणावें तर तशीहि योजना दिसत नाहीं. स्टर्लिंग–ठेव निर्माण होतांना चलनवृद्धि झाली, तर आतां ठेवींची वासलात लागतांना उलट्या क्रमानें चलन संकुचित केलें जाईल अशी अपेक्षा कोणीं केल्यास तींत वावगें काय आहे ? पण रिझर्व बँकेच्या कायद्यांत उलटी तरतूद नसल्यामुळें ती गोष्ट क्रमप्राप्त मात्र नाहीं. तेव्हां हे २२४ कोटी रु. गमावतांना बेचैन वाटणें मात्र साहाजिक आहे. अर्थमंत्र्यांनीं या गोष्टीसंबंधीं अधिक पटण्यासारखें कारण दाखविणें अत्यंत आवश्यक आहे.

कदाचित् स्टर्लिंग–ठेव बुडेल; तेव्हां त्यापूर्वी तींतून जास्तींत जास्त रक्कम या ना त्या मार्गें वळती करून घ्यावी असा हेतु या तरतुदीमागें असेल असें म्हणावें, तर त्यासंबंधींहि अर्थ–मंत्र्यांनीं स्पष्टपणें ग्वाही दिली असून ठेव बुडण्याचा संभव नाहीं असें निक्षून सांगितलें आहे.

## मुक्त ठेवीवर मर्यादा

करारांतील तिसरा मुद्दा यापुढील काळांत मिळावयाच्या स्टर्लिंगसंबंधींचा आहे. पण वर सांगितल्याप्रमाणें करारापूर्वीच्या अकरा महिन्यांतील अनुभव जमेला धरून पुढील वर्षांत नव्यानें मुक्त करावयाची रक्कम कांहींच नसून, त्यापुढील दोन वर्षांत दरसाल ५३ कोटी रुपये–प्रमाणें १०६ कोटी रुपयांची रक्कम मिळावयाची आहे व आज शिल्लक असलेली मुक्त ठेव १०७ कोटी आहे. या दोन्ही मिळून पुढील तीन वर्षांत एकूण २१३ कोटी रुपयांची सोय होण्यासारखी आहे. पण त्यांपैकीं फक्त वीस कोटी रुपयेच पुढील वर्षांत डॉलरमध्यें रूपांतर करण्यास उपलब्ध होतील व बाकीचे मुख्यतः स्टर्लिंग–क्षेत्रांत व कांहीं अंशीं झेकोस्लोव्हेकिया, स्वित्झर्लंड, फ्रान्स वगैरे स्टर्लिंग–क्षेत्राबाहेरील देशांत खर्चावयास मिळतील. पण या क्षेत्रांत होणारी यांत्रिक साधन–सामग्री तेथेंच पुरण्याइतकीहि नसल्यामुळें प्रत्यक्ष व्यवहारांत किती प्रमाणांत ही रक्कम खर्चितां येईल हें सांगणें कठिण आहे.

कराराची मुदत जरी तीन वर्षांची असली, तरी डॉलरसाठीं बारा महिन्यांनंतर पुनः वाटाघाटी कराव्याच लागतील. त्या वेळीं ब्रिटनची आर्थिक परिस्थिति असेल तदनुसार पुढें मिळावयाची रक्कम निश्चित होणार. म्हणजे हिंदुस्थानला आपल्या भावी योजनांसाठीं सदैव ब्रि० सरकारवरच अवलंबून राहण्याची पाळी तरी येणार, किंवा स्टर्लिंग–ठेव








बुडली असें समजून इतर मार्गांनींच आपला औद्योगीकरणाचा प्रश्न सोडवावा लागणार हें स्पष्ट आहे.

## अजून शिल्लक किती ?

नुकत्याच झालेल्या करारप्रमाणें १३३+२२४= ३५७ कोटी रुपयांची विल्हेवाट तर सरळच लागली! राहिलेल्या रकमेपैकीं कांहीं भाग पाकिस्तानच्या वांट्याला जावयाचा आहे. तो साधारणपणें १२३ कोटी असेल असा अंदाज आहे. हा करार होण्यापूर्वी एकंदर ठेव १५४७ कोटींची होती. तींतून वरील सर्व रक्कम वजा घालतां १०६७ कोटी रुपये उरतात. त्यांपैकीं २१३ कोटी रुपये पुढील तीन वर्षांत मिळण्याची शक्यता आहे. त्यांशिवाय २६७ कोटी रु. आपल्या चलनाला तारण म्हणून बाजूला काढण्याचा सरकारचा इरादा दिसतो. तसें झाल्यास ३० जून १९५१ला फक्त ५८७ कोटी रुपये किंमतीची शिल्लक राहील. आणि तेवढ्या अवधींत ब्रिटनमध्यें कांहीं अनिष्ट राजकीय घडामोड झाली तर तिच्यापैकीं किती भाग आपल्या हातीं पडेल आणि किती युद्धकार्याला देणगी म्हणून वजा केले जातील तें कोणाला सांगतां येईल? ब्रिटिश सरकारनें स्टर्लिंग–शिलकेच्या शृंखलेनें हिंदला आपल्या दावणीला बांधून ठेवलें आहे, असें मात्र दिसतें.

वास्तविक पाहतां १२०० कोटी रुपये म्हणजे ब्रिटनच्या एकंदर राष्ट्रीय उत्पन्नाच्या एकदशांशापेक्षांहि कमी रक्कम होते. तिची परतफेड दहा वर्षांवर विभागून दिल्यास दरसाल आपल्या उत्पन्नापैकीं एक शतांश रक्कम देखील ब्रिटनला खर्चावी लागत नाहीं. अशा भूमिकेवरून पौंडी शिलकेचा एकदां कायमचा सोक्षमोक्ष करण्याऐवजीं ब्रिटनला सर्व सवलती देऊन आपलें धोरण अनिश्चिततेंत डोलत ठेवण्यांत हिंदी सरकारनें पुरेशी दूरदृष्टि दाखविली आहे असें वाटत नाहीं. दीर्घ मुदतीचा करार देखील प्रत्यक्ष उपयुक्ततेच्या दृष्टीनें बारा महिन्यांचाच करार ठरावा याचेंहि आश्चर्य वाटतें. आपली 'ग्रहण-शक्ति' आजच्याहून जास्त वाढविण्यासाठीं करावयाच्या योजनांचेंहि घोडें पेंडच खात असलेलें दिसतें. त्यामुळें ज्या परिस्थितींत स्टर्लिंग–शिलकेचा उगम झाला तिच्यांतील हालअपेष्टा सत्कारणीं लागल्या नाहींत असेंच म्हणणें भाग आहे.

९–८–४८

---

अन्न ही प्राणिमात्रांची पहिली गरज आहे. 'अन्नात् हि एव इमानि भूतानि जायन्ते' या श्रुतिवचनाच्या रूपानें हिंदुधर्मानें अन्नाला वास्तव असें आद्य स्थान दिलें आहे. तें अन्न मिळविण्याला अत्यंत सहायक अशा गोमातेला हिंदुधर्मांत अत्यंत मानाचें स्थान मिळालें आहे. भगवान् श्रीकृष्णांनीं आपल्या जीवनांत गाईला किती गौरवाचें स्थान दिलें आहे! गो–वर्धन पर्वताच्या उतरणीवर गो–पालांसमवेत गो–धन चारणाऱ्या या 'गो–कुळींच्या राण्या'नें हिंदुजनमनांत गो–रसाची लयलूट करून ठेविली आहे. ... भगवान् श्रीकृष्ण हे शरीरपोषणाला अत्यंत आवश्यक अशा गोरसाचें —दूधदुभत्याचें (Dairy-farmingचें) प्रतीक आहेत, तर त्यांचे बंधु बळराम हे कर्षाचे किंवा शेतीचे प्रतिनिधि आहेत. बळरामांना हली किंवा हलायुध नांव असून कृषीचें अवजार 'हल किंवा नांगर' ही त्यांची वैशिष्ट्यपूर्ण खूण आहे. ...... हिंदुजनमनांत श्रीकृष्ण–बळरामांच्या अभेद्य जोडीनें अत्यंत भक्तिभावाचें स्थान पटकाविलें आहे. मानवांच्या अन्नवस्त्ररूपी मूलभूत गरजा भागवून त्यांचें जीवन उन्नत करणाऱ्या संस्कृतीचे प्रतिनिधी असे कृष्ण व बळराम हे दोघे हातांत हात घालून व ते हात उंचावून परस्परांसमोर उभे आहेत. त्यांच्या हातमिळवणीच्या सेतूखालून मानवी संस्कृतीचा प्रवाह अखंड वाहत आला आहे. ......... प्राचीन काळीं अन्नवस्त्रांचें वैपुल्य असणाऱ्या या देशांत आज अन्नान्नदशा व्हावी हें दृश्य अत्यंत भीषण आहे!.... ब्रिटिश लोकांनीं हिंदुस्थानांत पाऊल ठेवण्याच्या आधीं, सिराज–उद्दौल्याच्या वेळीं बंगालमध्यें तांदूळ २ आणे ते ३ आणे मण मिळत होता. त्याच 'सुजला, सुफला' अशा बंगभूमींत एक अवकाळ असा यावा ना कीं तांदुळाचा भाव १२० रु. मणापर्यंत कडाडावा?..............

**—डॉ. बी. भट्टाचार्य, M. A. Ph. D., डायरेक्टर, ओरिएंटल इन्स्टिट्यूट, बडोदें, यांच्या एका लेखांतून**



अनुक्रमणिका






# ऑलिंपिक सामन्यांचा इतिहास

प्रा. ना. अ. गोरे

युरोप खंडाच्या आग्नेय टोंकाला व बाल्कन द्वीपकल्पाच्या दक्षिणेला असलेलें ग्रीस राष्ट्र चिमुकलेंसें असलें तरी एकंदर पाश्चात्य संस्कृतीवर ग्रीक वाङ्मय, कला व शास्त्रें यांची मोठी छाप पडलेली आहे. इतर राष्ट्रांपेक्षां ग्रीसचें त्याच्या पूर्वेकडील सुधारलेल्या देशांशीं अधिक दळणवळण असल्यानें इसवी सनापूर्वी एक हजार वर्षें विद्या नि कला यांमध्यें त्याची चांगलीच प्रगति झालेली होती. त्या काळीं ग्रीसचे सतरा स्वायत्त विभाग किंवा संस्थानें होतीं व त्यांचे एकमेकांशीं मधून मधून झगडे चालूच असत. राष्ट्रभर असें युद्धमय वातारण पसरलेलें असल्यानें ग्रीक तरुणांच्या वीरवृत्तीला आवाहन मिळालें. त्यामुळें केवळ बौद्धिक सामर्थ्य पुरेसें नसून त्याला सुदृढ, सुंदर व बलशाली शरीरसंपदेची जोड अवश्य आहे हें त्यांना पटलें व मैदानी खेळ व शर्यती यांत भाग घेऊन नांव मिळविण्यांत ग्रीक युवकांना धन्यता वाटूं लागली. मनावर चांगले संस्कार व्हावयाचे असतील व सत्प्रवृत्ती वाढीला लागावयाच्या असतील तर शरीरें दुबळें–नेभळें असून चालणार नाहीं ही शिकवण ग्रीक तत्त्ववेत्त्यांनीं लोकांच्या मनांवर बिंबविली. त्यामुळें क्रीडाक्षेत्रांत ग्रीक लोक पहिल्यापासूनच प्रसिद्धीला आले. अलीकडच्या काळांत होणाऱ्या आंतरराष्ट्रीय खेळांत ऑलिंपिक सामन्यांना अग्रपूजेचा मान मिळालेला आहे. या सामन्यांचा प्रारंभहि ग्रीसमध्येंच झालेला आहे. इंग्लंडमध्यें नुकत्याच झालेल्या चौदाव्या ऑलिंपिक सामन्यांच्या निमित्तानें या सामन्यांचा ग्रीसमध्यें कोणत्या कारणानें उद्‍गम झाला, त्यांचा विकास पुढें कसा झाला, त्यांत खंड कां पडला, आणि त्यांचें पुनरुज्जीवन कोणीं व कधीं केलें इत्यादि माहिती समजून घेणें उद्बोधक व मनोरंजक ठरल्याशिवाय राहणार नाहीं.

## ऑलिंपिक सामन्यांचा उगम

ग्रीसमधील ऑलिंपिया या गांवीं हे सामने प्रथम सुरू झाले म्हणून त्यांना ऑलिंपिक सामने असें म्हणतात. हे नक्की केव्हां सुरू झाले याविषयीं निश्चित माहिती उपलब्ध नाहीं. पण ते फार प्राचीन काळापासून चालू असावे यांत शंका नाहीं. कारण इ. स.-पूर्वी हजार वर्षांच्या सुमारास होऊन गेलेल्या होमर या सुप्रसिद्ध ग्रीक महाकवीच्या काव्यांत त्यांचा उल्लेख आढळतो. त्यांच्या सुरुवातीसंबंधीं निरनिराळ्या दंतकथाहि प्रचलित होत्या, असें प्राचीन ग्रीक वाङ्मयावरून दिसून येतें. पृथ्वीवर अधिसत्ता कोणत्या देवाची असावी या मुद्द्यावरून ग्रीकांचा देवराज झ्यूस् ( Zeus ) व क्रोनोस ( Kronos ) या दोन देवांमध्यें घनघोर द्वंद्वयुद्ध झालें. त्यांत झ्यूस विजयी झाल्याच्या आनंदाप्रीत्यर्थ त्याच्या भक्तांनीं हे सामने तेव्हांपासून सुरू केले अशी एक समजूत आहे. दोन देवांच्या झगड्याशीं या सामन्यांचा संबंध नसून ग्रीसच्या इतिहासांतल्याच एका घटनेशीं त्यांच्या सुरुवातीचें मूळ आहे असें कांहीं अभ्यासकांचें मत आहे. ग्रीसमध्यें इनॉमेअस (Oenomaus) नांवाचा एक राजा झाला. त्याला हिप्पोडेमिआ ( Hippodemia ) म्हणून एक स्वरूपसुंदर मुलगी होती. साहाजिकच देशांतल्या तरुणांमध्यें तिचें पाणिग्रहण करण्याची स्पर्धा लागली. तें पाहून राजानें तिचें स्वयंवर मांडलें व असा पण घोषित केला कीं ‘राजकन्येशीं विवाह करूं इच्छिणाऱ्या तरुणानें तिला








रथांत घालून पळवून न्यावें; परंतु त्या रथाचा खुद्द इनॉमेअस पाठलाग करील व जर राजानें वराला गांठलें तर त्या पडेल वराला राजा भाल्यानें भोंसकून परलोकाला धाडील.' राजकन्येच्या असामान्य रूपसंपदेवर मोहित झालेल्या कित्येक तरुणांनीं जिवावर उदार होऊन तिला रथांत बसवून निघून जाण्याचा प्रयत्न केला; पण दर वेळीं राजानें पाठलाग करून त्यांना पकडलें व भाल्यानें विद्ध करून ठार केलें. तेरा तरुणांनीं आपले जीव अशा रीतीनें गमावले. पण चौदाव्या पेलोपस नामक तरुणानें शक्तीवर युक्तीनें मात करावयाचें योजून भेदनीतीचा अवलंब केला. राजाच्या सारथ्याला त्यानें भरपूर लांच देऊन वश करून घेतलें. त्याचा परिणाम असा झाला कीं पेलोपसच्या रथाचा पाठलाग करीत असतां एकाएकीं इनॉमेअसच्या रथाचें चाक निखळलें व त्या अपघातांत तो मरण पावला. पेलोपसच्या धूर्तपणानें त्याला राजकन्याच नव्हे तर इनॉमेअसचें राज्यहि मिळालें. पेलोपसला हा विजय ऑलिंपियाच्या मैदानावर मिळाला म्हणून त्यानें आपल्या जयाच्या स्मरणार्थ, २३५ यार्ड लांब व ३५ यार्ड रुंद अशा त्या मैदानावर निरनिराळ्या खेळांचे व कसरतींचे सामने सुरू केले. तेच पुढें ऑलिंपिक सामने या नांवानें प्रसिद्धि पावले. ऑलिंपिक सामन्यांचा उगम असा दंतकथेंत गुरफटलेला असला तरी इ. स.पूर्वीं ७७६ या वर्षीं ते नक्की भरलेले होते असा निश्चित स्वरूपाचा ऐतिहासिक पुरावा मिळूं शकतो. त्या वर्षीचे सामने हे अठ्ठाविसाव्या वेळीं भरणारे सामने असा उल्लेख आढळतो. ऑलिंपिक सामने दर चौथ्या वर्षीं भरविण्याची प्रथा असल्यानें पहिल्या ऑलिंपिक सामन्यांचा संबंध इ.स.पूर्व ८८४-पर्यंत जाऊं शकतो. पण ग्रीकांनीं या सामन्यांपासून कालगणनेला जो प्रारंभ केला तो इ.स.पूर्व ८८४-पासून न करतां इ.स.पूर्व ७७६पासूनच केला. इ.स.पूर्व ७७६ ते इ.स.पूर्व ७७३अखेरच्या कालाला ते पहिलें 'ऑलिंपिॲड' असें म्हणूं लागले. इ.स.पूर्व ७७६ या वर्षीच्या सामन्यांत ६०० फूट पळण्याची शर्यत हाच मुख्य कार्यक्रम होता. त्यांत कॉरिबस ( Coroebus ) हा खेळाडू विजयी झाला व ऑलिव्ह झाडांच्या पानांची माळ त्याच्या गळ्यांत घालून त्याचा सत्कार करण्यांत आला. पुढें तेराव्या ऑलिंपिॲडच्या वेळीं इतर खेळांचा या सामन्यांत समावेश झाला व ७७व्या ऑलिंपिक सामन्यांच्या वेळीं तर खेळांची खूपच गर्दी झालेली होती. त्यांतले मुष्टियुद्ध व कुस्ती यांसारखे कांहीं सामने फार धोक्याचे असत व त्यांत कित्येक खेळाडूंवर जिवाला मुकण्याची पाळी येई.

## प्राचीन काळांतील सामन्यांची पद्धति

त्या काळीं सामन्यांतल्या विजयी खेळाडूंना सुवर्णपदकें देण्याची प्रथा नव्हती. पुष्पपल्लवांच्या माळा घालून त्यांचा सन्मान करीत. या सामन्यांत शारीरिक बळाची पारख होत असली तरी त्यांवर एक प्रकारचें धार्मिक वातावरण पसरलेलें होतें. सामन्यांचा प्रारंभ, झ्यूस देवाला एका डुकराचा व सामन्यांचा संस्थापक पॅलोपस याच्या स्मरणार्थ एका काळ्या मेंढ्याचा बळी देऊन होत असे व त्यांचें उद्घाटन ग्रीक धर्मगुरूच्या हातून होई. ऑलिंपिक क्रीडांगणाच्या कडेला झ्यूसचें, तशींच सामन्यांच्या संरक्षक देवतांचीं देवळें बांधलेलीं होतीं व त्यांत एक दीपज्योत सामने चालू असेपर्यंत अखंड प्रज्वलित ठेवलेली असे. सामने पांच दिवस चालू राहत व त्यांत सर्वश्रेष्ठ ठरलेला खेळाडू मिळालेल्या यशाबद्दल झ्यूस देवाचे जाहीर रीतीनें आभार मानी. अशा वीराचा सर्व देशभर फारच गौरव होत असे; इतकेंच नव्हे, तर तो ज्या गांवीं अगर शहरीं राही तें ठिकाण देवांच्या विशेष मर्जींतलें आहे असें समजत. कांहीं यशस्वी खेळाडूंची तर त्यांच्या मृत्यूनंतर एखाद्या देवासारखी पूजा होत असे.

या सामन्यांत ग्रीक नागरिकांशिवाय इतरांना भाग घेण्याची मनाई असे. प्रत्येक खेळाडूला आपण स्वतंत्र ग्रीक नागरिक असल्याची झ्यूसच्या मूर्तीसमोर शपथ घ्यावी लागे व देवतांविरुद्ध आपण कांहीं आक्षेपार्ह वा पापी वर्तणूक केली नसल्याचें प्रतिज्ञेवर सांगावें लागत असे. सामने चालू झाले कीं राष्ट्रांतल्या निरनिराळ्या संस्थानांतल्या आपापसांतल्या लढायांत युद्धतहकुबी घोषित केली जाई व युध्यमान शहरांतील नागरिक परस्परांच्या प्रदेशांत बिनधोकपणें जाऊं शकत. कवींना व शिल्पकारांना हे सामने पाहण्यासाठीं मुद्दाम पाचारण करण्यांत येई व








त्यांनाहि सामन्यांतल्या प्रसंगांनीं व खेळाडूंच्या रेखीव लवचीक शरीरें आणि त्यांची तेजःपुंज कांति पाहून नवकाव्यें रचण्यास व सुंदर प्रमाणबद्ध पुतळे करावयाला स्फूर्ति मिळत असे. इ.स.पूर्वी सहाव्या शतकांत होऊन गेलेल्या पिंडार नांवाच्या कवीनें या सामन्यांचे पोवाडे गाइले आहेत.

सामन्यांत भाग घेणाऱ्या खेळाडूंना सामने सुरू होण्याच्या आधीं कमींत कमी दहा महिने आपण नियमितपणें व्यायाम केला असल्याची शपथ घ्यावी लागे व खुद्द ऑलिंपियाच्या मैदानावर एक महिनाभर राहून सामन्यांतल्या ज्या खेळांत भाग घ्यावयाचा असे त्यांची व्यायाम–शिक्षकांच्या नजरेखालीं तालिम करावी लागे. त्यांच्या खाण्यापिण्यावर सक्त देखरेख ठेवण्यांत येई. क्रीडांगणाच्या कडेला बांधलेल्या व्यायामशाळांत मेहनत करण्याची उत्तम व्यवस्था होती, ऊन व थंड पाण्याचीं स्नानगृहें होतीं, व्यायाम घेण्यासाठीं व अंग पुसण्यासाठीं स्वतंत्र खोल्या बांधलेल्या होत्या. सामन्यांत भाग घेणाऱ्या खेळाडूंना आपला सर्व खर्च करावा लागे व यशस्वी खेळाडूंना आपल्या विजयाप्रीत्यर्थ आपल्या खर्चानें मेजवानी द्यावी लागत असे. असा खर्च होत असल्यानें श्रीमंतांच्या मुलांनाच त्यांत भाग घेणें शक्य होई. सामन्यांचा मुख्य उद्देश शरीरबलसंवर्धनाचा असला तरी मनुष्यस्वभाव हा इथून तिथून सारखाच असल्यानें सामन्यांत आपल्यालाच अजिंक्यपद मिळावें म्हणून अप्रामाणिकपणें जय मिळविण्याची धडपड करणारेहि खेळाडू निघाले नाहींत असें नाहीं. खेळाडूंची लबाडी उमगली तर अर्थातच त्यांना भरपूर दंड करून त्यांचा धिक्कार केला जाई. इतर संभाव्य लबाड खेळाडूंना वचक बसावा म्हणून त्या दंडाच्या पैशांतून मैदानाच्या प्रवेशद्वाराशीं झेनस् (Zanes) नांवाचे पुतळे उभारण्यांत आले.

## मातेचा विजय

डिमिटर (भूमाता) देवतेच्या पुजारणीखेरीज इतर स्त्रियांना या सामन्यांत भाग घ्यावयालाच नव्हे तर ते पाहण्यास देखील सक्त मनाई होती. या नियमाचा भंग करणाऱ्या स्त्रीला कडेलोटानें मृत्यूची शिक्षा द्यावी असें ठरविण्यांत आलेलें होतें. इतका कडक नियम करण्याचें कारण असें होतें कीं सामन्यांत भाग घेणाऱ्या खेळाडूंनीं नुसती चड्डी देखील नेसूं नये असा प्रघात होता. पण एका स्त्रीनें पुत्रप्रेमानें या नियमाचें उल्लंघन करून आपले प्राण गमाविण्याची पाळी आपणावर ओढवून घेतली. पेसिडोरियस या ग्रीक तरुणानें एकदां ऑलिंपिक सामन्यांत भाग घ्यावयाचें ठरवून रीतीप्रमाणें दहा महिने आधीं मेहनतीला सुरुवात केली; पण दुर्दैवानें कांहीं महिन्यांच्या आंतच त्याचे वडील वारले! तेव्हां त्याच्या आईनें पातिनिधनाचें दुःख गिळून आपल्या मुलाच्या व्यायामाकडे जातीनें लक्ष देऊन त्याची आवश्यक ती तयारी करवून घेतली. साहजिकच मुलाचा क्रीडांगणावरील पराक्रम पाहण्याची तिला ओढ लागली; पण सामने पाहण्याला स्त्रियांना बंदी असल्यानें पुरुषवेष धारण करून ती सामने पाहावयाला गेली. सामन्यांत आपल्या मुलानें अजिंक्यपद मिळविल्याचें पाहून ती हर्षनिर्भर होऊन मोठमोठ्यानें घोषणा करून आपला आनंद व्यक्त करूं लागली. परंतु त्यामुळेंच तिची वेषांतराची लबाडी उघडकीला आली. नियमानुसार तिला मृत्यूचीच शिक्षा व्हावयाची; पण तिच्या मुलानें सामन्यांत सर्वांत जास्त प्रावीण्य प्रकट करून अजिंक्यपद मिळविलें असल्यानें तिला कडेलोटाची कठोर शिक्षा देण्यांत आली नाहीं. पुढें लोकमतांत बदल होऊन स्त्रियांना सामने पाहण्याची मुभा मिळाली. आणखी कांहीं वर्षें गेल्यावर तर त्यांना सामन्यांत भाग घेण्याची परवानगीहि देण्यांत आली व स्त्रियांनींहि आपल्या अंगच्या क्रीडानैपुण्याचा प्रत्यय आणून दिला. १२८व्या ऑलिंपिक सामन्यांतल्या घोड्यांच्या रथाच्या शर्यतींत एका स्त्रीनेंच विजय मिळविला.

## सामने बंद पडतात

ग्रीस स्वतंत्र असेपर्यंत हे सामने चढत्या–वाढत्या महत्त्वानें, मोठ्या थाटानें व उत्साहपूर्ण वातावरणांत दर चार वर्षांनीं भरत असत. पण इ. स. १४६-च्या सुमारास ग्रीसवर रोमन साम्राज्याचा अंमल बसला व पारतंत्र्यामध्यें ऑलिंपिक सामन्यांचें महत्त्व तसेंच त्यांतील धार्मिक वातावरण कमी कमी होऊं लागलें. स्वतंत्र असतांना ग्रीक लोक इतरांना त्यांत भाग घेऊं देत नसत; पण पराधीन जिणें झाल्यानें इतर देशांतले लोकहि त्यांत भाग घेऊं लागले.








ग्रीकांना सामन्यांत विजय झाल्यावर मिळणाऱ्या नुसत्या पुष्पलतामालांनींहि संतोष वाटे; पण आतां या परदेशस्थ खेळाडूंचें तेवढ्यानें समाधान होईना. त्यांना इतर बक्षिसें व पैसा यांचा हव्यास वाटूं लागला आणि इतर दृष्ट्याहि सामन्यांचा ऱ्हास सुरू झाला. इ. स. ३९४ या सालीं तर रोमच्या पहिल्या थिओडोसिअस (Theodosius) या राजानें हे सामने बंद पाडले व ऑलिंपिक मैदानाच्या सभोंवतालीं असलेल्या देवळांची लूट करण्यांत आली. दुसऱ्या थिओडोसिअसनें इ. स. ४२८त ऑलिंपिक मैदानाभोंवतालची तटबंदी पाडून उध्वस्त केली! पुढें सुमारें एक शतकानंतर निसर्गाचाहि प्रकोप झाला व भूकंपामुळें ऑलिंपियाजवळून वाहणाऱ्या ऑल्फियस नदीच्या पात्राखालीं, शेंकडों वर्षे गाजलेलें हें ऑलिंपियाचें क्रीडांगण गडप होऊन गेलें!

## सामन्यांचें पुनरुज्जीवन

शेंकडों वर्षे गेल्यानंतर जर्मन पुराणवस्तुसंशोधकांनीं ऑलिंपिया गांवीं उत्खनन करून प्राचीन मंदिरांचे अवशेष शोधून काढल्यानें ऑलिंपिक सामन्यांच्या प्राचीन इतिहासाकडे जगाचें लक्ष वेधलें. हे सामने इ. स. ३९४त बंद पडल्यानंतर पंधराशें वर्षांनीं त्यांचें पुनरुज्जीवन करण्याचा मान एका फ्रेंच सरदाराला मिळाला. त्याचें नांव बॅरन् पीरडि कौबर्टन् (Barran Pierre de Coubertin). त्याचा जन्म पॅरिस येथें १ जानेवारी १८६२ रोजीं झाला. त्याच्या घरच्या मंडळीच्या मनांत त्यानें लष्करी पेशा पत्करावा असें होतें. म्हणून त्याला सेंट सीर (St. Cyr) येथील लष्करी विद्यालयांत धाडण्यांत आलें. पण त्याचा ओढा राजनीतिशास्त्राकडे व विशेषतः शिक्षण–शास्त्राकडे असल्यानें त्यानें लष्करी शिक्षणाला रामराम ठोकला नि तो युरोपांतील व अमेरिकेंतील शिक्षणसंस्थांची पाहणी करण्यासाठीं निघाला. खेळ आणि शिक्षण यांचें नेहमींच साहचर्य असतें. निरनिराळ्या राष्ट्रांतील तरुण जर शिक्षणासाठीं व खेळांनिमित्त एकत्र आले तर त्यांच्यांत बंधुभाव वाढेल व आंतरराष्ट्रीय क्रीडास्पर्धेनें राष्ट्रांराष्ट्रांतल्या कलहांना व युद्धांना आळा बसेल अशा आशेनें त्यानें ऑलिंपिक सामन्यांचें पुनरुज्जीवन करावयाचा संकल्प केला. युरोपांत व अमेरिकेंत दौरे काढून व आपल्या मताचा प्रचार करून त्यानें लोकमत अनुकूल करून घेतलें आणि आधुनिक काळांतले पहिले ऑलिंपिक सामने इ. स. १८९६ सालीं ग्रीसची राजधानी अथेन्स येथें भरविण्यांत त्यानें यश मिळविलें.

ऑलिंपिक सामने मूळचे ग्रीसमधले, म्हणून साहजिकच ग्रीसला हे सामने भरविण्याचा पहिला मान मिळाला. ऑलिंपिया येथेंच ते भरवितां आले असते तर सर्वांनाच फार आनंद वाटला असता. पण पूर्वीं सांगितल्याप्रमाणें निसर्गप्रकोपानें ऑलिंपिया नामशेष झालें असल्यानें अथेन्स शहराची निवड करण्यांत आली. या सामन्यांना ६ एप्रिल १८९६ रोजीं सुरुवात झाली व त्यांत बारा राष्ट्रांतल्या खेळाडूंनीं भाग घेतला. नाचणें, गाणें, पोहणें, पर्वतारोहण, घोड्यावर बसणें, कसरतीचे खेळ इत्यादि दुसरे अनेक खेळ या सामन्यांत समाविष्ट असले तरी निरनिराळ्या अंतरांपर्यंत पळण्याच्या शर्यती व उंच उडी, लांब उडी, वजनफेंक, भालाफेंक, चक्रफेंक इत्यादि मैदानी सामने म्हणजेच मुख्य ऑलिंपिक सामने असें मानण्यांत येतें. पळण्याच्या शर्यतींतील सव्वीस मैल पळण्याची 'मॅरेथॉन–रेस' या नांवानें प्रसिद्ध असलेली शर्यत श्रेष्ठ असून ती मुख्य ऑलिंपिक सामन्यांचे शेवटीं होत असली तरी सर्व जगाचे डोळे तिच्या निकालाकडे लागलेले असतात. मॅरेथॉन–शर्यतीचा प्राचीन काळच्या ऑलिंपिक सामन्यांत अंतर्भाव नव्हता.

## मॅरेथॉन–शर्यत

ग्रीसच्या इतिहासांत सुप्रसिद्ध असलेल्या मॅरेथॉनच्या लढाईंतील एका रोमहर्षण प्रसंगाचें स्मारक म्हणून ही शर्यत १८९६ सालीं प्रथम सुरू करण्यांत आली. इ. स पूर्वीं ४९०मध्यें पर्शियाच्या डरायस राजानें एक लक्ष सैन्यानिशीं अथेन्सवर स्वारी करण्याचा बेत केला व अथेन्सनजीक सुमारें पंचवीस मैलांवरच्या मॅरेथॉनच्या उपसागरांत येऊन आपलें प्रचंड सैन्य त्यानें जहाजांतून किनाऱ्यावर उतरविलें. तेथून दौड करून अथेन्सवर एकदम हल्ला करावा असा त्याचा बेत होता. पण अथेन्सच्या लोकांना








या गोष्टीचा वेळींच सुगावा लागून त्यांच्या मिल्टिॲडिस् नांवाच्या शूर सेनापतीनें केवळ दहा हजार सैन्यासह मॅरेथॉनच्या मैदानावर धांव घेतली व तेथेंच शत्रूशीं मुकाबला केला. ग्रीक सैनिक पर्शियनांच्या अफाट सेनेच्या केवळ एकदशांश होते; तरीहि त्यांनीं पराक्रमाची शर्थ करून प्राणपणानें लढा दिला व एकदम चारी बाजूंनीं हल्ला करून पर्शियन शिपायांना परत जहाजांतून पळून जावयाला भाग पाडलें. ग्रीक वीरांना या विजयानें साहजिकच अतिशय आनंद झाला व या लढाईच्या निकालाकडे डोळे लावून बसलेल्या अथेन्समधील प्रमुख नागरिकांना व अधिकाऱ्यांना ही विजयाची सुवार्ता कळविण्याच्या कामीं सेनापति मिल्टिॲडिसनें फीडिप्पिडस् या योद्ध्याची योजना करून त्याला शक्य तितक्या त्वरेनें दौडत जाऊन अथेन्सला पोंचण्याची आज्ञा केली. ॲथेन्सपासून मॅरेथॉनपर्यंतच्या मार्गांत टेंकड्या आणि दऱ्या पसरलेल्या असल्यानें ग्रीक शिपाई पायींच तेथें आले होते. अर्थात्च बिचाऱ्या फीडिप्पिडसला धांवत जाण्याशिवाय दुसरा मार्गच नव्हता. दिवसभराच्या घनचक्कर लढाईत तो कांहीं कमी थकला नव्हता. पण वरिष्ठाची आज्ञा शिरोधार्य मानून तो अथेन्सच्या दिशेनें वाऱ्यासारखा पळत सुटला. खडे व कांटे टोंचून त्याचे पाय रक्तबंबाळ झाले, तहानेनें घसा कोरडा पडला! पण केव्हां एकदां विजयाची वार्ता अथेन्समध्यें जाऊन सांगतों असें त्याला झालें होतें. म्हणून तो जिवाची पर्वा न करतां व क्षणाचीहि उसंत न घेतां पळतच राहिला व तीन साडेतीन तासांच्या आंत अथेन्सच्या मुख्य कचेरींत पोंचला. तेथल्या लोकांच्या कानीं त्यानें ही अपूर्व विजयाची बातमी घातली मात्र नि झालेल्या प्रमाणातिरिक्त श्रमांनीं तो तेथेंच गतप्राण होऊन पडला!

फीडिप्पिडसच्या अद्भुत पराक्रमाचें व त्याला आलेल्या वीर-मरणाचें स्मारक करण्यासाठीं, मॅरेथॉनपासून अथेन्सपर्यंत पळत जाण्याची शर्यत ठेवावी अशी कल्पना इ. स. १८९६च्या अथेन्स येथील सामन्यांत निघाली व तेव्हांपासून ही शर्यत ऑलिंपिक सामन्यांचें महत्त्वाचें आकर्षण होऊन राहिली आहे.

या शर्यतीची ही सुरुवात ज्या प्रसंगावर आधारलेली आहे तो जितका वीररसपूर्ण आहे, तितकीच अथेन्समधल्या पहिल्या मॅरेथॉन-शर्यतीची हकीकतहि मोठी मनोरंजक आहे. दीड हजार वर्षें खंडित झालेले हे सामने पुनः सुरू व्हावयाचे असल्यानें सबंध ग्रीस राष्ट्रभर या सामन्यांविषयीं अपूर्व उत्साह निर्माण झाला होता; पण निरनिराळ्या शर्यतींचे निकाल जसजसे जाहीर होऊं लागले, तसतसें ग्रीक लोकांत खिन्नतेचें व निरुत्साहाचें वातावरण पसरलें. दीर्घकालीन पारतंत्र्यानें जणूं त्यांच्या पराक्रमाला ओहोटीच लागली होती. कारण, झालेल्या सर्व स्पर्धांत परराष्ट्रीय खेळाडूच अजिंक्यपदें मिळवून बसले. राहतां राहिली एक मॅरेथॉन--शर्यत. या शर्यतींत निरनिराळ्या राष्ट्रांतल्या पंचवीस खेळाडूंनीं भाग घेतला होता. त्यांतच स्पिरिडॉन लुई हा तरुण ग्रीक धनगर होता. आपल्या राष्ट्राचा मान राखण्यासाठीं आपल्याला या शर्यतींत यश मिळावें अशी त्यानें दोन रात्रीं देवाची करुणा भाकली व शर्यतीच्या आधल्या रात्रीं उपवास केला. लुईनें प्रयत्नांची शर्थ करून शर्यत जिंकल्यावर ग्रीकांचा उत्साह काय विचारावा! स्पिरिडॉन् लुई याचा अभूतपूर्व सत्कार करण्यांत आला इतकेंच नव्हे, तर आपण जिवंत असेतों लुईची फुकट हजामत करूं असें एका ग्रीक नापितानें जाहीर केलें, एका कापड-व्यापाऱ्यानें त्याला जन्मभर फुकट कपडे पुरवावयाचें अभिवचन दिलें नि एका हॉटेलवाल्यानें जन्मभर मोफत जेवण द्यावयाची हमी घेतली!

## अमेरिकन खेळाडूंचें नैपुण्य

अथेन्समध्यें आधुनिक काळांतल्या पहिल्या ऑलिंपिक सामन्यांत झालेल्या खेळांच्या एकूण बारा शर्यतींपैकीं नऊ शर्यतींत अमेरिकन खेळाडूंनीं उच्चांक मिळविला. या वेळेपासून आजवर झालेल्या प्रत्येक सामन्यांत अमेरिकन खेळाडूंनीं इतर सर्व राष्ट्रांपेक्षां अधिक उच्चांक मिळवून क्रीडाक्षेत्रांत अमेरिकेचें अनन्यसाधारण स्थान कायम राखिलें आहे.

एका फ्रेंच उमरावाच्या प्रयत्नांनीं या सामन्यांचें पुनरुज्जीवन झालेलें असल्यानें अर्थात्च अथेन्सनंतर ऑलिंपिक सामने भरविण्याचा मान फ्रान्सला मिळून १९०० सालीं ते पॅरिस येथें भरले. जुलै महिन्यांत ते










सुरू झाले व त्यांत तेरा राष्ट्रांनीं भाग घेतला. या वेळींहि बाविसांपैकीं सतरा शर्यतींत अमेरिकन खेळाडूंनींच अग्रमान मिळविला.

१९०४ सालचे तिसरे ऑलिंपिक सामने अमेरिकेंतल्या मिसुरी संस्थानच्या सेंट लुई या शहरीं भरले. इतक्या दूर जाणें बऱ्याच युरोपीय खेळाडूंना झेंपण्यासारखें नसल्यानें या सामन्यांना फक्त आठ राष्ट्रांचे क्रीडापटू उपस्थित होते. सामने २९ ऑगस्टला सुरू होऊन ३ सप्टेंबरला समाप्त झाले. या वेळीं अमेरिकन खेळाडूंनीं बाविसांपैकीं एकवीस शर्यतींत पहिला क्रमांक मिळविला.

ऑलिंपिक सामने दर चार वर्षांनीं भरावे हा प्राचीन काळचा नियमच आधुनिक काळच्या सामन्यांतहि प्रमाण मानण्यांत आलेला होता. तेव्हां 'सेंट लुई 'नंतर १९०८पूर्वी खरें पाहतां सामने भरावयाचे नव्हते. तथापि ग्रीकांनीं आग्रह केल्यावरून आंतरराष्ट्रीय ऑलिंपिक–समितीनें १९०६ सालीं अथेन्स येथें सामने भरविण्यास अनुज्ञा दिली. पण त्यांना अधिकृत सामने मानण्यांत येत नाहीं. हे सामने २२ एप्रिलला सुरू झाले व त्यांत बारा राष्ट्रांनीं भाग घेतला. अमेरिकन खेळाडूंनीं एकोणीस स्पर्धांपैकीं अकरांत जय मिळवून आपलें श्रेष्ठत्व पुनः सिद्ध केलें.

१९०८चे सामने रोम येथें भरावयाचे होते; परंतु आपण हे सामने भरविण्यास असमर्थ आहों असें इटलीनें १९०६ सालीं कळविलें. वास्तविक सामन्यांच्या सर्वांगीण तयारीला दोन वर्षांचा अवधि पुरेसा नसून सुद्धां इंग्लंडनें ते भरविण्याची जबाबदारी पत्करली. लंडनमध्यें भरलेले हे सामने बऱ्याच कारणांकरतां लक्षांत राहण्याजोगे झाले. यापूर्वीच्या सामन्यांत खेळाडू वैयक्तिक रीत्या अथवा एकाद्या देशाच्या क्रीडामंडळातर्फे भाग घेत असत. या वेळेपासून देशोदेशींचे खेळाडू हे त्या त्या राष्ट्राचे अधिकृत क्रीडाप्रतिनिधी म्हणून हजर राहूं लागले. बावीस राष्ट्रांनीं आपले २००० खेळाडू लंडनला धाडले होते. सामन्यांची सुरुवात २२ जुलैला झाली. हवामान वाईट होतें व पाऊसहि फार पडला. अमेरिकन खेळाडूंनीं पंचावीसांपैकीं पंधरा सामन्यांत आपलें मानाचें पहिलें स्थान कायम राखलें. या सामन्यांत समरप्रसंग बरेच निर्माण झाले. सामन्यांतल्या वादग्रस्त प्रश्नांबाबत अखेरचा निर्णय देण्याचा अधिकार या वेळीं सामने भरविणाऱ्या राष्ट्रांतल्या ऑलिंपिक–समितीला असे. पण इंग्लंडच्या ऑलिंपिक–समितीनें विवाद्य प्रसंगीं दिलेल्या निर्णयाबद्दल आंतरराष्ट्रीय खेळाडूंत बराच असंतोष माजला. असा प्रसंग पुनः येऊं नये म्हणून त्या त्या खेळासाठीं आंतरराष्ट्रीय नियामक मंडळें नेमण्यांत आलीं व त्यांनीं आपापल्या खेळांपुरते निर्णय द्यावे असें ठरविण्यांत आलें; आणि आजहि हीच प्रथा चालू आहे. यापूर्वी मॅरेथॉन–शर्यतीचें अंतर पंचवीस मैल असे; पण या सामन्यांच्या वेळीं तें अंतर २६ मैल ३८५ यार्ड होतें व तेंच यापुढील मॅरेथॉन–शर्यतीसाठीं कायम करण्यांत आलें.

## सामन्यांना कलाप्रदर्शनाची जोड

इंग्लंडनंतर, स्वीडनच्या स्टॉकहोम या राजधानींत १९१२मध्यें भरलेले चौथे ऑलिंपिक सामने सर्व तऱ्हांनीं नमुनेदार झाले असें समजण्यांत येतें. या वेळेपासून ऑलिंपिक सामन्यांच्या जोडीला कला–प्रदर्शन व कलात्मक वस्तूंची चढाओढ सुरू करण्यांत आली; आणि पोहण्याच्या शर्यतींत स्त्रियांनीं प्रथमच भाग घेतला. जपानचे खेळाडूहि या वर्षापासूनच ऑलिंपिक सामन्यांत भाग घ्यावयाला येऊं लागले. शर्यत कोणीं जिंकली याचा वाद माजूं नये म्हणून शर्यत संपतेवेळीं फोटो घेण्यांत येऊं लागले. मॅरेथॉन–शर्यत एका दक्षिण आफ्रिकेंतल्या पोलीस शिपायानें जिंकली. ता. ६ जुलैला हे सामने सुरू झाले व त्यांत २६ राष्ट्रांचे खेळाडू उपस्थित होते. अठ्ठावीसांपैकीं अकरा शर्यतींत अमेरिकन खेळाडू यशस्वी झाले; पण फिन्लंडच्या खेळाडूंनीं प्रेक्षकांचें लक्ष विशेष वेधून घेतलें. ८०० मीटर धांवण्याची शर्यत एका अमेरिकन शाळकरी मुलानें १ मिनिट ५१.९ सेकंदांत जिंकून निर्माण केलेला जागतिक उच्चांक पुढें सोळा वर्षे अभेद्य राहिला.

१९१६चे सामने बर्लिनला व्हावयाचें ठरलें होतें. पण १९१४लाच पहिलें भीषण महायुद्ध सुरू झालें. युरोपांतल्या तरुणांना एकमेकांचा संहार करण्यासाठीं समरांगणावर धाडण्यांत येऊं लागलें नि साहजिकच क्रीडांगणावरील खेळीमेळीच्या शर्यतींत












भाग घ्यावयाची शुद्ध कोणालाच राहिली नाहीं ! खेळांच्या द्वारा आंतरराष्ट्रीय ऐक्य साधून जागतिक शांतता राखण्याचें बिचाऱ्या बॅरन् कौबर्टनचें सुखस्वप्न विरून गेलें !

पहिल्या महायुद्धांत बेल्जमचें अतिशय नुकसान झालें असतांहि त्या राष्ट्रानें १९२०चे ऑलिंपिक सामने अँटवर्प शहरीं भरविण्याची धडाडी दाखविली. ते १५ ऑगस्टला सुरू झाले व त्यांत २५ राष्ट्रांतल्या १५०० खेळाडूंनीं भाग घेतला. जर्मनी व ऑस्ट्रिया यांनीं महायुद्ध पेटविलें म्हणून त्यांना वगळण्यांत आलें. सामन्यांना प्रेक्षक कमीच असत व व्यवस्थाहि फारशी समाधानकारक नव्हती. पोहण्याच्या शर्यतींत भाग घेणाऱ्या एका बारा वर्षांच्या अमेरिकन मुलीपासून बाहत्तर वर्षांच्या स्वीडनमधल्या खेळाडूपर्यंत सर्व वयोमानांच्या खेळाडूंनीं त्यांत भाग घेतला होता. पंधरा नवीन जागतिक व ऑलिंपिक उच्चांक प्रस्थापित करण्यांत आले. कोलेमायनन् या फिन्लंडच्या खेळाडूनें भर पावसांत मॅरेथॉन–रेस जिंकली. अमेरिकन खेळाडूंना सत्तावीस वेळांपैकीं सातांमध्यें विजय मिळाला.

आठवे ऑलिंपिक सामने १५ जुलै १९२४-पासून पॅरिस येथें भरविण्यांत आले. ४५ राष्ट्रांनीं १४३० खेळाडू धाडून त्यांत भाग घेतला. तेविसांपैकीं तेरा स्पर्धांत अमेरिकेला पहिल्या प्रतीचें यश मिळालें; तरी नूर्मी या फिन्लंडमधल्या खेळाडूनें धांवण्याच्या एकीमागून एक तीन शर्यती जिंकून सर्वांना आश्चर्यचकित करून सोडलें.

## हिंदी हॉकी-संघाचें अजिंक्यपद.

१९२८ सालचे सामने हॉलंडमधील ॲमस्टरडॅम या शहरीं भरले होते. हिंदुस्थानच्या दृष्टीनें हें वर्ष संस्मरणीय आहे. कारण, या वेळीं हिंदी खेळाडूंनीं प्रथमच ऑलिंपिक सामन्यांत भाग घेतला. हिंदी हॉकी–संघानें या वेळीं जें अजिंक्यपद मिळविलें तें त्यानें आतांपर्यंत कायम राखलें आहे. सामन्यांना २८ जुलैला सुरुवात झाली. त्रेचाळीस राष्ट्रांच्या ४००० खेळाडूंनीं त्यांत भाग घेतला. 'हॉप्, स्टेप् अँड् जंप्' या शर्यतींत पहिला नंबर पटकावून ऑलिंपिक सामन्यांतला आपला पहिला विजय जपानी खेळाडूंनीं मिळविला. कॅनडामधल्या अवघ्या एकोणीस वर्षांच्या शाळकरी मुलानें १०० व २०० मीटर शर्यतींत पहिला क्रम पटकावून १९२८मधला जगांतला सर्वांत चपळ मनुष्य अशी ख्याति प्राप्त करून घेतली. नॉर्वेच्या राजपुत्रानें नौकांच्या शर्यतींत खेळाडू म्हणून भाग घेतला. बाविसांपैकीं आठ शर्यतींत अमेरिका विजयी झाली व पांचांत उच्चांक मिळवून १९२४प्रमाणेंच फिन्लंडनें आपली मानाची दुसरी जागा कायम राखली.

## अमेरिकेची उत्कृष्ट व्यवस्था

अमेरिकेनें कॅलिफोर्नियांतल्या लॉस अँजल्स या शहरीं १९३२ सालचे सामने मोठ्या भव्य प्रमाणांत भरविले. हवामानाची अनुकूलता, प्रेक्षकांची गर्दी, तिकीटविक्रीचें उत्पन्न (५,४८,३३४ डॉलर) आणि खेळाडूंचे क्रीडांगणावरील पराक्रम या चारी गोष्टींत या वेळच्या सामन्यांनीं एक नवाच उच्चांक गांठला. धनाढ्य अमेरिकेनें आपल्या अपार वैभवाला साजेशी खेळाडूंची व्यवस्था ठेवली. २५० एकरांच्या विशाल परिसरांत ५५० घरें बांधून खेळाडूंसाठीं सर्व सुखसोयींनीं सुसज्ज असें एक नवें गांवच तेथें तात्पुरतें वसविण्यांत आलें. सामन्यांना ३० जुलैला सुरुवात झाली तेव्हां ३९ राष्ट्रांचे २००० खेळाडू हजर होते. हिंदी हॉकी–टीम पुनः अजिंक्य राहिली. अमेरिकन नीग्रोंनींहि आपलें नांव गाजविलें. या सर्व सामन्यांत खेळीमेळीचें प्रसन्न वातावरण पसरलेलें होतें. याहि वेळीं तेविसांपैकीं अकरा स्पर्धा जिंकून अमेरिकेनें आपली पहिली जागा टिकवून धरली. अर्जेंटायनाच्या केवळ वीस वर्षें वयाच्या एका वृत्तपत्रविक्यानें मॅरेथॉन–शर्यत जिंकून दक्षिण अमेरिकेचें नांव गाजविलें.

लॉस् अँजल्सचे सामने इतक्या भव्य तऱ्हेनें भरविण्यांत आले होते कीं यापेक्षां दुसरें राष्ट्र झालें तरी अधिक काय करणार असेंच सर्वांना वाटलें होतें. पण १९३६त बर्लिनच्या अकराव्या ऑलिंपिक सामन्यांना उपस्थित असलेल्यांना असें वाटलें कीं आदर्श व्यवस्था ठेवण्यांत जर्मनांनीं अमेरिकनांवरहि मात केली ! या वेळीं हिटलर अधिकारारूढ झालेला होता. त्याच्या ज्यू–विरोधी धोरणाविषयीं व 'काळ्या आदमीं' विषयक तुच्छतेच्या भावनेमुळें सर्व राष्ट्रांत असंतोष माजला होता. या सामन्यांत भाग








घेणाऱ्या अमेरिकन खेळाडूंत नेहमींप्रमाणेंच ज्यूंचा आणि नीग्रोंचा भरणा होताच. पण सामन्यांत यशस्वी झालेल्या ज्यू व नीग्रो खेळाडूंशीं हस्तांदोलन करून त्यांचें स्वतः अभिनंदन करण्याचें हिटलरनें टाळलें येवढी गोष्ट सोडली तर इतर कोणताच उपसर्ग कोठल्याहि खेळाडूंना झाला नाहीं. या सामन्यांना त्रेपन्न राष्ट्रांचे ५००० खेळाडू आलेले होते. त्यांची सुरुवात १ ऑगस्टला झाली. जर्मनांनींहि लॉस् ॲंजल्स येथल्याप्रमाणें बर्लिननजीक सर्व सुखसोयींनीं समृद्ध असें 'ऑलिंपिक'नगर खेळाडूंच्या निवासासाठीं वसविलें होतें. क्रीडांगणाच्या सभोंवतीं २,३७,००० प्रेक्षक नीटपणें बसूं शकतील असें भव्य प्रेक्षागार ( Stadium ) बांधण्यांत आलें होतें. सामन्याचीं ४५,००,००० तिकिटें खपून २८,००,००० डॉलर उत्पन्न झालें. यापूर्वी जर्मनांना ऑलिंपिक सामन्यांतल्या कोठल्याहि खेळांत उच्चांक मिळवितां आला नव्हता. हिटलरनें युवक-चळवळीवर भर दिलेला असल्यानें बलसंवर्धनाला जर्मनींत विशेष महत्त्व प्राप्त झालें होतें. तीन शर्यतींत पहिले येऊन जर्मन तरुणांनीं या सामन्यांत आपल्या राष्ट्राचें नांव गाजविलें. जेसी ओवेन्स या अमेरिकन नीग्रो खेळाडूनें एकट्यानें तीन शर्यतींत अजिंक्य पद मिळवून जर्मनांवरहि मात केली व 'काळे अदमी' गोऱ्या लोकांपेक्षां क्रीडाक्षेत्रांत तरी कमी नसून उलट कांकणभर सरसच आहेत असें ठणठणीतपणें सिद्ध करून दाखविलें. एका पीतवर्णीय जपानी खेळाडूनें मॅरेथॉन-शर्यत २ ता. २९ मि. १९·२ सेकंदांत जिंकून नवाच विक्रम निर्माण केला. हिंदी हॉकी-संघानेंहि १९२८मध्यें मिळविलेलें अजिंक्य पद कायम राखलें. बर्लिनच्या सामन्यांत पूर्वीचे बहुतेक जागतिक व ऑलिंपिक उच्चांक कोलमडून पडले व नवे प्रस्थापित झाले; पुरुषांच्या अडतीस सामन्यांपैकीं अठ्ठाविसांत नवे उच्चांक निर्माण झाले, तर स्त्रियांच्या पळण्याच्या, मैदानी खेळांच्या व पोहण्याच्या एकूण अकरा शर्यतींपैकीं दहांमध्यें नवे उच्चांक नमूद झाले.

बारावे ऑलिंपिक सामने जपानला १९४०त व्हावयाचे होते. पण तत्पूर्वींच जपान महायुद्धांत पडल्यानें, ते फिन्लंडची राजधानी हेल्सिंकी येथें भरवावे असें ठरविण्यांत आलें. पण फिन्लंडहि पुढें लवकरच रशियाच्या आक्रमणाला बळी पडल्यानें तें होऊंच शकले नाहींत. १९४४च्या सामन्यांच्या वेळीं तर जगड्व्याळ महायुद्ध चालू असल्यानें ते सामने भरण्याचा संभवच नष्ट झाला!

## सामन्यांचें ध्येय व त्यांचे सामान्य नियम

ऑलिंपिक सामन्यांचें ध्येयवाक्य त्वरा, उंची आणि बल ( Citius, Altius, Fortius ) हें आहे. सामन्यांत भाग घेणारांनीं खेळांच्या व शर्यतींच्या नियमांचें काटेकोरपणें पालन करून त्यांचा उच्च दर्जा कायम राखावा, सामने अधिकाधिक त्वरेनें खेळावे व त्यांत शरीरसामर्थ्य तसेंच मनोबल प्रकट करावें असा या ध्येयवाक्याचा खरा अर्थ आहे. क्वचित् प्रसंगीं निर्माण झालेला कडवटपणा वा समरप्रसंग सोडल्यास या सामन्यांचा इतिहास वरील ध्येय-वाक्याला साजेसाच आहे.

ऑलिंपिक सामने दर चार वर्षांनीं भरावयाचे असतात. त्यांत जगांतल्या कोणत्याहि राष्ट्रांतल्या फक्त हौशी ( amateur ) खेळाडूंनाच भाग घेतां येईल. कोणत्याहि कारणानें सामने भरले नाहींत तरी त्यांच्या क्रमांकांत किंवा चार वर्षांच्या अंतरांत बदल करतां येणार नाहीं. जपानमध्यें ( व नंतर हेलसिंकी येथें ) भरावयाचे १९४०चे सामने हे बारावे सामने होते. ते न भरले तरी १९४०च्या महायुद्धामुळें न झालेल्या सामन्यांना तेरावे सामने असें म्हणावयाचें; व यामुळेंच बर्लिनमधील १९३६-च्या अकराव्या सामन्यांनंतर बारा वर्षांनीं लंडनला नुकत्याच भरलेल्या सामन्यांचा 'चौदावे सामने' असा उल्लेख करण्यांत आला.

ऑलिंपिक सामन्यांत मैदानी शर्यती, पळण्याच्या व चालण्याच्या शर्यती, कसरतींचे खेळ, पोहण्याच्या, अश्वविद्येच्या व नौका चालविण्याच्या स्पर्धा, पंचविध स्पर्धा व कलाविषयांच्या चढाओढी यांचा समावेश अवश्य असतो. ऑलिंपिक सामन्यांचा ध्वज पांढऱ्या शुभ्र वस्त्राचा असून त्यावर पांच खंडांचीं निदर्शक अशीं एकमेकांत गुंतलेलीं निळ्या, पिंवळ्या, काळ्या, हिरव्या आणि लाल रंगांचीं पांच वर्तुळें असतात.










## ऑलिंपिक सामन्यांचें नियंत्रण-मंडळ

आंतरराष्ट्रीय ऑलिंपिक-सामने-समिति ही या सामन्यांचें नियंत्रण करणारी सर्वश्रेष्ठ संस्था आहे. स्वित्झर्लंडमधील लॉसेन ( Lausanne ) या शहरीं तिची कचेरी आहे. याशिवाय प्रत्येक राष्ट्रांत एक ऑलिंपिक-समिति असते. सामने कोणत्या राष्ट्रांत भरवि हें ठरविण्याचा अखेरचा अधिकार आंतर-राष्ट्रिय ऑ.सा समितीच्या हातीं असतो. सामने ज्या राष्ट्रांत भरावयाचे असतात तेथें त्या वेळेपुरती ऑ. सामने-संघटन-समिति (Organising Committee ) नेमण्यांत येते व सामन्यांच्या तपशिलाची सर्व व्यवस्था या समितीकडे असते.

## सामन्यांचें उद्घाटन व समारोप

ज्या राष्ट्रांत सामने व्हावयाचे असतात तेथल्या सर्वश्रेष्ठ अधिकारी ( राजा किंवा राष्ट्राध्यक्ष ) व्यक्ती-च्या हातून सामन्यांचें उद्घाटन होतें. याला फक्त दहाव्या ऑ. सामन्यांच्या वेळचा प्रसंग हा अपवाद होता. त्या वेळीं अमेरिकन संयुक्त संस्थानांचे अध्यक्ष श्रीयुत हूव्हर यांनीं सामन्यांना स्वतः हजर न राहतां उपराष्ट्राध्यक्षालाच लॉस अँजल्स येथें उद्घाटनासाठीं पाठविलें. सामन्यांचें उद्घाटन करणारी व्यक्ति आपल्या परिवारासह क्रीडांगणावर येऊन दाखल झाली कीं राष्ट्रगीत सुरू होतें व उद्घाटन करणाऱ्या व्यक्तिसमोरून सामन्यांत भाग घेणाऱ्या राष्ट्रांच्या खेळाडूंचें गटागटानें संचलन ( March Past ) सुरू होतें. सामन्यांची जन्मभूमि असलेल्या ग्रीसच्या खेळा-डूंना नेहमीं संचलनाच्या अग्रभागीं राहण्याचा मान देण्यांत येतो, तदनंतर इतर खेळाडू आपापल्या राष्ट्राच्या आद्याक्षरानुक्रमानें संचलनांत भाग घेतात व सर्वांच्या शेवटीं सामन्यांना निमंत्रण देणाऱ्या राष्ट्रांतले खेळाडू असतात. त्यानंतर, " आधुनिक काळांतल्या ...... येथील ......व्या ऑलिंपिक सामन्यांचें मी उद्घाटन करतों " या शब्दांनीं साम-न्यांचें उद्घाटन करण्यांत येतें व तुताऱ्यांच्या नादांत शांततेचीं प्रतीकें म्हणून समजण्यांत येत असलेल्या शेंकडों कबुतरांना वर सोडण्यांत येतें. त्या नंतर **ऑलिंपिक-ज्योत** क्रीडांगणावर येऊन दाखल होते. ऑलिंपिया-गांवीं पूर्वीं ज्या जागीं देवराज झ्यूसचें मंदिर होतें तेथें सूर्यकिरणांच्या साह्यानें दीप-ज्योति प्रज्वलित करण्यांत येते व तीवरून पेटविलेला पोत हजारों नवयुवक, एक दमला कीं दुसरा अशा क्रमानें पळत पळत, ज्या राष्ट्रांत सामने भरावयाचे असतात त्या राष्ट्रांतल्या ऑ.-क्रीडांगणावर आण-तात. त्या पोतानें एका मुद्दाम तयार केलेल्या चबुतऱ्यावर एक ज्योति पेटविण्यांत येते व सामने संपेपर्यंत ती प्रज्वलित राहील अशी दक्षता घेण्यांत येते. ज्योति घेऊन दौडत येणारे तरुण बोटींत असले तरी धांवतच राहतात हें विशेष होय. १९३६च्या सामन्यांत जर्मनीनें ही प्रथा प्रथम सुरू केली व लंडनच्या या वर्षीच्या सामन्यांतहि ती पाळण्यांत आली. ज्योत प्रज्वलित केल्यावर ऑलिंपिक-गीत गाइलें जातें व त्याच वेळीं ऑलिंपिक-ध्वज उभार-ण्यांत येतो. नंतर सामन्यांना आशीर्वाद देणारें धर्म-गुरूचें भाषण होतें. सर्व खेळाडूंच्या वतीनें एक खेळाडू अशी प्रतिज्ञा घोषित करतो कीं ' आम्ही ऑलिंपिक सामन्यांतल्या स्पर्धांत भाग घेत असतां प्रामाणिकपणा व सचोटी राखूं, खेळांचे सर्व नियम पाळूं व खऱ्या खेळाडू वृत्तीनें आपापल्या राष्ट्रांच्या मानासाठीं व खेळांच्या गौरवासाठीं या सामन्यांत भाग घेऊं. " पुनः राष्ट्रगीत झाल्यानंतर हा उद्घाटन-समारंभ पुरा होतो.

सामन्यांच्या वेळीं व्हावयाच्या सर्व शर्यती व खेळ संपल्यावर आंतरराष्ट्रीय ऑ.सा.समितीचे अध्यक्ष सामने भरविणाऱ्या राष्ट्रांतल्या ऑलिंपिक-समितीचे व त्या राष्ट्राचे आभार मानतात व जम-लेल्या खेळाडूंना पुढील सामन्यांसाठीं अमुक ठिकाणीं या असें निमंत्रण देतात. तुताऱ्यांच्या निनादांत ऑ.-ध्वज उतरविण्यांत येऊन ज्या शहरीं सामने भरलेले असतात तेथल्या नगराध्यक्षांच्या हातीं तो ध्वज पुढील चार वर्षें सांभाळण्यासाठीं देण्यांत येतो आणि ऑलिंपिक-ज्योतीला निरोप देण्यांत येतो.

## चौदावे ऑलिंपिक सामने

चौदावे ऑलिंपिक सामने ता. २९ जुलै ते १४ ऑगस्टपर्यंत इंग्लंड येथें भरले होते. लंडनच्या वाय-व्येला असलेल्या वेंब्ले या उपनगरांत १९२४ सालीं साम्राज्य-कलाप्रदर्शन भरलें होतें. त्या निमित्तानें










तेथें एक लक्ष लोक बसूं शकतील एवढें फार भव्य असें क्रीडाभवन (Stadium) बांधण्यांत आलें होतें. तेथेंच या वर्षीचें ऑलिंपिक सामने झाले. निमंत्रण धाडण्यांत आलेल्या ६२ पैकीं ५३ राष्ट्रांनीं आपले ६००० खेळाडू धाडून या जागतिक क्रीडास्पर्धेंत भाग घेतला. दुसरें महायुद्ध पेटविण्याचा गुन्हा केल्याचा दोषारोप जर्मनी व जपान यांच्यावर करण्यांत येत असल्यानें त्यांना मुळीं बोलावण्यांतच आलें नव्हतें. रशियानें नियमाप्रमाणें राष्ट्रीय ऑलिंपिक सामने–समिति स्थापन केलेली नसल्यानें त्यालाहि निमंत्रण गेलें नाहीं. मैदानी खेळ व पळण्याच्या शर्यती (athletics), 'बास्केट बॉल', मुष्टियुद्ध, दुचाकीची स्पर्धा (cycling), 'हॉकी', पदकंदुक (foot-ball), पोहणें, वजन उचलणें व कुस्ती अशा एकूण नऊ स्पर्धांत भाग घेण्यासाठीं आपल्या हिंदुस्थाननें सुमारें ७५ खेळाडू धाडले होते. पाकिस्ताननेंहि खेळाडू पाठवून सहा स्पर्धांत भाग घेतला. इतर देशांप्रमाणें इंग्लंडचीहि युद्धोत्तरकालीन परिस्थिति बिकटच आहे. तथापि इंग्लंडनें आलेल्या देशोदेशींच्या क्रीडापटूंची शक्य तों नीट व्यवस्था ठेवली. २९ जुलैला मोठ्या समारंभानें राजे सहावे जॉर्ज यांच्या हस्तें सामन्यांना सुरुवात झाली. जागतिक क्रीडाक्षेत्रांत स्वतंत्र भारताचा धर्मचक्रांकित तिरंगी ध्वज मानानें प्रथमच फडकला.

१९३६ सालीं बर्लिनच्या ऑ. सामन्यांपेक्षां जास्त प्रेक्षक या सामन्यांना उपस्थित होते, व तिकिटविक्रीचें उत्पन्न ५,००,००० पौंड होऊन त्यानेंहि या बाबतींतला बर्लिनचा उच्चांक मोडला गेला असें सांगण्यांत येत आहे. भाग घेणाऱ्या ५३ राष्ट्रांपैकीं ३४ राष्ट्रांनीं कमीअधिक प्रमाणांत यश मिळविलें. सर्व राष्ट्रांतील हौशी खेळाडूंनीं एकत्र येऊन खेळीमेळीच्या वातावरणांत सर्व स्पर्धांतून भाग घ्यावा व त्यामुळें आंतरराष्ट्रीय स्नेहभाव व शांतता वाढीला लागावी हेंच ऑलिंपिक सामन्यांचें उद्दिष्ट आहे. म्हणून भाग घेणाऱ्या राष्ट्रांत सर्वश्रेष्ठ कोण हें अधिकृतरीत्या ठरविण्याची प्रथा या सामन्यांत मुद्दामच पाळण्यांत येत नाहीं. मात्र कोणत्याहि स्पर्धेंत पहिले तीन क्रमांक मिळविणाऱ्या खेळाडूंना अनुक्रमें सुवर्ण, रौप्य व ब्रॉंझ पदकें देण्यांत येतात; परंतु पहिल्या सहा खेळाडूंना क्रमानें सहा ते एक गुण देण्यांत येऊन, अनधिकृतपणें, कोणत्या राष्ट्राच्या खेळाडूंनीं एकंदरीनें किती गुण मिळविले याचा आढावा घेतला जातोच. या दृष्टीनें नेहमींप्रमाणेंच या वेळींहि (उत्तर) अमेरिकाच सर्वांच्या अग्रभागीं आहे. अमेरिकन क्रीडापटूंनीं ३८ सुवर्णपदकें, २७ रौप्यपदकें व २० ब्रॉंझ् पदकें पटकावून व इतर खेळांत ४ ते ६ क्रमांकाला येऊन एकूण ४८० गुण मिळविले. स्वीडन (१७ सु., १२ रौ., १७ ब्रॉं.; २६८ गुण), फ्रान्स (९, ७, १३; १७२) व ग्रेट ब्रिटन (३, १४, ६; १६४) यांनीं पुढील तीन क्रमांक मिळविले आहेत.

हिंदुस्थानचे खेळाडू इतर सामन्यांत चमकूं शकले नाहींत तरी त्यांनीं हॉकीच्या सामन्यांत ग्रेट ब्रिटनचा चार विरुद्ध शून्य 'गोल्स'नीं पराभव करून आपल्या देशाचें नांव राखलें. हवामान फारसें अनुकूल नव्हतें. मधून मधून झिमझिम पाऊस पडतच होता व क्रीडांगण तर नरमच होतें. असें असूनसुद्धां प्रतिकूल परिस्थितीवर मात करून हा विजय हिंदी खेळाडूंनीं मिळविलेला असल्यानें त्यांचें सर्वत्र कौतुक होत आहे. या एकाच खेळांत यश मिळून फक्त एकच सुवर्ण पदक मिळाल्यानें हिंदुस्थानचा यशस्वी राष्ट्रांच्या मालिकेंत ३० वा क्रमांक लागला तरी हॉकीच्या खेळांत १९२८ पासून हिंदुस्थाननें मिळविलेलें अजिंक्यपद या वर्षीच्या हॉकी संघानें कायम राखल्याबद्दल आपण त्यांना धन्यवाद दिले पाहिजेत. हॉकीच्या स्पर्धेंतल्या तिसऱ्या जागेकरतां झालेल्या खेळांत पाकिस्तानचा हॉलंडकडून पराभव झाला. पाकिस्तानचे खेळाडू इतर कोठेंच पहिल्या सहा यशस्वी खेळाडूंत येऊं शकले नाहींत.

आंतरराष्ट्रीय शांतता नांदावी या उदात्त हेतूनें १८९६ सालीं बॅरन कौबर्टिननें ऑलिंपिक सामन्यांचें पुनरुज्जीवन केलें खरें; पण तेव्हांपासून चौदाव्या ऑलिंपिक सामन्यांपर्यंत एकाहून एक भयंकर अशीं दोन जगड्व्याळ महायुद्धें होऊन त्याची आशा लयाला गेली! या विपरीत अनुभवावरून आंतरराष्ट्रीय खेळांमुळें आंतरराष्ट्रीय शांतता नांदेल असा कोण निर्वाळा देईल?








# मुंबई महाराष्ट्राचीच

श्री. य. कृ. सोवनी.

भाषावार प्रांतरचना करण्याचें तत्त्व कॉंग्रेसनें १९२१ सालींच मान्य केलें असून त्याप्रमाणें कॉंग्रेसच्या कारभारासाठीं भारताचे भाषावार प्रांतहि करण्यांत आले. कॉंग्रेसच्या हातांत राजकीय सत्ता आल्यानंतर जें तत्त्व कॉंग्रेसनें पूर्वींच मान्य केलें होतें तदनुसार भारताची प्रांतरचना भाषावार करण्याची मागणी जोरानें सुरू झाली. घटना–समितीनें यासंबंधीं विचार करण्यासाठीं एक उपसमिति नेमली व त्या समितीनें महाराष्ट्र, कर्नाटक, आंध्र व केरळ हे नवे भाषावार प्रांत निर्माण करण्यांत यावे अशी घटनासमितीला शिफारस केली. या शिफारशीनुसार घटनासमितीच्या अध्यक्षांनीं 'वरील भाषावार प्रांत निर्माण करण्याची कितपत शक्यता आहे ? ते आर्थिक दृष्ट्या स्वावलंबी होतील का ?' वगैरे प्रश्नांची चौकशी करून अहवाल सादर करण्यासाठीं एक कमिशन नेमलें आहे व त्यानें आपल्या कामास सुरुवात केली आहे. त्यांनीं एक प्रश्नपत्रिका प्रसिद्ध केली असून तींतील प्रश्नांना लोकांकडून उत्तरें मागविलीं आहेत व समक्ष हिंडूनहि ते चौकशी करणार आहेत.

## मुंबईसंबंधीं वाद कां उत्पन्न झाला ?

भाषावार प्रांतरचना करावयाची व मराठी-भाषिकांच्या प्रदेशाचा 'महाराष्ट्र' असा नवा प्रांत निर्माण करावयाचा असें ठरलें तर मुंबई शहराचें भवितव्य काय ? त्याचें स्थान महाराष्ट्रांतच कीं स्वतंत्र, या संबंधीं चर्चा सुरू होणें अपरिहार्य आहे. वास्तविक मुंबई शहर हें भौगोलिक दृष्ट्या महाराष्ट्राचाच एक भाग असल्यामुळें ही चर्चा होण्याची अगर हा प्रश्न उद्भवण्याची वस्तुतः कांहींच गरज नव्हती. परंतु कॉंग्रेसनें आपल्या व्यवहाराकरितां जी प्रांतरचना केली होती, तीमध्यें सर्व मराठीभाषी प्रदेशांचा एक प्रांत न बनवितां महाराष्ट्र, मुंबई, विदर्भ व मराठी मध्यप्रांत असे चार वेगवेगळे प्रांत बनविले होते. कॉंग्रेसला आपल्या संघटनेच्या अगर चळवळीच्या व्यवहारासाठीं एकाच भाषेचे हे चार प्रांत करण्यामुळें कांहींच अडचण निर्माण होण्यासारखी नव्हती. परंतु राजकीय व्यवहारासाठीं एकाच भाषेचे असे लहान लहान प्रांत ठेवणें केव्हांहि इष्ट होणार नाहीं; भाषावार प्रांतरचना करतांना, सर्व मराठी–भाषिकांचा एकत्र प्रांत होणें जरूर आहे. मध्यप्रांत–वऱ्हाडमधील मराठीभाषी–प्रदेश राजकीय दृष्ट्या मुंबई प्रांतांतील मराठी भाषिकांपासून अलग राहिल्यामुळें त्यांनाहि भाषावार प्रांतरचनेंत आपलें वेगळें अस्तित्व राहावें असें वाटत होतें. परंतु येवढ्या लहान प्रदेशाचा एक स्वतंत्र प्रांत होऊं शकणार नाहीं, आर्थिक दृष्टीनें प्रांतांचा विशिष्ट आकार असणें अवश्य आहे, हें पटल्यानंतर व विशिष्ट स्थानिक हितसंबंधांच्या दृष्टीनें घटनात्मक तरतूद होण्याची शक्यता दिसल्यानंतर त्यांनीं सर्व मराठीभाषिकांचा महाराष्ट्र असा एकच नवा प्रांत ( अगर राज्य ) व्हावा या मागणीस पाठिंबा दिला. पश्चिम महाराष्ट्र व महाविदर्भ यांचा मिळून नवा महाराष्ट्र बनावा ही गोष्ट आतां सर्वमान्य झाली आहे; प्रश्न फक्त मुंबई शहराचाच उरला आहे. मुंबई शहराचें भौगोलिक स्थान पश्चिम महाराष्ट्रांत असतांना कॉंग्रेसनें आपल्या व्यवहारासाठीं मुंबई शहराचा जो एक स्वतंत्र प्रांत बनविला, त्यामुळें तेथील रहिवाशांमध्यें—विशेषतः महाराष्ट्रीयेतर रहि-








वादांमध्यें—आपण महाराष्ट्रापासून वेगळे आहों ही जाणीव गेलीं पंचवीस–तीस वर्षें होत राहिली व आतां राजकीय प्रांतरचना करतांनाहि मुंबई शहर हा एक वेगळा प्रांत असावा असें त्यांना वाटूं लागलें. त्यांतच भाषावार प्रांतरचनेच्या प्रश्नाची चौकशी करण्यासाठीं नेमलेल्या दार–कमिशननें आपल्या प्रश्नावलींत "मुंबई शहराचा त्याचीं उपनगरें व बंदरें यांसह एक स्वतंत्र प्रांत करणें शक्य आहे का?" असा प्रश्नच विचारला असल्या- मुळें या मुंबईसंबंधींच्या वादास चांगलेंच तोंड पडलें. या वादाचें स्वरूप आतां निव्वळ तात्त्विक चर्चेचें न राहतां प्रत्यक्ष वस्तुस्थितीशीं त्याचा संबंध येत आहे; म्हणून या मुंबई शहराच्या प्रश्नाची येथें थोडीफार चर्चा करण्याचें योजिलें आहे

मुंबई शहर हें भौगोलिक दृष्ट्या महाराष्ट्राचाच एक भाग आहे याबद्दल फारसें दुमत असेल असें वाटत नाहीं. मुंबईचा जो थोडाफार पूर्वेतिहास पुढें देत आहें त्यावरूनहि मुंबई शहर महाराष्ट्राचाच एक भाग आहे ही गोष्ट स्पष्ट होत आहे.

## मुंबईचा प्राचीन इतिहास काय दाखवितो ?

समुद्र–किनारा व घाट यांमधील महाराष्ट्राच्या प्रदेशास कोंकण म्हटलें जातें या कोंकण प्रदेशासंबं- धींच्या परशुरामाच्या कालांतील कथा उपलब्ध आहेत. मनुष्यप्राणी प्रथम या मुंबई बेटावर अवतरला त्या वेळीं तें सात बेटांचा एक समूह होतें. प्राचीन इति- हासांत या सात बेटांना फारसें महत्त्व नव्हतें. 'अप- रान्ता'चा म्हणजे उत्तर कोंकणाचा तो एक भाग येवढेंच मानलें जात असे. महाभारत व पुराणें यांतून या समुद्रालगतच्या कोंकणपट्टीस 'अपरान्त' असें संबोधिलें आहे. या अपरान्तांतच मुंबईचा समावेश होत होता. अपरान्त म्हणजे उत्तर कोंकण व या अपरान्ताची राजधानी 'शूर्पारक' (सध्यांचें सोपारा) येथें होती. पांडवांनीं या शूर्पारकाला भेट दिल्याचें महाभारतांत वर्णन आहे. सध्यां परशुराम- क्षेत्र हें चिपळूणजवळ आहे; परंतु महाभारतकालीं शूर्पारक हें परशुराम क्षेत्र होतें. महाभारतकालीं आर्यांची 'अपरान्ता'मध्यें—उत्तर कोंकणांत—वस्ती होऊं लागली होती व पुढें राम व परशुराम यांच्या- नंतरच्या कालांत ते दक्षिणेकडे गेले असें यावरून दिसून येतें. शूर्पारक हें व्यापाराचें शहर होतें व इ. स.पू. चौथ्या शतकांत तेथून मेसापोटेमियाशीं व्यापार होत असे.

कोंकण हा शब्द महाभारत, विष्णुपुराण व हरि- वंश यांतून आढळून येतो. दक्षिणेकडील देशांचें वर्णन करतांना बृहत्संहितेंत कोंकणाचा उल्लेख आहे. उत्तरकालीन संस्कृत वाङ्मयांत नाशिक ते कन्या- कुमारीपर्यंतच्या किनाऱ्याच्या पट्टीस कोंकण असें संबोधिल्याचें दिसून येतें. त्याआधींच्या कालांत मात्र याच भागास 'अपरान्त' म्हणत. पुढें आंध्रभृत्यां- च्या शातवाहन कालापर्यंत या कोंकणासंबंधीं अगर अपरान्तासंबंधीं कांहीं माहिती आढळून येत नाहीं. अशोककालीन शिलालेखावरून अशोकाच्या साम्रा- ज्याचा अपरान्त हा एक भाग होता असें दिसून येतें.

मुंबईस मुंबई हें नांव कसें मिळालें ह्याबाबत निरनिराळ्या कथा सांगण्यांत येतात. त्यांपैकीं रूढ समजूत अशी कीं मुंबादेवी ही कोळ्यांची व या देवीचें देऊळ मध्यवर्ति बेटावर आहे म्हणून या सात बेटां- च्या समूहास मुंबई हें नांव मिळालें.

मौर्य घराण्यापैकीं चक्रवर्ती अशोकाचें (इ. स. पू. २७३–२३६) 'अपरान्ता'वर राज्य होतें. महावंश नामक बौद्ध ग्रंथांत मोग्गलीपुत्तानें पाटलि- पुत्राहून (पाटण्याहून) महारट्ठाकडे (महाराष्ट्राकडे), अपरांताकडे व वनवासीकडे बुद्धधर्म–प्रचारकांना पाठ- विलें असा उल्लेख आहे. सोपारा येथें सांपडलेल्या शिलालेखावरून अपरान्तावर मौर्यांचें राज्य होतें, असें दिसून येत आहे. नंतर शातवाहन आले, त्यांचें राज्य ३०० वर्षें टिकलें. इ. स.च्या तिसऱ्या शतकापर्यंत त्यांचें राज्य होतें. पुढें कोंकण, महाराष्ट्र व गुजराथ यांवर आभीरांनीं आपलें वर्चस्व प्रस्था- पित केलें. त्यांचा प्रस्थापक ईश्वरसेन होता. शात- वाहनांच्या कालांत व्यापार भरभराटीस आला होता व कल्याण ही मोठी बाजारपेठ होती. आभीरांच्या नंतर त्यांचेच मांडलिक असलेल्या त्रैकूटकांनीं गुज- रात, कोंकण, नाशिक यांवर आपलें स्वामित्व प्रस्था- पिलें. त्रैकूटकांनंतर मुंबईचें राज्य मौर्यांकडे गेलें. सध्यांचें 'मोरे' हें मराठ्यांचें आडनांव याच वंशां- तील आहे. या मौर्यांचा पाडाव सहाव्या शतकांत












# मुंबई महाराष्ट्राचीच

(चालुक्य) पुलकेशीनें केला. चालुक्यांच्या राज्याचे विशेष अवशेष राहिलेले नाहींत; फक्त चौळके हें कोळी जातींतील एक आडनांव तेवढें त्यांचा अवशेष राहिलेलें दिसतें. यानंतर शिलाहारांचें राज्य प्रथम उत्तर कोंकणांत व नंतर पुढें दक्षिण कोंकण व कराड–सातारा या भागांतहि झालें. नंतर तेराव्या शतकांत देवगिरीच्या महादेव राजानें शिलाहारांचा पाडाव करून कोंकणांत आपलें राज्य प्रस्थापिलें. शिलाहारांच्या कालांत कायस्थ व पाठारे प्रभू व यजुर्वेदी ब्राह्मण यांनीं मुंबई शहरांत वस्ती केली असें त्यांच्या शिलालेखांवरून दिसून येतें. अल्लाउद्दीन खिलजीनें केलेल्या यादवांच्या पराभवानंतर यादवांपैकीं भीमदेव अगर बिंबदेव यानें आपलें राज्य कोंकणांत पुनः प्रस्थापित केलें. यादवांचें राज्य म्हणजे मराठ्यांचें राज्य. या बिंबदेवानें माही–माहीम (मुंबई–माहीम) ही आपली राजधानी केली. बिंबाख्यान या नांवाचा एक मराठी ग्रंथ आहे, त्यांत या बिंबराजाची सर्व कथा आहे. माहीम बेटावर त्यानें वस्ती वसविली. त्यानें येतांना आपल्याबरोबर पैठणहून माध्यंदिन शाखेचे यजुर्वेदी ब्राह्मण, सूर्यवंशी, शेषवंशी, पांचाल, कुणबी, आगरी, दश लाड, विश लाड, लाड, मोड इत्यादि घराणीं मुंबईस आणलीं. बिंबदेवाच्या कारकीर्दीपासून अथवा त्यानें तेथें येतांना आपल्याबरोबर कांहीं घराणीं आणलीं त्या वेळेपासून मुंबईची वसाहत वाढूं लागली. माहीम त्यानेंच वसविलें. प्रभादेवी (परबादेवी)चें देऊळ त्यानेंच बांधलें. भीमदेव अगर बिंबदेव हाच मुंबई वसवणारा म्हटला पाहिजे; तो शके १२२५मध्यें वारला. त्याच्यानंतर त्याचा मुलगा प्रतापदेव राजा झाला. पण त्याच्या कारकीर्दींत विशेष कांहीं घडून आलें नाहीं.

मुंबई बेटावर सर्वांत जुनी वस्ती म्हणजे कोळी लोकांची. त्यांच्यानंतर निरनिराळे लोक आले व त्यांचीं राज्यें झालीं, तरी त्यांतूनहि ते कोळी लोक टिकून राहिले. या कोळी लोकांची मुंबईच्या सातहि बेटांवर वस्ती होती. मुंबईच्या बऱ्याच भागांच्या आजच्या कोलभाट, कोळीवाडी, मच्छगांव (माझगांव) इत्यादि नांवांवरून हें सिद्ध होत आहे. कोळी हे मूळचे द्रविडियन. पुढें हे कोळी आर्यांमध्यें मिसळले. नंतर आगरी लोकांनींहि या बेटावर वस्ती केली. पुढें मौर्य, चालुक्य, शातवाहन, शिलाहार, यादव यांचीं राज्यें झालीं. यादव राजा बिंबदेव याच्या कालांत पुष्कळ लोक आले व त्यांनीं मुंबईंत वस्ती केली. त्या वेळीं आलेल्या यजुर्वेदी ब्राह्मणांपैकींच आजचे पळशीकर. शेषवंशी म्हणजे भंडारी, सोमवंशी क्षत्रिय अगर पांचकळशी हे सर्व त्या वेळींच आलेले. बिंबाख्यानांत मुंबादेवीच्या देवळाचें वर्णन आहे. पूर्वी तें फणसी तलावाजवळ होतें; तेथून तें १७३७च्या सुमारास सध्यांच्या जागीं हलविलें गेलें. सदर देऊळ पांडुरंग शिवाजी नांवाच्या मराठी सोनारानें बांधलें आहे.

ह्या सर्व जुन्या इतिहासावरून काय दिसून येतें? ज्यांनीं तेथें पूर्वी वसाहत केली व आज तेथें त्यांचे जे वंशज आहेत, ते सर्व मराठीभाषिक आहेत. कोळी, आगरी, पळशीकर, पाठारे, कायस्थ, पांचकळशी, भंडारी, लाड, मोड, सोमवंशी इत्यादि सर्व जातींची मातृभाषा मराठीच आहे. कोंकण हा महाराष्ट्राचाच भाग. तेथें वसलेल्या लोकांची भाषाहि मराठीच. भौगोलिक दृष्ट्या आजहि मुंबईच्या उत्तरेस ८० मैल म्हणजे दमणपर्यंत मराठी–भाषिकांचाच प्रदेश आहे. ठाणें हा अपरान्ताचा (उत्तर कोंकणाचा) भाग आहे. दक्षिणेकडे तीन-चारशें मैल मराठीभाषिकांचा प्रदेश आहे. पूर्वेकडे तर नागपुर--भंडाऱ्यापर्यंत मराठी–भाषिकांचाच विस्तार आहे. मग वर दिलेला पूर्वेतिहास पाहून अशा प्रदेशांतील मुंबई शहराचें स्थान नैसर्गिक दृष्ट्या, भौगोलिक दृष्ट्या व ऐतिहासिक दृष्ट्याहि महाराष्ट्रांतच आहे हें कोणीहि मान्य करील.

चौदाव्या शतकांत मुंबईवर मुसलमानांचे हल्ले झाले. गुजरातमध्यें मुसलमानांचें राज्य दृढ झाल्यावरच मुंबईवर मुसलमानांचें स्वामित्व प्रस्थापित होऊं लागलें. परंतु त्यांना स्थानिक भंडारी लोकांनीं विरोध केल्यामुळें त्यांचें वर्चस्व दृढ होऊं शकलें नाहीं. तरी सुमारें दोनशें वर्षें मुंबईवर मुसलमानांचें वर्चस्व होतें; नंतर तें पोर्तुगीजांकडे गेलें. मुसलमानी काळांत राज्याचा सर्व अंतर्गत व्यवहार हिंदूंच्याच हातीं होता. मुसलमानी वर्चस्वाचे अवशेष म्हणजे कोंकणी मुसलमान ही जात. भाषा, संस्कृति, चाली-








रीती इत्यादि सर्व दृष्टींनीं हे कोंकणी मुसलमान कोंकणी हिंदूंना अगदीं जवळचे आहेत. खोजा, बोहरा, पठाण, सिद्दी, मोगल इत्यादि जे मुसलमान मुंबईंत आहेत ते सर्व ब्रिटिश अमदानींत आलेले आहेत.

## मुंबईचें संमिश्र लोकवस्तीचें स्वरूप

मुसलमानांनंतर सोळाव्या शतकांत मुंबईवर पोर्तुगीजांचें राज्य झालें. या कालांत पुष्कळ धर्मांतर होऊन खिस्ती लोकांची संख्या वाढली. हिंदी-खिस्ती लोकांचा मुंबईंत जो भरणा आहे तो या पोर्तुगीज अंमलाचाच परिणाम होय. कोळी लोकांचें मोठ्या प्रमाणावर धर्मांतर झालें. इंग्रजांकडे मुंबई बेट गेल्यावर त्यांची सत्ता दृढ करण्यास लागणारे नोकर (कारकून, सेक्रेटरी, ॲसिस्टंट वगैरे) बाटून खिश्चन झालेल्या या जमातींनेंच मुख्यतः पुरविले. अखेर मुंबई बेट व बंदर करारानें लग्नाचा हुंडा म्हणून पोर्तुगालच्या राजानें इंग्रजांना (दुसरा चार्लस याला) दिलें. बरेच दिवसांपासून व्यापारास अत्यंत सोईचें बंदर या दृष्टीनें मुंबईवर डच व इंग्रज या दोघांचाहि डोळा होता व एक दोन वेळां हल्ले करून त्यांनीं कांहीं काळ त्याचा ताबाहि घेतला होता. अखेर १६६१मध्यें तें करारानें इंग्लंडला मिळालें.

इंग्रजांच्या अमदानींत मुंबईची विलक्षण वाढ झाली! १६७१मध्यें गुजराथी बनिया व महाजन जाती यांच्याशीं करार करून व त्यांना कांहीं विशेष सवलती देऊन मुंबईंत व्यापारासाठीं वस्ती करण्यास परवानगी देण्यांत आली. यामुळें मुंबईची लोकसंख्या भराभर वाढूं लागली. सतराव्या व अठराव्या शतकांत मुंबईची लोकसंख्या सतत वाढत गेली. आपल्या शत्रूंच्या आपापसांतील भांडणांचा फायदा घेऊन ब्रिटिशांनीं आपलें राजकीय वर्चस्व दृढ केलें. त्याबरोबरच स्वतः शांत राहण्याच्या धोरणामुळें त्यांना आपल्या व्यापाराचीहि वाढ करतां आली. त्यासाठीं त्यांनीं गुजराथी, खोजा, कच्छी या व्यापारी जातींना मुंबईंत वस्ती करण्यास प्रोत्साहन दिलें. एकोणिसाव्या शतकांत ब्रिटनमध्यें जी औद्योगिक क्रांति झाली तिचा परिणाम मुंबईसारख्या व्यापारी केंद्रावर व बंदरावर खूप झाला. ब्रिटिशांचा तयार माल हिंदुस्थानांत खपविण्यासाठीं मुंबई बंदराचा उपयोग होऊं लागला. त्यामुळें मुंबईची वाढ झपाट्यानें होऊं लागली. वाफेचीं एंजिनें व लोहमार्ग सुरू होऊन मुंबई हें हिंदुस्थानांतील आयातनिर्यातीचें एक मोठें बंदर व औद्योगिक केंद्र बनलें. मुंबई शहराच्या भरभराटीमुळें शेजारच्या प्रांतांतील निरनिराळ्या जमाती तेथें येऊन राहूं लागल्या. ब्रिटिशांच्या बरोबर सुरतेहून पारशी आले; नंतर अठराव्या शतकाच्या अखेरीस गुजराथी बनिया व कपोल बनिया आले. १८०३च्या दुष्काळामुळें गुजराथेंतून जैन, खोजा, मेमन व बोहरा या जातींचे पुष्कळ लोक मुंबईंत आले. याच सुमारास काठियावाडमधून व कच्छमधून भाटिया लोक आले. दक्षिणेंतून कारकुनीसाठीं व इतर सरकारी नोकऱ्यांसाठीं ब्राह्मण येऊं लागले. नंतर मुंबईंत कारखाने वाढूं लागले व विशेषतः कापडाच्या गिरण्या वाढूं लागल्या. त्यामुळें दक्षिण महाराष्ट्रांतील मजूर व इतर कामगार यांचा तर मुंबईकडे लोंढाच लागला! महाराष्ट्रांतील दुष्काळामुळें पीडिलेल्या शेतकऱ्याला मुंबई हें भाकरी देणारें शहर झालें. गेल्या दोन महायुद्धांमुळें—विशेषतः दुसऱ्या महायुद्धामुळें मुंबईची लोकसंख्या दुप्पट झाली! महाराष्ट्राखेरीज इतर दूरच्या प्रांतांतूनहि मजूर मुंबईकडे येऊं लागले. यामुळें मुंबई शहराला बहुभाषी, बहुजातिक अशा एका संमिश्र लोकवस्तीचें (Cosmopolitan Society चें) स्वरूप आलें आहे.

## संघराज्याचा घटक एकात्मच पाहिजे.

मुंबई शहराचें हें संमिश्र लोकवस्तीचें स्वरूप कोणीहि अमान्य करणार नाहीं. परंतु कांहीं ऐतिहासिक कारणामुळें एकाद्या शहरास असें स्वरूप प्राप्त झालें, येवढ्याचसाठीं तें शहर भौगोलिक दृष्ट्या ज्या प्रदेशांत आहे त्यापासून तें वेगळें करण्याची गरज आहे असें बिलकुल नाहीं. एकाद्या प्रदेशापासून असें एकादें शहर राजकीय दृष्ट्या वेगळें करण्याची सूचना ज्या वेळीं पुढें येते त्या वेळीं अशी सूचना करणारांच्या हिंदी राज्यसत्तेचें स्वरूपच ध्यानांत येत नाहीं असें म्हटलें पाहिजे. हिंदी राज्यसत्ता हें एक संघराज्य आहे. आणि संघराज्याचा प्रत्येक घटक आपापल्या भागापुरता स्वायत्त असून त्यानें स्वखुषीनें कांहीं अधिकार










संघसत्तेकडे सोंपविलेले असतात. घटनासमितीनें आपल्या पहिल्या ठरावांतच ह्या गोष्टीवर जोर दिला आहे व घटकांकडे स्वायत्ततेचे पुष्कळ अधिकार राहतील असें स्पष्ट सांगितलें आहे. ज्या घटकाचा जो प्रदेश असेल त्या क्षेत्रमर्यादेंत त्यास संपूर्ण स्वायत्तता लाभेल व त्याच्याकडे राज्यकारभाराचे सर्व अधिकार राहतील. उर्वरित सत्ताहि त्याच्याकडेच राहील. ज्या बाबी त्यांनीं आपण होऊन खुषीनें संघराज्यसत्तेकडे सोंपविल्या आहेत त्यांखेरीज सर्व क्षेत्रांत घटकांचीच संपूर्ण सत्ता राहील. हिंदी राज्यघटनेचें हें संघस्वरूप जर आपण मान्य केलें तर प्रत्येक प्रांताचे अगर घटकाचे प्रदेश ठरवून दिल्यावर त्या प्रदेशांत ती घटकसत्ता सार्वभौम असली पाहिजे. त्या प्रदेशाचा एकादा तुकडा अगर हिस्सा वेगळा करणें म्हणजे या संघराज्यसत्तेच्या तत्त्वास हरताळ फासणें होय. प्रांताच्या अगर घटकाच्या सीमा एकदां ठरवून दिल्या म्हणजे मग त्या क्षेत्रांत पुनः कांहीं प्रदेशांची वांटणी करण्याचा हक्क त्या संघराज्यसत्तेस पोंचूं शकत नाहीं. हिंदी संघराज्यांत आज जे प्रांत अगर घटक आहेत ते आपापल्या क्षेत्रमर्यादेंत स्वायत्त आहेत व अशा स्वायत्त घटकांचें हें संघराज्य आहे. यांतील सध्यांचे घटक अगर प्रांत राजकीयदृष्ट्या पूर्णपणें एकजिनसी असल्यामुळें त्या त्या प्रदेशांतील लोकांचीं तीं तीं स्वायत्त राज्येंच आहेत असें म्हटलें पाहिजे. हिंदुस्थानांतील या घटक राज्यांची तुलना युरोपांतील निरानिराळ्या राष्ट्रांबरोबर होऊं शकेल येवढीं तीं मोठीं आहेत. हल्लीं असलेल्या दक्षिणेंतील कांहीं प्रांतांच्या बाबतींत मात्र ही राजकीय एकात्मता आढळून येत नाहीं; त्यामुळें या प्रांतांतील राज्यसत्ता जरी स्वायत्त असल्या तरी प्रांतांची घडण एकजिनसी नसल्यामुळें त्या स्वायत्ततेचा प्रांतांस उपभोग घेतां येत नाहीं. स्वाभाविकपणें ज्यांचें एक स्वतंत्र राज्य होऊं शकेल, ज्या राज्याबाबत लोकांमध्यें प्रेम व निष्ठा आढळून येतील, ज्या राज्याशीं लोक स्वयंस्फूर्तीनें सहकार्य करतील, अशांचेच हे घटक बनविण्यांत आले पाहिजेत. म्हणजे या घटकांत राजकीय एकात्मता असणें अत्यंत जरूर आहे. ही राजकीय एकात्मता हिंदुस्थानांतल्या दक्षिणेकडील घटकांत दिसून येत नाहीं. म्हणूनच घटक एकजिनसी करण्याच्या दृष्टीनें विद्यमान प्रांतांची पुनर्रचना करण्याची जरूरी आहे. त्या प्रदेशांत राहणाऱ्या लोकांची एक भाषा ही त्यांचा राजकीय एकजिनसीपणा ठरविण्याची प्रमुख कसोटी होईल. या कसोटीप्रमाणें त्या भाषेचा सलग असा जेवढा प्रदेश असेल त्या सर्व प्रदेशापुरतें त्या घटकाचें राज्य बनेल व स्वायत्ततेचे सर्व अधिकार त्याला मिळतील. घटनासमितीनें प्रत्येक राज्याचा असा प्रदेश या तत्त्वाप्रमाणें ठरवून देणें अवश्य आहे. आणि एकदां हा प्रदेश ठरला म्हणजे मग कोणत्याहि कारणानें संघराज्यसत्तेला एकादा तुकडा त्यांतून अलग करतां येणार नाहीं. त्या प्रदेशाची एकजीविता (integrity) बिघडतां उपयोगी नाहीं. ब्रिटिशांनीं केलेली प्रांतरचना तत्त्वशून्य होती हें एकदां मान्य केल्यानंतर राजकीय एकात्मतेच्या तत्त्वानुसार नवीन प्रांतरचना करणें हें स्वतंत्र भारताच्या सरकारचें पहिलें कर्तव्य ठरतें आणि तें कर्तव्य वरील तत्त्वानुसार प्रांतांची पुनर्रचना केल्यानेंच पार पडणार आहे.

## प्रदेशांच्या एकजीवपणाचें तत्त्व

या दृष्टीनें महाराष्ट्राच्या राज्याचा (स्टेटचा) प्रदेश ठरवावयाचा म्हटलें म्हणजे त्यांत मुंबई शहर येतें हें, वर जो मुंबईचा पूर्वेतिहास व तिची भौगोलिक रचना यांचें वर्णन केलें आहे, त्यावरून दिसून येईल. ब्रिटिशांच्या अमदानींत मुंबईची औद्योगिक वाढ होऊन ती एक मोठें बंदर झाली, तिची भरभराट झाली, हिंदुस्थानांतीलच काय पण जगांतील अनेक देशांचे व जातींचे लोक तेथें येऊन राहिले व त्यांनीं मुंबईच्या या वैभवास हातभार लावला, म्हणून तेवढ्यासाठीं कांहीं तें शहर ज्या प्रदेशांत आहे त्या प्रदेशापासून वेगळें काढणें न्यायाचें होणार नाहीं. जे लोक हें शहर वेगळें करावें म्हणतात ते त्यासाठीं कोणता जगांतील कायदा लावूं पाहतात तें कळत नाहीं. लोकसंख्येच्या दृष्टीनें पाहिलें तरी महाराष्ट्रीयांची लोकसंख्या तुलनेनें अजून कोणत्याहि इतर भाषिकांपेक्षां जास्त आहे. मुंबईची वाढ विशेषतः एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धापासून सुरू झाली. तेव्हांपासून तेथील मराठी भाषिकांचें शें. प्रमाण हळूहळू कमी होत गेलें. तरी १८८१ ते १९३१ या कालांतील शिरगणतीचे अहवाल पाहिले








असतां मराठी भाषिक शेंकडा ५१पेक्षां जास्तच असल्याचें दिसून येतें. १९४१ सालीं निरनिराळ्या भाषिकांची नोंद केलेली नाहीं. त्या वेळीं निरनिराळ्या भाषिकांच्या शिरगणतीचे अंदाजी नमुने (samples) दिले आहेत ते पाहिले तरी मराठी–भाषिक पन्नासपेक्षां अर्ध्या किंवा एक टक्क्यानें कमी असल्याचें आढळून येतें. शिवाय इतर कोठल्याहि एका भाषेच्या भाषिकांची संख्या शें. २१पेक्षां जास्त नाहीं. म्हणजे भाषेच्या दृष्टीनें जरी पाहिलें तरी मराठी भाषिकच बहुसंख्य आहेत. म्हणून या दृष्टीनें पाहिलें तरी मुंबई महाराष्ट्रापासून अलग होऊं शकत नाहीं. कारण, समजा, तेथें मराठी भाषिकांपेक्षां अन्यभाषिकांची संख्या वाढली, तरीहि मुंबई महाराष्ट्रापासून फुटूं शकत नाहीं. कारण, कोणत्याहि राज्याच्या प्रादेशिक एकजीवितेचें (Territorial integrity चें) तत्त्व एकदां मान्य केल्यानंतर त्यांतील एखादा भाग अन्यभाषिकांचा वा अन्यधर्मीयांचा आहे म्हणून वेगळा होऊं शकत नाहीं. तो वेगळा होऊं शकतो हा न्याय लागू करावयाचा म्हटलें तर बहुसंख्य मुसलमानवस्ती असलेलें मालेगांव पाकिस्तानांत घालावें लागेल. म्हणून, मालेगांवांत मुसलमानांची बहुसंख्या असूनहि त्यांना जसा स्वयंनिर्णयाचा हक्क मिळत नाहीं व पाकिस्तानांत जातां येत नाहीं, त्याचप्रमाणें मुंबई शहरांत इतर भाषिकांची बहुसंख्या झाली तरीहि त्यांना महाराष्ट्राच्या प्रदेशापासून फुटून निघतां यावयाचें नाहीं.

मुंबई ही महाराष्ट्राच्या प्रदेशाचा एक भाग असल्यामुळें ती वेगळी करण्याचा निर्णय लोकमत (Plebiscite) घेऊन ठरवितां येणार नाहीं. दोन भिन्नभाषी प्रदेशांच्या सरहद्दीवरील दोन्ही भाषा सारख्याच बोलल्या जात असलेल्या पट्ट्यांतच लोकमत घेण्याचा प्रश्न उद्भवतो. एका विवक्षितभाषिक प्रदेशाचा जो निर्विवादपणें भाग आहे, तो कोठें असावा याचा निर्णय लोकमताप्रमाणें करतां येणार नाहीं; प्रादेशिक एकजीवितेच्या तत्त्वास तें सोडून होईल. लोकमत घ्यावयाचेंच झाल्यास त्या प्रदेशांतील एखाद्या भागास त्याचा स्वतंत्र प्रांत होण्यासाठीं आवश्यक असणाऱ्या आकार, उत्पन्न वगैरे सर्व गोष्टी अनुकूल असतील तरच तेथील लोकमत घेऊन तें अनुकूल असल्यास तो भाग स्वतंत्र होऊन त्याचा एक प्रांत बनूं शकेल. ज्या एकभाषी प्रदेशांतून तो फुटून निघणार तो प्रदेश खूपच विस्ताराचा असला तरच त्यांतून दुसरा प्रांत निर्माण करण्याचा प्रश्न उद्भवतो.

मुंबई व महाराष्ट्र यांच्या बाबतींत अशी स्थिति बिलकुल नाहीं. आणि मतें घेतांना सुद्धां मुंबईचे जे स्थायी रहिवासी आहेत त्यांचेंच मत घेतलें पाहिजे.

या प्रादेशिक कारणांखेरीजहि आणखी अनेक दृष्टींनीं मुंबई हा महाराष्ट्राचा भाग आहे. महाराष्ट्राच्या उद्योगधंद्यांचें व व्यापाराचें मुंबई हें एक प्रमुख केंद्र आहे. महाराष्ट्रांतील सर्व लोहमार्ग व रस्ते मुंबई शहरांत केंद्रित झाले आहेत. मुंबई ही महाराष्ट्राची मोठी बाजारपेठ आहे. महाराष्ट्रांतील सर्व कच्चा माल तेथें जातो. तें महाराष्ट्राचें प्रमुख बंदर आहे. समुद्रकिनारा असणाऱ्या इतर प्रांतांना त्यांचीं त्यांचीं बंदरें आहेत. गुजरातला सोईस्कर असें बंदर मुंबई नसून भावनगर, ओखा, वेरावळ हीं आहेत व सौराष्ट्र ज्या वेळीं महागुजरातमध्यें विलीन होईल त्या वेळीं तीं गुजरातचीं बंदरें होतीलहि. कर्नाटकालाहि सोईचें बंदर भटकळ हेंच होणार आहे. तेव्हां महाराष्ट्राच्या बंदराच्या दृष्टीनें विचार केला तरी मुंबई हेंच महाराष्ट्राचें बंदर ठरतें व त्यामुळें तें महाराष्ट्रांतच राहणें अवश्य आहे. हिंदुस्थानांतील कांहीं प्रांतांना समुद्रकिनारा नसल्यामुळें बंदरें नाहींत व त्यामुळें त्या प्रांतांसाठीं होणारा आयात–निर्यात–व्यापार मुंबई बंदरांतून होणार; या दृष्टीनें तें हिंदुस्थानचें बंदर होत असलें तरी तें मुख्यतः महाराष्ट्राचेंच राहणार. कारण, या बंदराप्रमाणेंच इतर प्रांतांच्या बंदरांतूनहि हिंदुस्थानांतील किनारा नसलेल्या प्रांतांचा व्यापार होत राहीलच.

## मुंबईचाच वेगळा प्रांत काय म्हणून?

मुंबई हें एक मोठें बंदर आहे व उद्योगधंद्यांचें मोठें केंद्र आहे म्हणून त्याचा वेगळा प्रांत करावा असें सुचविण्यांत येतें; परंतु बंदरांच्या व्यवस्थेसंबंधींचें व परदेशांशीं होणाऱ्या आयात--निर्यात--व्यापाराचें सर्व नियंत्रण मध्यवर्ती संघसत्तेकडेच आहे. येवढेंच नव्हे तर खुद्द बंदराची जागाहि मध्यवर्ती सरकारच्याच मालकीची आहे. आयात-निर्यात–जकातींसंबंधींचे सर्व अधिकारहि मध्यवर्ती








सरकारकडेच आहेत. म्हणजे मध्यवर्ती सरकारला ज्यांवर नियंत्रण ठेवणें जरूर आहे त्या सर्व ठिकाणीं त्या सरकारचें नियंत्रण आहेच व संघराज्याच्या कायद्याअन्वयें पुढें केव्हांहि त्यांना हे अधिकार वाढवितां येण्यासारखेहि आहेत. असें असतां केवळ या कारणाकरितां मुंबईचा एक वेगळा प्रांत करण्याची अगर तें मध्यवर्ती सत्तेच्या अंमलाखालील एक शहर करण्याची कांहींहि गरज नाहीं. लंडन व लिव्हरपूल हीं मोठीं बंदरें आहेत व मुंबईपेक्षां कितो तरी पटींनीं मोठा व्यापार तेथून चालतो; पण म्हणून कांहीं त्यांचा वेगळा प्रांत करण्यांत आलेला नाहीं. मग केवळ बंदर आहे येवढ्याचसाठीं मुंबईचाच तेवढा वेगळा प्रांत करण्याची काय गरज? आणि हेंच तत्त्व लागू करावयाचें म्हटलें तर हिंदुस्थानांतील मद्रास, विजगापट्टण, कलकत्ता, ह्या सर्व शहरांचेहि वेगळे प्रांत करावे लागतील! संरक्षण हा विषयच मध्यवर्ती सरकारचा असल्यामुळें बंदरांच्या संरक्षणाची सर्व व्यवस्था त्या सरकारकडेच आहे. तेव्हां या सर्व बाबी मध्यवर्ती सरकारच्या अखत्यारांतील असतांना मुंबई शहराचा वेगळा प्रांत करण्यानें काय साधणार आहे? अशा रीतीनें त्याचा वेगळा प्रांत केल्यास ज्या प्रांतांत तें आहे त्या प्रांताच्या एकंदर औद्योगिक व व्यापारी जीवनावर मात्र अनिष्ट परिणाम होणार आहे. संघराज्य–सरकारची कोणतीहि योजना जर आपल्या घटकांचें सामर्थ्य कमी करणारी असेल तर त्यामुळें संघराज्य प्रबल न होतां दुर्बलच होईल.

मुंबई शहर महाराष्ट्राच्या केवळ उद्योगधंद्यांचें व व्यापाराचेंच केंद्र आहे असें नव्हे, तर तें महाराष्ट्राच्या संस्कृतीचेंहि केंद्र बनलें आहे. आज मुंबईतील मराठी नियतकालिकें, ग्रंथसंग्रहालयें, साहित्यसंस्था, यांचा व्याप किती तरी मोठा आहे व त्यांच्याशीं एकंदर महाराष्ट्राचें जीवनहि किती तरी निगडित आहे!

## मुंबई व महाराष्ट्र यांचें निगडित जीवन

मुंबईतील बहुसंख्य कामगार व बुद्धिजीवी मध्यम वर्ग यांचें जीवन महाराष्ट्राशीं इतकें निगडित आहे कीं जर मुंबई शहराचा वेगळा प्रांत करावयाचा असें म्हटलें तर महाराष्ट्रांतील कोंकणचे जिल्हे त्या प्रांतांत आपला समावेश करावा अशी तावडतोब मागणी करतील. कारण, त्यांचें जीवनच मुंबईशीं इतकें निगडित आहे. मजुरांचें निम्में घर मुंबईत तर निम्में देशावर, एक पाय मुंबईत तर एक पाय आपल्या जिल्ह्यांत, अशी त्यांची परिस्थिति आहे. मुंबईतील कामगारांना त्यांच्या देशावरील घरादारापासून तोडणें कठिण आहे. मुंबईतील निरनिराळ्या कारखान्यांत काम करणाऱ्या मजुरांची भाषावार नोंद उपलब्ध नाहीं. परंतु मुंबईतील प्रमुख धंदा जो कापडाच्या व सुताच्या गिरण्या, त्यांत काम करणाऱ्या मजुरांपैकीं शें. ७५ टक्के मजूर महाराष्ट्रीय आहेत. मुंबईतलि एकंदर मजूरसंख्येपैकीं निम्यापेक्षां अधिक मजूरसंख्या या गिरण्यांत आहे. इतर कारखान्यांत काम करणाऱ्या मजुरांतहि महाराष्ट्रीयांचें अंदाजें येवढेंच, किंबहुना कांहींत यापेक्षांहि जास्त प्रमाण आहे. गोदी–कामगार तर १०० टक्के महाराष्ट्रीय आहेत. मुंबईतील महाराष्ट्रीय कामगारांपैकीं अर्धेअधिक कामगार नेहमींचे कामगार नसून कांहीं दिवस देशावर शेती व कांहीं दिवस मुंबईत कामगारी अशी त्यांची स्थिति असते. ते मुंबईत काम करीत असले तरी त्यांची दृष्टि आपल्या देशावरील घराकडे व शेताकडेच असते. मजुरांनंतर मुंबईतील बुद्धिजीवी मध्यम वर्गाचीहि स्थिति अशीच आहे. त्याचेहि पाय महाराष्ट्रांत घट्ट रोंवलेले आहेत. कामगारांना अगर कारकुनांनीं आपल्या घरून सकाळीं गिरणींत अगर कचेरींत कामास जावें व संध्याकाळीं घरीं परत यावें, त्याप्रमाणें महाराष्ट्रांतील जिल्ह्यांतून मुंबईस कामधंद्यासाठीं जावें व तो संपल्यानंतर आपल्या गांवीं परत यावें, मुंबईस राहून आपल्या देशावरील कुटुंबीयांचें पालनपोषण करावें अशीच त्याचीहि परिस्थिति आहे. महाराष्ट्ररूपी घरांतून मुंबईरूपी कारखान्यांत काम करण्यास महाराष्ट्रीय मजूर व कारकून जात असतात. इतर प्रांतांतूनहि मजूर मुंबईस आले आहेत व अलीकडे त्यांची संख्या थोडी वाढलीहि आहे; परंतु त्यांचें जीवन मुंबई शहराशीं इतकें निगडित झालेलें नाहीं. हिंदुस्थानांतील निरनिराळ्या औद्योगिक केंद्रांत दूरच्या ठिकाणांहून अगर प्रांतांतून आलेला मजूर–वर्ग आहे. किंबहुना महाराष्ट्रीय मजूर देखील अहमदाबाद व








इंदूर यांसारख्या दूरच्या परप्रांतांतहि गेले आहेत. अशा थोडाफार परप्रांतीय मजूरवर्ग प्रत्येक शहरांत असणारच. परंतु येथें आपणांस जो विचार करावयाचा आहे तो बहुसंख्य वर्गाच्या दृष्टीनें. आणि मुंबईंतील हा बहुसंख्य मजूरवर्ग व बुद्धिजीवी मध्यमवर्ग महाराष्ट्राशीं इतका एकजीव आहे कीं मुंबई शहराचा वेगळा प्रांत करावयाचा असें आग्रहानें ठरविलें गेलें तर महाराष्ट्राचा अर्धा-अधिक भाग त्या 'मुंबई शहर' प्रांतांतच समाविष्ट करून घ्यावा अशी त्यांची मागणी होईल. म्हणजे महाराष्ट्र व मुंबई यांचें जीवन इतकें निगडित आहे कीं मुंबईनें महाराष्ट्रांतच राहिलें पाहिजे; तसें होत नसल्यास महाराष्ट्रालाच मुंबईंत सामील व्हावें लागेल.

## ' वेगळा प्रांत करा ' या म्हणण्यामागील स्वार्थ

हिंदुस्थानांतील सर्व मोठमोठ्या कारखान्यांच्या व उद्योगधंद्यांच्या शहरांचे स्वतंत्र प्रांत करण्यांत यावे अशीहि एक विचारसरणि आहे. पण ही विचारसरणि अज्ञान व स्वार्थ यांवर अधिष्ठित आहे असेंच दिसून येईल. शहरांचें मोठेपण आजूबाजूच्या प्रदेशावरहि बरेंचसें अवलंबून असतें. आजूबाजूच्या प्रदेशांतून तेथें कच्चा माल जाऊन त्याचा सर्व व्यापार तेथें केंद्रित होतो. आजूबाजूच्या प्रदेशांतील मजूरवर्ग व मध्यमवर्ग हेच तेथील कारखाने चालवितात. म्हणजे ज्या प्रदेशांत एकादें औद्योगिक शहर पुढें येतें, तेथें तेंच त्या प्रदेशाचा आत्मा बनतें. त्यानेंच तें वाढविलेलें असतें. अशा रीतीनें वाढल्यावर मात्र तें वेगळें करूं म्हणणें म्हणजे ज्या प्रदेशानें आपणास वाढविलें त्याच्याशीं बेइमान होणें आहे. दूरच्या कोठल्या तरी प्रांतांतून मजूर आणून उद्योगधंदे वाढविले अशी परिस्थिति मुंबईची नाहीं. ' अशा शहरांत काम करणाऱ्या निरनिराळ्या प्रांतांच्या मजुरांत निष्कारण हीं प्रांतीय भांडणें वाढतील व वर्गलढ्यावरून त्यांचें लक्ष भलत्याच ठिकाणीं जाईल; म्हणून कामगारांची एकजूट टिकविण्याच्या दृष्टीनें ह्या औद्योगिक शहरांचे स्वतंत्र प्रांत असावे ' असें कांहींच म्हणणें आहे. पण जे समाजवादी हें मत व्यक्त करतात ते नकळत भांडवलदारांचेंच कार्य साधीत आहेत हें मात्र त्यांच्या ध्यानीं येत नाहीं. प्रांतीयवाद हा मजुरांत नसतो. ज्या परप्रांतीय भांडवलदारांनीं अशा शहरांवर आपलें आर्थिक वर्चस्व बसविलें, त्यांनाच आपले आर्थिक हितसंबंधांचें रक्षण करण्याच्या दृष्टीनें त्या शहरांवर राजकीय वर्चस्वहि असावें असें वाटतें. मुंबई शहर स्वतंत्र असावें या मागणीमागील खरी प्रेरक शक्ति तीच आहे. ज्या अल्पसंख्य परप्रांतीय समाजानें आपल्या भांडवलाच्या जोरावर मुंबईंत आपली आर्थिक सत्ता प्रस्थापित केली आहे, त्यांना ती टिकविण्यासाठींच मुंबई शहराचा वेगळा प्रांत हवा आहे, व त्यासाठीं मुंबईची लोकवस्ती बहुभाषी आहे, मुंबई हें एक संमिश्र लोकवस्तीचें (Cosmopolitan) शहर आहे, अशीं निरनिराळीं कारणें ते देत आहेत. संमिश्र लोकवस्तीचे व इतर सर्व भाषिकांचे हितसंबंध रक्षण करण्याचे घटनात्मक मार्ग अनेक आहेत. कोठेंहि संमिश्र वस्ती झाली कीं, त्या भागाचा वेगळा प्रांत करा असें म्हटलें तर हिंदुस्थानांत अनवस्था-प्रसंग येईल. संमिश्र वस्तीच्या अगर संमिश्र भाषिकांच्या कारणामुळें आपल्या स्वाभाविक प्रांतांतून फुटून वेगळें होण्याच्या प्रवृत्तीपेक्षां आपल्या स्वाभाविक प्रांतांत राहूनच संमिश्र लोकवस्तीचे हितसंबंध रक्षण केल्यानें संघराज्याची शक्ति व संघटना वाढणार आहेत. औद्योगिक शहरांचे वेगळे स्वतंत्र प्रांत करण्याचें धोरण स्वीकारल्यास त्याप्रमाणें हिंदुस्थानांतील अहमदाबाद, कानपुर, कलकत्ता, मदुरा, मद्रास इत्यादि सर्वच शहरांना हें तत्त्व लागू करणें योग्य ठरेल; फक्त मुंबईच्या बाबतींतच तें लागू करतां येणार नाहीं.

## ' स्वतंत्र शहर ' करणें अव्यवहार्य

मुंबई हें स्वतंत्र शहर (Free City) करावें अशीहि कांहींची सूचना आहे; परंतु ' स्वतंत्र शहर ' ही गोष्ट आतां इतिहासजमा झाली आहे. तो एक मध्ययुगीन प्रकार होता. आजूबाजूच्या प्रदेशाला लुबाडून हीं सर्व " स्वतंत्र शहरी राज्यें " उभारलीं गेलीं होतीं. सध्यांच्या कालांत अशीं स्वतंत्र शहरी राज्यें निर्माण करण्याची कल्पनाहि कोणास सहन होणार नाहीं. मध्ययुगीन काळाकडे आपणांस परत जावयाचें असेल तरच आपणांस अशीं शहरी राज्यें स्थापणें शक्य आहे. युरोपांतील मध्ययुगीन शहरी










राज्याचे कांहीं अवशेष एकोणिसाव्या शतकांतच नष्ट झाले आहेत.

डॅझिग अगर ट्रीएस्ट याप्रमाणें मुंबई शहर स्वतंत्र करावें असें कांहींचें म्हणणें आहे. पण त्या दोन शहरांची परिस्थिति मुंबई-च्या स्थितीहून अगदीं वेगळी होती. हीं दोन बंदरें आंतरराष्ट्रीय सत्तेखालीं नांदत होतीं व डॅझिग हें जर्मन शहर असून बाजूचा मुलूख पोलिश होता. तसेंच ट्रीएस्टमध्यें इटॅलियन लोकांची प्रमुख वस्ती होती व बाजूचा प्रदेश स्लाव्ह लोकांचा होता. मुंबईची परिस्थिति तशी नाहीं. मुंबईत बहुसंख्य वस्ती मराठीच असून बाजूचा प्रदेशहि मराठीच आहे. म्हणून तीं उदाहरणें मुंबईच्या बाबतींत उप-योगीं पडणारीं नाहींत. शिवाय, या दोन शहरांचें भवितव्य काय झालें हेंहि सर्वांनीं पाहिलेंच आहे. यावरून हें दिसून येईल कीं स्वतंत्र शहराची कल्पना सद्यःकालांत अव्यवहार्य आहे.

## मुंबई संघराज्यसत्तेखालीं देणें अनिष्ट

मुंबई शहर संघराज्यसत्तेच्या अंमलाखालीं नांदणारें करावें अशी कांहींची सूचना आहे. परंतु प्रत्यक्ष संघराज्यसत्तेच्या अंमलाखालीं संघराज्याच्या राज-धानीचें शहर व संघराज्यांतील मागसलेली अशी एकादी अंदमान–निकोबारसारखी वसाहत येवढेंच असूं शकतें. संघराज्याच्या घटकांतील एकादा प्रदेश अगर एकादें शहर संघराज्यसत्तेकडे देणें म्हणजे संघराज्याच्या कल्पनेलाच हरताळ फांसणें होय. घट-कांच्या स्वायत्ततेवर तें अतिक्रमण आहे येवढेंच नव्हे, तर तें त्या घटकांची प्रादेशिक एकजीविता नाहींशी करण्यासारखें आहे. शिवाय जे लोक ही सूचना करतात त्यांच्या हें ध्यानांत येत नाहीं कीं संघराज्याच्या अंमलाखालीं नांदणाऱ्या प्रदेशामध्यें स्वायत्त घटकांतल्याइतकी लोकशाही नांदूं शकत नाहीं. स्थानिक स्वराज्याखेरीज इतर सर्व अधिकार संघराज्यसत्तेकडे असतात. त्या शहरांतील अगर प्रदेशांतील लोकमताला जबाबदार असण्याची कोण-तीहि जबाबदारी संघराज्यसत्तेवर नसते. मुंबई हें संघराज्यसत्तेच्या अंमलाखालील शहर जर हें करावें अशी मागणी करणाऱ्यांच्या लक्षांत येईल तर लोकशाही स्वातंत्र्याचे हक्क जेथें नाहींत अशा मध्यवर्ती संघराज्यसत्तेखालीं नांद-ण्यापेक्षां महाराष्ट्रासारख्या स्वायत्त घटकाचे एक हक्कदार नागरिक म्हणूनच राहणें ते पसंत करतील.

## मुंबईच्या वैभवाचें श्रेय कोणाला ?

मुंबई शहरांतील मराठी–भाषिकांची बहुसंख्य वस्ती कामगार व कारकून यांची आहे व मुंबईचें वैभव ज्या उद्योगपतींनीं व भांडवलदारांनीं वाढविलें त्यांची भाषा वेगळी आहे. ब्रिटिशांच्या अमदानींत त्यांच्या प्रोत्साहनानें व आश्रयानें मुंबई शहरांतील उद्योगधंद्यांची व व्यापाराची वाढ झाली व त्यामुळें त्यांची संख्याहि मुंबईत वाढली ही गोष्ट खरी आहे. परंतु मुंबईपुरतीच ही परिस्थिति नसून कलक-त्याचीहि स्थिति अशीच आहे. तेथील भांडवलदार व उद्योगपती हे बंगाली नसलेलेच आहेत व त्यांची तेथें बरीच लोकसंख्या आहे. ब्रह्मदेशांत रंगूनमध्यें तर अशी परिस्थिति होती कीं तेथें ब्रह्मी माणसाला कोणीच विचारीत नसे; तो भिकारी झाला होता. तेथें सर्व ब्रह्मी नसणाऱ्या उद्योगपतींचें व भांडवल-दारांचें वर्चस्व होतें. परंतु ब्रह्मदेशांतून रंगून वेगळें करावें अशी मागणी कोणींहि केली नाहीं. तसेंच कलकत्याची परिस्थितीहि मुंबईसारखीच असतांना कलकत्ता शहर पश्चिम बंगालपासून वेगळें करण्याची भाषाहि कोणी बोलत नाहीं. मग याच कारणासाठीं मुंबईबाबतच तेवढा अन्याय कां ?

मराठीखेरीज अन्य भाषा बोलणाऱ्या परप्रांती-यांनीं मुंबईची वाढ केली म्हणून ती महाराष्ट्रांत न ठेवतां वेगळी केली पाहिजे असेंहि म्हटलें जातें. यांत त्यांनीं वाढ केली म्हणजे काय केलें ? भांडवल जरी त्यांचें असलें तरी नैसर्गिक संपत्ति, मनु-ष्यबल इत्यादींच्या बाबतींत त्यांना महाराष्ट्रीयांचेंहि साहाय्य झालें आहे. महाराष्ट्राच्या भूमीचा, नैसर्गिक संपत्तीचा व मनुष्यबलाचा या वाढींत तितकाच हिस्सा आहे. ब्रिटिशांच्या अमदानींत ब्रिटिशांच्या व्यापारविषयक धोरणामुळें या देशी भांडवलदारांना व उद्योगपतींना महत्त्व आलें व ब्रिटिशांनीं हिंदुस्था-नच्या आर्थिक लुबाडणुकीस त्यांचें साहाय्य घेतलें; याचा परिणाम म्हणून मुंबईसारखीं शहरें भरभराटलीं. पण आपण एकाद्या प्रदेशाची भरभराट केली म्हणून तेथें आपलीच सत्ता राहावी हें तत्त्व आतां युरोपीय








भांडवलदारांनाहि पसंत नाहीं. मुंबईसारखीं अनेक शहरें त्यांनीं आग्नेय आशिया व चीन यांमध्यें पुढें आणलीं. परंतु तीं ज्या प्रदेशांत आहेत त्या प्रदेशांपासून तीं स्वतंत्र करण्याची मागणी त्यांनीं केली नाहीं. ज्यांच्यामुळें खरी वाढ झाली ते ब्रिटिश आतां निघून गेले. मग त्यांच्या आश्रयानें वाढलेल्या भांडवलदारांनीं मुंबईच्या वैभवाचें व वाढीचें श्रेय आपल्याकडे घेऊन तेथें आपली सत्ता प्रस्थापित करूं पाहणें हास्यास्पद ठरणार नाहीं काय ? समाजवादी लोकशाही हें भारतीय राज्यसत्तेचें ध्येय असून भारतांत समाजवादी लोकशाही लवकर प्रस्थापित व्हावी अशी आमच्या पुढाऱ्यांची इच्छा आहे. मग जेथें ही समाजवादी लोकशाहीची भाषा बोलली जाते, तेथें केवळ ह्या भांडवलदारी हितसंबंधांचें रक्षण करण्यासाठीं मुंबई शहर महाराष्ट्रापासून फोडून त्याचा वेगळा प्रांत करणें ही गोष्ट शक्य होणार नाहीं असा लोकांना विश्वास वाटणें जरूर आहे.

## एक घातुक तत्त्व

मराठीखेरीज अन्यभाषिकांची लोकसंख्या मुंबईंत जास्त आहे या कारणासाठीं मुंबईचा एक वेगळा प्रांत करावा असें ज्या वेळीं सुचविलें जातें, त्या वेळीं हें तत्त्व हिंदुस्थानांत लागू करण्याचें ठरविल्यास त्याचे किती घातुक परिणाम होतील याची त्यांना जाणीव नसते. व्यापाराच्या निमित्तानें वा नोकरीच्या निमित्तानें हिंदी संघराज्याच्या कोणत्याहि प्रांतांतील कोणीहि माणूस कोठेंहि जाऊन वस्ती करूं शकतो. कारण, त्याला हिंदी संघराज्याचें नागरिकत्व सर्व ठिकाणीं सारखेंच आहे. परंतु बाहेरून त्या प्रांतामध्यें येणाऱ्या अशा लोकांची संख्या तेथें वाढल्यावर लगेच त्या भागाचा स्वतंत्र प्रांत करावा अशी मागणी ते करूं लागल्यास त्याचे भयंकर परिणाम होतील ! हे लोक आपल्या प्रांतात येऊन राहतात व कांहीं काळानें जेथें त्यांची वस्ती जास्त असेल त्या भागाचा तुकडा तोडून मागतात असें दिसल्यास त्या प्रांतांतील लोक व कदाचित् त्या प्रांतांचीं सरकारेंहि परप्रांतीयांना आपल्या प्रांतांत येऊं देणार नाहींत. असें होणें संघराज्याच्या तत्त्वाला सोडून आहे. संघराज्याच्या सर्व घटकांमध्यें कोणीहि कोठेंहि जावें, राहावें, नोकरी करावी, व्यवहार करावा, अशी मोकळीक असली पाहिजे. पण या मोकळिकीचा परिणाम आपल्या प्रांताचे लचके तोडण्यांत होत आहे असें दिसल्यास प्रांतांप्रांतांतील व्यवहार व दळणवळण हीं तेढीचीं होतील. अनेक निर्वासितांची आज सर्व प्रांतांनीं आपल्यामध्यें सोय केली आहे. पण हे निर्वासित भाविष्य काळीं आपल्या प्रदेशाचा एक तुकडा बळकावणार आहेत असें दिसलें तर कोणीहि त्यांना थारा देणार नाहीं, अनवस्थाप्रसंग येईल व संघराज्याच्या मजबुतीस धोका निर्माण होईल. म्हणून मुंबई शहर या कारणाकरतां वेगळें करावें म्हणणाऱ्यांनीं या घातुक तत्त्वाचा वेळींच विचार करावा. आंतरप्रांतीय व्यवहार व संबंध यामुळें बिघडतील. म्हणून स्वार्थनिरपेक्ष दूरदृष्टीनें व संघ–राज्याच्या बळकटीच्याहि दृष्टीनें या प्रश्नाचा विचार केला पाहिजे.

## फुटीर वृत्ति वाढेल, कीं नाहींशी होईल ?

असा एक आक्षेप घेण्यांत येतो कीं भाषावार प्रांतरचनेमुळें प्रांतीयता वाढेल, फुटीर मनोवृत्ति बोकाळेल. परंतु मुंबई शहर महाराष्ट्रापासून अलग केल्यानेंच ही फुटीर मनोवृत्ति, तशीच प्रांतीयता वाढेल. प्रांतीयता वाढण्याचें कारण निरनिराळ्या भाषिकांचे प्रदेश एकत्र ठेवणें हें होय. अशा प्रांतांत राज्यकारभार कठिण होतो; कारण, त्या प्रदेशांतील निरनिराळे विभाग एकमेकांसंबंधीं साशंक असतात. म्हणून असे प्रदेश एकत्र न ठेवतां जर एकभाषिकांचे प्रांत बनविले तर ही प्रांतीयता खात्रीनें जाईल. संयुक्त प्रांत, बंगाल, बिहार इत्यादि एकभाषी प्रांत राहिल्यानें जर प्रांतीयता वाढत नाहीं, तर दक्षिणेंतील प्रांतांच्या बाबतींतच तेवढी ती कां वाढावी ? ज्या वेळीं एका भाषेच्या प्रदेशांत कांहीं अल्पसंख्य अगर बहुसंख्य अन्यभाषिक आपल्या आर्थिक सत्तेच्या जोरावर त्या प्रदेशाचा लचका तोडूं पाहतात, त्या वेळीं मात्र त्यांच्यामध्यें या प्रांतीयतेचा वास येतो. आपल्या भाषेचा जो नैसर्गिक प्रदेश आहे त्याचा एक राजकीय घटक ( प्रांत ) करून मागणें यांत खरोखरीं प्रांतीयता नसून, उलट वर सांगितल्याप्रमाणें मुंबईसारख्या ठिकाणीं जे अन्य-भाषिक त्या प्रांतांतून फुटून निघण्याची मागणी मांडतात त्यांच्य I










# मुंबई महाराष्ट्राचीच

ठिकाणींच ही प्रांतीयता व ही फुटीर वृत्ति दिसून येतात. त्यांनीं त्या प्रदेशांत तद्देशीय म्हणून आनंदानें राहावें, व्यापारधंदा करावा. त्यांचें सर्व हितसंबंध रक्षिले जातील; त्यांची भाषा, त्यांची संस्कृति, या सर्वांचें रक्षण होईल. संघराज्याच्या घटनेनुसार याची तरतूद केलीच आहे. पण ज्या प्रदेशांत आपण राहतों त्याच्याशीं प्रत्येकानें एकनिष्ठ असलेंच पाहिजे—मग आपली भाषा वा संस्कृति कोणतीहि असो ! भाषावार प्रांतविभागणीमुळें लोकसंख्येच्या अदलाबदलीचें जें भय वाटतें तें तद्भाषिक प्रांतांतील कांहीं अन्यभाषी अल्पसंख्याकांच्या साम्राज्यवादी व भांडवलदारी आकांक्षा तृप्त करण्याच्या दृष्टीनें जें धोरण सरकार स्वीकारतें त्यामुळेंच होय. अन्यथा ही भीति निर्माण होण्याचें कांहींच कारण नाहीं. उत्तर हिंदुस्थानांतील बहुतेक प्रांत एकभाषी आहेत, तेथें कोठेंहि अदलाबदल झाली नाहीं. सिंध, ओरिसा, बिहार हे भाषिक प्रांत वेगळे होतांनाहि ती झाली नाहीं. प्रत्येक प्रांतांत प्रांतीयेतर अन्यभाषिक हे नेहमींच असणार,नव्हे असलेच पाहिजेत. त्यांचें दळण वळण वाढलेंच पाहिजे. पूर्वी पेशव्यांच्या काळींहि पुण्यामध्यें अन्यप्रांतीयांची बरीच लोकसंख्या होती. येवढेंच नव्हे तर पुण्याचा नगरशेठहि गुजराती होता. आजहि महाराष्ट्रांत पुष्कळ अन्यप्रांतीय आपापले धंदे मोकळेपणानें करीत आहेत. हीच परिस्थिति भाषिक प्रांत झाले असतांनाहि कायम राहील. पण महाराष्ट्रापासून मुंबई वेगळी केली गेल्यास मात्र पुढें हे संबंध राहणें कठिण होईल.

## विकेन्द्रीकरणाच्या दृष्टीनें

मुंबईसारख्या शहरांचा आणखी एका दृष्टीनें विचार करणें जरूर आहे. या दृष्टीनें विचार केला असतां मुंबई शहराचा स्वतंत्र प्रांत करण्यापेक्षां मुंबई शहराचें महत्त्व कमी करून तेथील कारखाने व लोकसंख्या बाजूच्या प्रदेशांत फैलावणें जरूर आहे, असें आढळून येईल. ग्रेट–ब्रिटनमधील कारखान्यांत काम करणाऱ्यांची लोकसंख्या कशी विभागली गेली आहे याचा विचार करण्यासाठीं नेमलेल्या बार्लो–कमिशननें आपल्या अभिप्रायांत म्हटलें आहे कीं, एकाच शहरांत थोड्या जागेंत कामगारांची वस्ती वाढणें ह्यांत वेळ, शक्ति व साधनसंपत्ति या सर्वांचा अपव्यय आहे. म्हणून या शहरी कामगार–लोकसंख्येचें केंद्रीकरण होऊं न देतां ती शहराच्या परिसरांत पसरविली पाहिजे. या कमिशननें पुढें म्हटलें आहे कीं बृहत्–लंडनची लोकसंख्या १९३८ सालापेक्षां वाढूं देऊं नये; म्हणजे सध्यां जी वाढ झालेली आहे ती बाजूच्या प्रदेशांत पसरविली पाहिजे; यापुढें लंडनमध्यें नवीन कारखाना सुरू करूं देऊं नये; अत्यंत दाटीच्या भागांतून हलवून कारखाने दूर न्यावे; यामुळें लंडनमधील व त्याच्या भोंवतींच्या "होम कौंटी"-मधील लोकसंख्या वाढणार नाहीं, तर उलट कमीच होईल.या दृष्टीनें आपण मुंबई शहराचा विचार केला तर मुंबई शहरांत भयंकर गर्दी झाली असून तेथील कारखाने व लोकसंख्या बाजूच्या प्रदेशांत पसरविणें जरूर आहे असें वाटेल. आरोग्याच्या दृष्टीनें येवढी लोकसंख्या एकत्र राहणें चांगलें नव्हे. त्याचा पुढें उत्पादनावरहि परिणाम होतो. म्हणून यापुढें मुंबई शहर हें न वाढवितां तेथील उद्योगधंद्यांचें विकेंद्रीकरण करून ते बाजूच्या प्रदेशांत म्हणजे महाराष्ट्रांत पसरविणें जरूर आहे. मुंबईंत कारखाने, माणसें, सर्वांची खूपच दाटी झाली आहे. बृहन्मुंबईची योजना ही दाटी कमी करण्याच्या दृष्टीनें उपयुक्त आहे. परंतु शेजारचा महाराष्ट्राचा प्रदेश घेऊन व त्याची बृहन्मुंबई बनवून तो प्रांत महाराष्ट्रापासून वेगळा करण्यांत यावयाचा असल्यास त्यास साहजिकच महाराष्ट्राचा विरोध होईल. मुंबई शहर हें महाराष्ट्रापासून वेगळें कसें होऊं शकत नाहीं याचा हा दाखला आहे. मुंबईनें थोडे हातपाय पसरावयाचे म्हटलें कीं ते महाराष्ट्रांत येणारच. यावरून ज्यास थोडें इकडे तिकडे सरकण्यासहि भूमि नाहीं त्याचा स्वतंत्र प्रांत कां होऊं शकत नाहीं हें कळून येईल. येवढेंच नव्हे तर मुंबईच्या नित्याच्या गरजा—उ० जीवनाची पहिली गरज, पाणी—भागविण्यासाठींहि मुंबईस महाराष्ट्रावरच अवलंबून राहावें लागेल. मुंबईतील उद्योगधंद्यांस लागणारी सर्व वीज महाराष्ट्रांतूनच येते. अत्यंत तुटपुंजी भूमि व जीवनाला व उद्योगधंद्याला अत्यंत अवश्य असलेली साधनें जवळ नसतांना मुंबई शहराचा वेगळा प्रांत करूं म्हणणें धाडसाचेंच नव्हे तर हास्यास्पदहि आहे. मुंबई प्रांत वेगळा होणार म्हटल्यानंतर








बृहन्मुंबईच्या योजनेसाठीं महाराष्ट्र आपला मुलूख देणार नाहीं. म्हणून स्वतंत्र प्रांताची कल्पना सोडून देऊन बृहन्मुंबईतच नव्हे तर सगळ्या महाराष्ट्रांत, मुंबईंत एकत्रित झालेले कारखाने पसरविणें अवश्य आहे. त्यामुळें मुंबईची लोकसंख्या कमी होऊन आरोग्य सुधारेल व राहावयास जागा मिळतील. म्हणून यापुढें विकेंद्रीकरणाचें धोरण स्वीकारून मुंबई शहरांत सर्व उद्योगधंदे केंद्रित न करतां ते महाराष्ट्रांत पसरविणें जरूर आहे व त्यास महाराष्ट्रांत अनुकूलताहि आहे. प्रांतांतलि एकच शहर भरभराटलेलें असलें तर साहाजिकच सर्व भांडवल व मजूर तिकडे धांवतात व पुनः तेथेंच सर्व केंद्रीकरण होतें. म्हणून असें एकच शहर लोकांच्या दृष्टीसमोर न राहतां अनेक शहरें राहिलीं पाहिजेत व तीं प्रांतांत सर्व ठिकाणीं सारखीं विखुरलेलीं असलीं पाहिजेत. त्यामुळें शहरें व खेडीं यांमध्यें जें जमीन–अस्मानाचें अंतर आज आहे तें नाहींसें होईल व त्या प्रदेशांतील सर्व साधनसंपत्तीचा योग्य उपयोग होऊन सर्व प्रदेशाची सारखी भरभराट होईल. अशा रीतीनें उद्योगधंद्यांचें विकेंद्रीकरण होणें हेंच एकंदरींत हिंदुस्थानच्या हिताचें आहे असें सरकारचें मत असल्यास त्यानें मुंबईसारख्या शहरांचे वेगळे प्रांत होऊं देतां कामा नये. हीं शहरें वेगळीं केल्यास विकेंद्रीकरणाच्या मार्गांत एक मोठीच अडचण निर्माण होईल. शहर व बाजूचा प्रदेश ह्यांचे हितसंबंध तेढीचे होतील. शहरांतील संपत्तीचा फायदा बाजूच्या दरिद्री मुलखास बिलकुल मिळणार नाहीं. येवढेंच नव्हे तर, शहरी सरकारें असे कांहीं अप्रत्यक्ष कर बसवितील कीं त्यांचा परिणाम खेड्यांचें दारिद्र्य तर उलट शहरांचें मात्र ऐश्वर्य वाढण्यांत होईल व ही विषमता हिंदुस्थानच्या सर्वांगीण उत्कर्षास अत्यंत हानिकारक ठरेल.

### अन्यभाषीय अल्पसंख्याकांची शंकानिवृत्ति

आतां मुंबई शहर महाराष्ट्रांत राहिल्यानें तेथील अल्पसंख्यांकाच्या मनांत कांहीं रास्त शंका निर्माण होतात त्यांचें निराकरण करणें जरूर आहे. भाषिक अल्पसंख्याकांच्या भाषेची जोपासना केली जाईल. जेथें हे भाषिक २० टक्के किंवा त्यापेक्षां अधिक पण अल्पसंख्य असतील तेथें त्यांच्या प्राथमिक शिक्षणाच्या शाळा सरकारी खर्चानें चालविल्या जातील. अर्थात् ब्रिटिश अमदानींत इंग्रजीस जें महत्त्व होतें तें यापुढें तीस मुंबईंत राहणार नाहीं. त्यामुळें नोकरीच्या निमित्तानें आलेल्या बऱ्याच परप्रांतीयांची थोडी अडचण होईल हें खरें. परंतु ते हळूहळू प्रांतीय भाषा शिकल्यास त्यांनाहि पूर्वीप्रमाणें नोकऱ्या मिळतील. मुंबई महाराष्ट्रांत राहिल्यानें आज तिला जो राजकीय व आर्थिक दर्जा अगर जें स्थान आहे त्यांत कांहींहि कमी होणार नाहीं. स्थानिक कारभार आज कॉर्पोरेशनच्या हातांत आहे तो तसाच राहील; येवढेंच नव्हे तर, मुंबईची विशिष्ट परिस्थिति, बहुभाषिक लोकसंख्या, औद्योगिक केंद्र वगैरे गोष्टी लक्षांत घेऊन मुंबई--कॉर्पोरेशनला स्वायत्ततेचे कांहीं राजकीय हक्कहि दिले जाण्याचा संभव आहे. मुंबईची लोकवस्ती मिश्र ( Cosmopolitan ) आहे ही गोष्ट लक्षांत घेऊन तेथील सर्वांच्या न्याय्य हितसंबंधांचें व हक्कांचें कायदेशीर रीत्या रक्षण केलें जाईल. ज्या भाषिक अल्पसंख्यांची लोकवस्ती मुंबईंत जास्त आहे त्यांची भाषाहि मुख्य मराठीबरोबर स्थानिक राज्यकारभारांत वापरली जाईल; अशा रीतीनें मुंबईंतील मराठीखेरीज अन्यभाषीय अल्पसंख्याकांच्या मनांतील शंका दूर झाल्यास ते मुंबईंत आपले सर्व न्याय्य हितसंबंध व हक्क सुरक्षित आहेत असें समजतील व मुंबई शहराचा वेगळा प्रांत करण्याची मागणी करणार नाहींत. मुंबईंतील मराठीभाषिकांनीं त्यांची याबद्दल खात्री पटवून देऊन त्यांचा विश्वास संपादन करणें अवश्य आहे. असें झाल्यास महाराष्ट्रापासून मुंबई वेगळी करावयाचें म्हटलें तरी शक्य नाहीं. कारण, ती महाराष्ट्राचा एक अविभाज्य भाग आहे.*

---

*[ प्रा. धनंजयराव गाडगीळ यांनीं ‘ मुंबईचें भवितव्य ’ या नांवाची एक पुस्तिका नुकतीच लिहिली आहे, ती लवकरच प्रसिद्ध होईल. या लेखांत ज्या मुद्द्यांची चर्चा करण्यांत आली आहे, त्यांपैकीं बऱ्याच मुद्द्यांची सविस्तर चर्चा वाचकांना त्या पुस्तिकेंत आढळून येईल.—लेखक. ]










स्फुट लेख—

# हिन्द–अमेरिका व्यापारी करार, १९४८.

प्रा. प. वि. पटवर्धन

गेल्या जुलै महिन्याच्या आठव्या तारखेपासून हिंद व अमेरिका या देशांतील आयात व निर्यात मालांवरील जकातींचा नवीन करार अंमलांत आलेला आहे. गेल्या वर्षी जिनीव्हा येथें जी आंतरराष्ट्रीय परिषद् भरली होती त्या परिषदेनें केलेल्या शिफारशीनुसार हा करार झालेला असून त्याअन्वयें हिंद व अमेरिका यांनीं आपणांमध्यें मालाची आयात–निर्यात सवलतीच्या दरानें करावयाचें ठरविलें आहे.

आज अमेरिका (U. S. A.) जगाची व्यापारपेठ बनली आहे. पेट्रोल व तज्जन्य पदार्थ, निरनिराळ्या प्रकारची यंत्रसामग्री, रासायनिक द्रव्यें व औषधें, युद्धसाहित्य, विमानें, रेल्वेचीं एंजिनें—फार काय धान्य व इतर कच्चा माल—या व इतर आवश्यक गोष्टी आज ती जगांतील बहुतेक देशांना पुरवीत आहे. मात्र इतर देशांना तितक्याच प्रमाणांत अमेरिकेंत आपला माल खपवितां न आल्यामुळें दर वर्षी इतर देश अमेरिकेचे अधिकाधिक देणेकरी होत आहेत. आणि हें देणें डॉलर्समध्येंच भागवावयाचें असल्यानें सांप्रत सगळीकडे डॉलर्सचा तुटवडा पडूं लागला आहे. हिंदुस्थानलाहि अमेरिकेंत दिवसेंदिवस अधिकाधिक माल खरेदी करावयाचा असल्यानें अधिक डॉलर्स ज्या कोणत्याहि मार्गांनीं मिळतील ते मार्ग अवलंबिणें आवश्यक आहे. आणि डॉलर्स मिळविण्याचा मुख्य मार्ग म्हणजे आपल्या मालाचा खप अमेरिकेंत जास्त वाढविणें. अशा व्यापारी करारांचा मुख्य उद्देश परस्परांतील व्यापार अधिक वाढविणें हाच असतो आणि म्हणूनच सांप्रतच्या डॉलर्सच्या हलाखीच्या काळांत अशा करारांना विशेष महत्त्व आहे.

इंग्लंडशीं स्टर्लिंग–ठेवींसंबंधीं नुकत्याच झालेल्या कराराअन्वयें चालू सालीं त्या ठेवींतून सुमारें वीस कोटी डॉलर्स आपणांस मिळतील आणि आंतरराष्ट्रीय द्रव्य–निधींतूनहि थोडेफार डॉलर्स मिळण्याचा संभव आहे. (नुकतीच हिंदनें सदर निधीकडे आणखी नव्वद लाख डॉलर्सची मागणी केली आहे.) ना. षण्मुखम् चेट्टी यांच्या मतें हा डॉलर्सचा पुरवठा आपल्या चालू सालच्या अमेरिकेंतील गरजा भागविण्यापुरता आहे. हा अंदाज १९४६–४७ सालीं जी सुमारें तेवीस कोटी डॉलर्स किंमतीच्या मालाची आयात हिंदुस्थानांत अमेरिकेंतून झाली तिच्यावरच आधारलेला असावा. गेल्या वर्षी जागतिक अशांतता, हिंदुस्थानांतील अंतर्गत अनिश्चित परिस्थिति व तत्कालीन अर्थमंत्री मि. लियाकत अलीखान यांनीं आपल्या अंदाजपत्रकांत स्वीकारलेलें अति पुरोगामी धोरण यांमुळें कारखानदारवर्गांत मोठ्या प्रमाणावर असंतोष पसरला व आयात होण्यास परिस्थिति फारशी अनुकूल राहिली नाहीं. परन्तु आतां अन्तर्गत परिस्थिति सुधारली आहे व नव्या सरकारी औद्योगिक धोरणामुळें कारखानदारवर्गाच्या मनांतील अविश्वास कमी झालेला आहे. (याचा प्रत्यय म्हणजे गेल्या तीन महिन्यांमध्यें उत्पादनांत थोडी प्रगति झाली आहे.) तेव्हां चालू वर्षी आपली अमेरिकेच्या मालाची मागणी अधिक वाढण्याचा








संभव आहे; म्हणून ज्यायोगें अधिक डॉलर्स मिळ-वितां येतील ते उपाय योजणें अत्यावश्यकच आहे.

आजपर्यंत राजकीय कारणांमुळें असो किंवा आमच्या कारखानदारांच्या निष्काळजीपणामुळें असो, हिंद-अमेरिकेंतील व्यापार वाढविण्याचे पद्धतशीर प्रयत्न झालेच नाहींत. ओटावा-करारामुळें अस्तित्वांत आलेल्या साम्राज्यान्तर्गत व्यापारी सवलतींच्या ( Imperial Preferenceच्या ) बंधनांत हिंदुस्थान अडकला गेल्यामुळें त्याच्याशीं उदार व्यापारी धोरण ठेवणें इतर देशांना शक्यच नव्हतें. अर्थात् चालू शतकाच्या पहिल्या चाळीस वर्षांत हिंद व अमेरिका यांमधील व्यापार अगदीं मामुली स्वरूपाचाच होता.

परन्तु दुसऱ्या महायुद्धामुळें, महायुद्ध चालू असतांना व महायुद्धोत्तर कालांत ही परिस्थिति पूर्णपणें पालटली आहे. जगाच्या राजकीय, आर्थिक व भौगोलिक परिस्थितींत आतां आमूलाग्र बदल झाले आहेत. आणि ह्या बदलत्या परिस्थितीचा फायदा हिंदुस्थानास मिळून आपलें व्यापारी धोरण स्वहितास अधिक पोषक असें बनवितां येणें शक्य झालें आहे. युद्धपूर्व कालांत इंग्लंड हाच हिंदुस्थानचा सर्वांत मोठा विक्रेता व हिंदी मालाचा खरेदीदार होता. परन्तु युद्धामुळें आर्थिक हलाखींत सांपडलेल्या इंग्लंडला हिंदुस्थानच्या वाढलेल्या गरजा पूर्वीइतक्या भागवितां येणें शक्य नाहीं व स्वतःवर आर्थिक बंधनें लादून घेतल्यामुळें ब्रिटनला हिंदी मालहि पूर्वीइतका पचविणें शक्य नाहीं. त्यामुळें आपणांला स्वहिताच्या दृष्टीनें इतर देशांशीं—विशेषतः अमेरिकेशीं व्यापारी संधान बांधणें इष्ट आहे. Imperial Preferenceचेंहि बुजगावणें आतां राहण्याचें कारण नाहीं. कारण, अमेरिकेंकडून जें प्रचंड कर्ज इंग्लंडनें मिळविलें आहे तें मिळवितांनाहि साम्राज्यांतर्गत व्यापारी कोंडी फोडण्याच्या तत्त्वाला ब्रिटननें संमति दिलेली आहे. शिवाय हिंद आतां स्वतंत्र राष्ट्र असल्यानें त्यालाहि आपल्याला हितकारक असे व्यापारी करार करतां येणें शक्य झालें आहे.

हिंदी परराष्ट्रीय व्यापारांत ब्रिटिश साम्राज्याचें पूर्वीचें वर्चस्व आतां कसें कमी होऊं लागलें आहे याचा पुरावा शेवटीं ( पृ. ७७ ) दिलेल्या कोष्टकांत दिसेल.

ह्या कोष्टकांवरून हें कळून येईल कीं हिंदुस्थानचा व्यापार साम्राज्याबाहेरील देशांशीं अधिकाधिक वाढत असून अमेरिकेशीं होणाऱ्या व्यापारांत तर गेल्या दहा वर्षांत खूपच वाढ झाली आहे. या अनुकूल परिस्थितीचा फायदा घेऊन, ज्यायोगें हा व्यापार अधिक वाढेल अशी योजना आंखणें आपल्या आर्थिक हिताच्या दृष्टीनें आवश्यकच होतें. म्हणून प्रस्तुतचा करार हें योग्य दिशेनेंच पडलेलें पाऊल आहे.

आतां या कराराचें स्वरूप थोडक्यांत पाहूं.

या कराराअन्वयें अमेरिकेला हिंदकडून आलेल्या मालावरील जकातींत सवलतीचे दर मिळाले असून हिंदनेंहि अमेरिकेंतून येणाऱ्या पुष्कळ पदार्थांवरील आयात-जकाती कमी केल्या आहेत. आपण प्रथम ( अ ) हिंदला मिळालेल्या सवलतींचा आणि नंतर ( ब ) अमेरिकेनें हिंदकडून मिळविलेल्या सवलतींचा विचार करूं.

( अ ) हिंदला मिळालेल्या सवलतींचे सोयीखातर दोन उपविभाग पाडतां येतील:—( १ ) अमेरिकेकडे पूर्वापार रिवाजानुसार निर्यात होणाऱ्या मालावरील जकातीचे सवलतीचे दर व ( २ ) नव्यानेंच निर्यात केल्या जाणाऱ्या मालावरील जकातीचे सवलतीचे दर.

( १ ) पहिल्या विभागांतील सवलतींमुळें निर्यात मालाच्या एकूण किंमतींत फारशी वाढ होण्यासारखी नाहीं. कारण, यांमध्यें हिंदुस्थानला ज्या वस्तूंच्या उत्पादनाचा जवळजवळ मक्ताच आहे अशाच गोष्टींचा मुख्यतः समावेश होतो. त्यामुळें सवलती असोत वा नसोत, अमेरिकेची मागणी या वस्तूंना सतत राहीलच. अशा वस्तूंत अभ्रक आणि तज्जन्य पदार्थ, गोणपाट ( Burlap ), काजू, गालिच्याची लोंकर, कच्चा ताग लाख ( Shellac ) व तागापासून केलेले पदार्थ यांचा समावेश होतो.

मात्र या बाबतींत एक गोष्ट लक्षांत ठेवावयास हवी कीं हिंदुस्थानच्या फाळणीपासून हिंदला बाहेरील देशांना कच्च्या तागाचा पुरवठा करणें अवघड होऊन बसलें आहे. आणि दुसरें म्हणजे ज्या वस्तूंचा हिंद मक्तेदार आहे अशा वस्तूंची कृत्रिम वैकल्पिक स्वरूपें ( Substitutes ) बाजारांत येऊं लागलीं असून हिंदी नैसर्गिक पदार्थांशीं तीं यशस्वी रीतीनें








स्पर्धा करूं शकतील. म्हणून हिंदी उत्पादकांनीं याबाबत सावध असलें पाहिजे. अर्थात् हिंदुस्थानांतील किंमतींच्या वाढींमुळें उत्पादनाचा खर्च भरमसाट वाढला असल्यामुळें जकातींच्या सवलतींमुळें हिंदी विक्रेत्यांचा थोडाफार फायदाच होणार आहे.

(२) सवलतींचा दुसरा उपविभाग हिंदच्या दृष्टीनें—विशेषतः भावी व्यापारवाढीच्या दृष्टीनें—फार महत्त्वाचा आहे. कारण, जे पदार्थ अद्याप फारसे निर्यात केले जात नाहींत परंतु ज्यांचा खप वाढविणें शक्य आहे अशा पुढील पदार्थांचा यांत समावेश होतो : मुख्यतः, काथ्या आणि त्यापासून बनविलेले पदार्थ, इतर वनस्पतींच्या धाग्यांपासून बनविलेले पदार्थ, पौर्वात्य पद्धतींचे गालिचे, कांबळीं, यंत्रसाह्याशिवाय बनविलेल्या चटया व रुजामे, टेनिस–रॅकेटस्, गवताच्या पिशव्या व पेट्या, ग्रॅफाइट्, नारळ, कांदे, लसूण, आलें, सतरंज्या आणि आंबे. युद्धजन्य परिस्थितीमुळें अमेरिकन सैनिकांचें व नागरिकांचें जें थोडेंफार वास्तव्य येथें झालें, त्याचाच परिणाम म्हणजे वरील कलात्मक आणि आंब्यासारख्या हिंदी वैशिष्ट्यपूर्ण गोष्टींना अमेरिकेंत मागणी निर्माण झाली आहे.

परंतु या पदार्थांचा पुरवठा करणें हिंदच्या व्यापारवाढीच्या दृष्टीनें जितकें महत्त्वाचें आहे तितकेंच तें अवघडहि आहे. कारण, एक तर आजपर्यंतचें सर्व उत्पादन केवळ वैयक्तिक जबाबदारीवरच होत आलें आहे आणि तेंहि येथील अन्तर्गत मागणीवर लक्ष ठेवूनच. परन्तु परदेशांत मागणी निर्माण झाली असल्यानें आतां आधुनिक पद्धतीनें व मोठ्या प्रमाणावर उत्पादन करण्याचे पायाशुद्ध, सुसूत्र आणि संघटित प्रयत्न होणें जरूर आहे. अमेरिकेसारख्या देशांत हिंदी पदार्थांना मागणी निर्माण होण्यांत हिंदी मालाची प्रतिष्ठा जशी वाढते तशीच ती राखण्याची जबाबदारीहि हिंदी उत्पादकांवर येऊन पडते. दुर्दैवानें, मालाचा दर्जा उच्च राखण्याबाबत हिंदी उत्पादकांचा मोठासा चांगला लौकिक नाहीं. तेव्हां या नवीन नवीन पदार्थांना नवीन बाजारपेठा निर्माण झाल्या असल्या तरी मालाचा दर्जा कमी न होऊं देऊन त्या टिकविणें हें हिंदी उत्पादकांवरच अवलंबून आहे.

या बाबतींत सरकारनेंहि पुढाकार घेऊन स्वतःच्या नेतृत्वाखालीं वरील पदार्थांचें शास्त्रशुद्ध रीतीनें उत्पादन हातीं घ्यावयास पाहिजे; इतकेंच नव्हे, तर अमेरिकेमध्यें हिंदी मालाचा खप अधिकाधिक व्हावा म्हणून हिंदी ट्रेडकमिशनरमार्फत सारखा प्रचार सुरू ठेवला पाहिजे. ह्या बाबतींत अमेरिकेमध्यें हिंदी–निर्यात–संशोधन–केंद्र अगर तत्सम संस्था सरकारनें निर्माण करून, अमेरिकन लोकांना नक्की कोणता माल आवडेल याचें संशोधन करून त्याची माहिती हिंदी उत्पादकांना पुरविण्याची व्यवस्था केली पाहिजे. याबाबत निरनिराळ्या व्यापारी संस्थांकडून सरकारला वेळोवेळीं मागणी, विनंति आणि चेतवणी करण्यांत आली आहे. परन्तु त्याचें दृश्य फल अजून तरी कांहींच दिसत नाहीं. असो.

(ब) हिंदनें अमेरिकेस एकंदर ५९ पदार्थांवरील आयात–जकातींबाबत सवलती देण्याचें ठरविलें आहे. जिनीव्हा–परिषदेनें जे सर्वसाधारण जकातींचे दर मान्य केले आहेत तेवढेच हिंद या पदार्थांवर लावील; जास्त असलेले दर त्या अनुरोधानें कमी केले जातील.

ज्या पदार्थांवरील जकातींमध्यें सवलती देण्यांत आलेल्या आहेत त्यांमध्यें खालील पदार्थांचा समावेश होतो:—

अन्नविषयकः—दूध (संरक्षित व डब्यांतील), लोणी, चीज आणि मलई, ताजीं फळें आणि डब्यांतील मोरंबे, मांस आणि मासळी. (सध्यां असलेल्या मूल्यनिष्ठ दरांत सुमारें ५ ते ६ टक्के कपात.)

औद्योगिक कच्चा मालः—रेझिन (राळ), खनिज वंगण (Grease), मासे आणि व्हेल यांपासून काढलेलीं तेलें, सिगारेटचा कागद, रेडिओचे भाग, रेल्वेचे लांकडी स्लीपर्स, ॲस्फाल्ट, दगडी कोळशांपासून केलेलें डांबर आणि इतर खनिज तेलें, औद्योगिक रसायनें इत्यादि. (सध्यांच्या मूल्यनिष्ठ दरांत सुमारें १५ ते ३ टक्के कपात.)

नेहमींच्या उपयोगास लागणारा पक्का मालः—पेनिसिलिन्, सल्फा–ड्रग्ज् आणि आणि व्हिटॅमिन्स वगैरे औषधें, चाव्या, कशिद्याचीं आयुधें, घरगुती रेफ्रिजरेटर्स, टाइपरायटर्स व इतर ऑफिस–मशिनरी,








विजेचे पाळणे, नेत्रोपयोगी उपकरणें, वैद्यकीय विजेचीं यंत्रें, घड्याळें, वाद्यें, रेडिओ-सेट्स् वगैरे. (सध्यांच्या मूल्यनिष्ठ दरांत सुमारें ५ टक्के कपात.)

वरील वस्तूंवरील जकातीमध्यें ८ जुलैपासून कपात करण्यांत येईल. परन्तु या ५९ वस्तूंखेरीज आणखी कांहीं वस्तू अशा आहेत कीं ज्यांच्यावरील जकातीच्या दरामध्यें ब्रिटनला कांहीं खास सवलती देण्यांत आलेल्या होत्या. या कराराअन्वयें ह्या सवलतींचें प्रमाण कमी करण्यास हिंदनें मान्यता दर्शविली आहे; परन्तु यासंबंधांत स्वतंत्र कायदा होण्याची आवश्यकता असल्यामुळें येत्या अधिवेशनांत हिंदी पार्लमेंट जरूर तो कायदा करील.

वरील वस्तूंखेरीज, या कराराच्या क्षेत्रांत आणखी कांहीं पदार्थ येतात, त्यांचे दोन भाग पडतात: (१) ज्यांवरील जकाती जिनीव्हा-करारांत मान्य झालेल्या दरांइतक्या अगर त्यांपेक्षां कमी आहेत असे पदार्थ आणि (२) जे पदार्थ खुल्या तत्त्वानें (जकातीखेरीज) आयात होतात आणि ज्यांबाबत हें खुलें तत्त्व पाळण्याची जिम्मेदारी उभय राष्ट्रांनीं पत्करिली आहे. ते या दोन गटांत समाविष्ट केलेल्या पदार्थांपैकीं कांहीं खालीलप्रमाणें आहेत:—

कांहीं विशिष्ट प्रकारची यंत्रसामग्री—या यंत्रसामग्रींत खाणी, तेल गाळणें, रेफ्रिजरेशन, पेट्रोलियम, धातूंविषयक, साखरउत्पादन, बोलपट, इत्यादि धंद्यांना लागणाऱ्या यंत्रसामग्रींचा समावेश होतो. शेतकीविषयक यंत्रें व ट्रॅक्टर्स (जकात माफ), दगडी कोळशांपासून तयार केलेले रंग, कचें तांबें, शिसें, सुकें दूध, कच्ची लोंकर व चरबी, नकली जवाहीर, विमानें आणि विमानांना लागणारे सुटे भाग.

या पदार्थांच्या आयातीवर जे कर हल्लीं आहेत ते तसेच चालू राहतील आणि त्यांना या करारानें बाध येणार नाहीं. उदा०, यंत्रसामग्रीवर किंमतीच्या १० टक्के जकात राखण्यांत आली आहे. कारण, हिंदुस्थानला जकातीच्या उत्पन्नाकडे दुर्लक्ष करून चालणार नाहीं.

एकंदरींत पाहतां हा करार म्हणजे इष्ट दिशेनें पडलेलें पाऊल आहे. सध्यां हिंद-सरकारची जर्मनींतील दोस्तव्याप्त व रशियाव्याप्त प्रदेश, रशिया, युगोस्लाव्हिया, स्वित्झर्लंड, चेकोस्लोव्हाकिया इत्यादि देशांशीं व्यापार-विषयक बोलणीं चालू आहेत अगर लवकरच चालू होतील. राजकीय तसेंच आर्थिक दृष्टीनें रशियाशीं हिंदनें व्यापार करणें आवश्यक आहे. नुकतेंच रशियाकडून हिंदला धान्य मिळणार असल्याचें प्रसिद्ध झालेंच आहे. रशियाकडून हिंदुस्थानांत येणारा माल म्हणजे पेट्रोलियम-प्रॉडक्ट्स्, काड्याच्या पेट्यांस लागणारें लांकूड, सोडा-कॉपाउंड्स् वगैरे आहेत. हिंदलाहि रशियास तांदूळ, ताग, चहा, कॉफी, कातडीं, गळिताचीं धान्यें, नारळ वगैरे वस्तू पाठवितां येतील. सारांश, हिंद-सरकारनें व्यापारी आघाडी जोरकस रीतीनें निर्माण करावयास हवी आणि हिंदी मालाचा उठाव करण्याचे प्रयत्न केले पाहिजेत. आजकालच्या जागतिक परिस्थितींत हिंदच्या राजकीय आणि आर्थिक हिताच्या दृष्टीनें अशी व्यापारी आघाडी उभारणें आवश्यक आहे.*

* या स्फुटांत उपयोगांत आणलेल्या आंकड्यांपैकीं व माहितीपैकीं कांहीं आंकडे व कांहीं माहिती Indian Finance, 10--7--48 व Eastern Economist, 9--7--48 यांमधून घेतलीं आहेत. —लेखक












# हिन्द-अमेरिका व्यापारी करार, १९४८.

(या कोष्टकांचा उल्लेख पृ. ७४ वर केला आहे.)

## हिन्दुस्थानचा परराष्ट्रीय व्यापार
आंकडे कोटी रु.चे.

| काल | आयात मालाची किंमत | | निर्यात मालाची किंमत | |
|---|---|---|---|---|
| | ब्रि० साम्राज्य | इतर देश | ब्रि० साम्राज्य | इतर देश |
| १९३८-३९ चा सरासरी महिना | ७·३ | ५·२ | ७ | ५·७ |
| मे १९४७ | १६ | २१ | १७ | १७ |

## हिन्दुस्थानचा अमेरिकेशीं व्यापार
आंकडे कोटी डॉलर्सचे

| वर्ष | आयात मालाची किंमत | निर्यात मालाची किंमत |
|---|---|---|
| १९३८ | ३·४ | ५·९ |
| १९४५ | ६·७ | १७·३ |
| १९४६ | १६·९ | २३·७ |
| १९४७-४८ | .... | २५·४ |

---

स्फुट लेख—

# माझें वागणुकीचें तत्त्वज्ञान

श्री. ना. गो. चापेकर

[ श्री. ना. गो. चापेकर यांच्या वयाचीं ७९ वर्षे पुरीं झालीं असून, गेल्या आषाढ वद्य त्रयोदशीस त्यांनीं ८०व्या वर्षांत पदार्पण केलें आहे. येवढ्या वृद्धापकालांतहि श्री. नानासाहेबांची विचारशक्ति किती तरतरीत, आहे, देशांतील विविध घटनांकडे पाहण्याचा त्यांचा दृष्टिकोण कसा शास्त्रीय आणि सडेतोड आहे हें ' नवभारत' च्या वाचकांना सांगण्याची जरूरी नाहीं. आपल्या गेल्या वाढदिवसाच्या निमित्तानें त्यांनीं आपल्या मनांतील एकादा प्रमुख विचार ' नवभारता 'करितां लिहून द्यावा अशी विनंति त्यांना आम्हीं केली. त्या विनंतीला मान देऊन त्यांनीं हा प्रस्तुत छोटासा लेख दिला आहे. हा लेखहि नानासाहेबांच्या व्यक्तिमत्त्वाचा निदर्शक आहे असें आम्हांस वाटतें. या निमित्तानें आम्हीं नानासाहेबांस दीर्घायुरारोग्य चिन्तितों.—का. सं. ]

पितरांच्या परिसरांत प्रवेश करण्यापर्यंत मजल मारिली कीं, एकदां पाठीमागें वळून पाहण्याची इच्छा होतेच. नवोढा वधू प्रथमतःच सासरीं जातांना मधून मधून माहेर–घराकडे झांझरती नजर फेंकते, तसेंच येथें होतें. मात्र ती भावना वेगळी असते. ज्यांच्या प्रेमाच्या उबाऱ्यांत आपण सुखानें वाढलों, लडिवाळपणानें ज्यांनीं आपलें लालन–पोषण केलें, त्यांच्या असह्य वियोगानें पाऊल मंदावतें, तर इकडे जीवन-साफल्याचा आशेनें पाऊल पुढें खेंचलें जातें. हा झाला नववधूचा प्रकार. इकडे प्रवासी अव्यक्तांत गडप होण्यापूर्वीं 'आपण जन्मास येऊन काय केलें ? आयुष्य व्यर्थ कंठिलें काय ? जन्मदात्याला फसविलें तर नाहीं ?' ह्या विचारांत मग्न होतो. ह्या विचारानें त्याचें मन व्यथित होतें. जन्ममरण दोनहि अटळ, आवरतां न येणारीं; पण ह्या दोहोंमध्यें दुव्यासारखा असणारा जो काळ म्हणजेच आयुष्य तें तरी आपल्या आटोक्यांत असतें काय ? वाटेल त्याप्रमाणें त्याला वळण देण्याइतकें प्रभुत्व आपल्या ठिकाणीं आहे काय ? जेथें जीविताच्या सांखळीचीं दोन टोंकें आपल्या अधीन नाहींत तेथें ती सांखळी तरी आपल्या ताब्यांत कशी राहणार ? संयोजना करावी म्हणाल, परंतु ज्या परिस्थितींत जन्म लाभला त्या परिस्थितीचा आणि आपल्या आकांक्षांचा मेळ बसणें अशक्य आहे असा अनुभव येतो. बरें, संयोजन तरी केव्हां होऊं शकेल ? सज्ञानावस्थेंतच ना ? परंतु ही सज्ञानावस्था ज्या मुशींतून निघते ती मूस बनविणारे दुसरेच–आईबाप, सरकार आणि समाज. मूस तसा नूर. वयांत येईपर्यंत मनाची ठेवण बनते, बुद्धि आपली दिशा निश्चित करते, आशा–आकांक्षा व मनोरथ खच्ची होतात. तात्पर्य, आरंभीं परतंत्रता, अखेरीस परतंत्रता, मध्यंतरींहि परतंत्रता ! मग जन्मास आलेल्या व्यक्तीनें करावें तरी काय ? ह्या प्रश्नाचें उत्तर एकच आणि तें म्हणजे कर्तव्य पार पाडणें. ज्या परिस्थितींत मनुष्य जन्मास येतो त्या परिस्थितीशीं सदृश अशीं कर्तव्यें जन्मावरोबरच निर्माण झालेलीं असतात. तीं ओळखून दक्षतेनें बजावणें हाच मनुष्याचा पुरुषार्थ, हाच त्याचा धर्म, हाच त्याचा मोक्ष, हेंच त्याच्या समाधानाचें स्थान. गेल्या साठसत्तर वर्षांच्या अनुभवानें ह्या सिद्धांताचें महत्त्व मला पटलें आहे. पैसा व प्रसिद्धि हीं ज्याच्या क्रियेचीं कारक होतात तो आत्मलोभी मनुष्य समाजोपयोगी असत नाहीं. कर्तव्य तर अन्यापेक्ष आणि म्हणून बहुविध असतें. पैसा व प्रसिद्धि हीं व्यक्तिपर असतात.












## माझें वागणुकीचें तत्त्वज्ञान

कर्तव्यनिष्ठ मनुष्य सद्गुणी असावाच लागतो. दुर्गुणी माणसाच्या हातून कर्तव्य पार पडत नाहीं. कालाच्या उदरांत शिरतांना पैसा येथेंच राहतो व तो दुसऱ्याचा होतो. कीर्ति अल्पकाळ टिकते आणि पुढें तीहि नष्ट होते. येवढेंच नव्हे तर आजची कीर्ति क्वचित् उद्यांची अपकीर्तीहि बनते. ह्याला रामाचें उदाहरण पुरेसें आहे. कर्तव्य करीत राहणाऱ्या माणसाला दुःखाचा अनुभव कधींच येत नाहीं. लहान-मोठीं कर्तव्यें प्रामाणिकपणें बजावण्यांत जो आनंद लाभतो तो अवर्णनीय असतो. मला एकदां एकानें विचारलें, "माणसाला खाष्ट, कजाग, मूर्ख बायको मिळाली तर तुमची ही कर्तव्यविषयक चर्पट-पंजरी त्याच्या कामीं पडेल काय? तसेंच तुमचें कर्तव्योदित समाधान त्याला लाभेल का?". ह्याला माझें उत्तर असें कीं बायको कशीहि असली तरी तिच्या संबंधानें त्याचें जें कांहीं कर्तव्य असेल, तें त्यानें केलेंच पाहिजे. येथेंच त्याच्या कर्तव्यनिष्ठेची कसोटी आहे. चांगली बायको लाभल्यास कोणीहि तिच्या संबंधानें चांगल्या रीतीनें वागेल. ह्यांत विशेष असें कांहींच नाहीं. ती वैश्यवृत्ति झाली. त्यांत देवाण-घेवाण आहे. तें सापेक्ष कर्तव्य आहे. उलट बायको खाष्ट असूनहि आपण आपलें कर्तव्य करीत राहिलों तर तें विनमोबदल्याचें असल्यानें निरपेक्ष गणलें जाईल. त्याची थोरवी फार आहे. सुखाघात हा दुसरा आक्षेप. त्याचेंहि निरसन करितां येतें. कजाग स्त्री आपल्या पदरीं पडली खरी; तथापि दुसऱ्या कोणा व्यक्तीचे हाल टाळण्याकरतां तिचें आपण पाणिग्रहण केलें अशी भूमिका स्वीकारली म्हणजे ह्या परोपकाराच्या जाणीवेपासून आपणांस सतत समाधान लाभल्यावांचून राहणार नाहीं. एकाद्या सात्त्विक, गरीब गृहस्थाच्या गळ्यांत ह्या दुःस्वभावी स्त्रीनें माळ घातली असती तर त्याचा संसार म्हणजे त्याला नरकवास झाला असता. ह्या मोठ्या आपत्तींतून त्या गृहस्थाला आपण सोडविलें हें काय उपेक्षणीय मानावयाचें? सुख हें मानीव आहे. तो मनाचा धर्म आहे. आपल्या सुखाचा उगम पर-व्यक्तींत आहे असें मानणाऱ्याला कधींच सुखानंद प्राप्त होणार नाहीं. आपल्या सुखाचे धनी आपणच आहों, दुसरा कोणी नाहीं. आणि हें सुख कर्तव्य केल्यानेंच मिळणार ह्यांत संशय नाहीं. दीर्घायुष्याचें सुद्धां हेंच प्रमुख कारण आहे असें मी समजतों. कर्तव्य करतां करतां मरणें हें महद्भाग्य होय. मृत्यु येणारच; तो केव्हांहि येवो! त्याला मी आव्हानहि देत नाहीं, त्याला कस्पटासमान मानण्याइतका मी शूरहि नाहीं. परंतु ह्या मृत्यूपेक्षां दुसऱ्या मृत्यूला मी भितों. कर्तव्य करण्याचें सामर्थ्य जिवंतपणीं नष्ट होणें हाच खरा मृत्यु. असो. अशा रीतीनें मागें वळून पाहतां ज्याला समाधानाचा निःश्वास सोडतां येईल तो सुखी. नाहीं तर 'कर्मकारभस्त्रेव श्वसन्नपि न जीवति'.

---

"गेल्या सव्वा वर्षांचा अल्पावधीचा काळ कांहीं अंशीं कृतार्थतेनें व यशःसिद्धीनें भरलेला आहे हें खरें. परंतु त्याबरोबरच त्याच अवधींत भयंकर दुःखें आणि अरिष्टें आपण अनुभविलीं आहेत. गेल्या कांहीं महिन्यांत ज्या कांहीं घटना घडून आल्या त्या आठवल्या तर हिंदी राज्यकारभाराशीं संबंध असलेल्या माझ्यासारख्या लोकांचें हिंदी लोकांनीं चालूं कसें दिलें याचें मला वारंवार कौतुक तसाच विस्मय वाटला आहे. जर मी या सरकारमध्यें नसतों तर मी या सरकारचें हें चालूं दिलें असतें कीं काय याबद्दल मी खात्री देऊं शकत नाहीं."

—पं. जवाहरलाल नेहरू.

(मौंटबॅटन—कुटुंबाला निरोप देतांना केलेल्या भाषणामधून २०-६-४८.)



अनुक्रमणिका






# सुख–संवाद

**( लेखक—वामन पुरुषोत्तम दामले,** बुलढाणा. प्रकाशक : चित्रशाळाप्रेस, प्रकाशन–विभाग, पुणें २. किंमत २॥ रु. )

लेखकानें लिहिलेल्या एकवीस लघुनिबंधांचा हा संग्रह आहे. लघुनिबंधांत विषयाला महत्त्व नसून व्यक्तीला महत्त्व असतें. विषयाचें सर्वांगीण विवेचन करण्याचा लघुनिबंध–लेखकाचा हेतु नसतो. व्यासंगपूर्ण अभ्यासाचें फल म्हणून कांहीं विषयांवरील आपले परिपक्व विचार मांडावयाचे या उद्देशानें जुन्या जमान्यांतील निबंध लिहिले जात. लघुनिबंधांत विचार किंवा व्यासंग यापेक्षां आत्माविष्कारालाच प्राधान्य दिलेलें असतें. विषयाच्या विवेचनापेक्षां या आत्मप्रकटीकरणाबरोबर लेखकाच्या व्यक्तित्वाची, त्याच्या आवडीनावडींची ओळख वाचकांना झाली पाहिजे. म्हणूनच दैनंदिन जीवनांतील उपेक्षणीय विषयावर सुद्धां लघुनिबंधाचा लेखक आपली लेखणी चालवीत असतो. लघुनिबंधांच्या या सर्व मान्य निकषाला उतरणारे असेच निबंध प्रस्तुत संग्रहांत वाचकांना सांपडतील. आत्मप्रकटीकरण, जीवनांतील क्षुद्र प्रसंगांतील काव्य अन् सौंदर्य, खेळकर वातावरण, विनोदाची झालर आणि भाषेचें संभाषणात्मक स्वरूप हे सर्व लघुनिबंधाचे विशेष या संग्रहांतील निबंधांत थोड्याअधिक प्रमाणांत सर्वत्र विखुरलेले आहेत. निबंधाला सुरवात एकाद्या क्षुल्लक प्रसंगाच्या निवेदनानें करावयाची आणि गप्पागोष्टींच्या आविर्भावांत वाचकांच्या गळीं एकादें महान् तत्त्व उतरविण्याचा प्रयत्न करावयाचा अशा पद्धतीचाहि अवलंब लेखकानें कांहीं निबंधांत केला आहे. भोंवतालच्या वैविध्यसंपन्न जीवनाकडे चौफेर दृष्टि टाकून आपल्या अनुभवांचें सार तसेंच सौंदर्य मनोज्ञ रीतीनें मांडण्याचें कौशल्य ह्या निबंधांत ठायीं ठायीं दृष्टीस पडतें. लघुनिबंधाला पांडित्याचें वावडें असलें तरी लेखक मात्र चांगलाच विदग्ध असावा लागतो. व्यासंग आणि सहृदयता यांचा प्रत्यय वाचकांना आला पाहिजे. 'तंबाखू' " जिवाची मुंबई " " सिद्धींची भ्रामकता " इत्यादि निबंधांत असा प्रत्यय आल्यावांचून रहात नाहीं. श्री. दामले यांनीं इंग्लिश, मराठी आणि संस्कृत वाङ्मय मोठ्या आस्थेनें आणि रसिकपणानें वाचलेलें दिसतें. या वाङ्मयांतील प्रसिद्ध कवी आणि लेखक यांच्या लेखनांतील समर्पक उल्लेख पदोपदीं आढळतात.

खांडेकरांची कल्पकतां, काणेकरांची तत्त्वजिज्ञासा किंवा फडके यांची तंत्रशुद्ध मांडणी आणि वाणीचा विलास या बाबतींत प्रस्तुत निबंधसंग्रहाचें स्वरूप किंचित् खालच्या दर्जाचें वाटेल; तसेच कांहीं निबंधांतून अनावश्यक गोष्टींचें पाल्हाळिक कथनहि रसहानिकारक ठरतें. परंतु एकंदरीनें पाहतां या निबंधांत वास्तववादी सहजता आणि भावनांची सोज्ज्वलता असल्यामुळें लघुनिबंधवाङ्मयांत या पुस्तकानें महत्त्वाची भर टाकली असल्याचा निर्वाळा वाचकांना द्यावा लागेल यांत शंका वाटत नाहीं.

— श्री. रा. पा.








सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाचें मासिक

# नवभारत

संचालक

श्री. शंकरराव देव

संपादक

आचार्य शं. द. जावडेकर

आचार्य स. ज. भागवत

श्री. ह. कृ. मोहनी

प्रा. वि. म. बेडेकर

वर्ष १ लें. : अंक १ ते १२

(आक्टोबर १९४७ ते सप्टेंबर १९४८)

नवभारत कार्यालय

२१९ शिवाजीनगर, पुणें ५

वार्षिक वर्गणी ९ रु. किरकोळ अंक १ रु.

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# लेख-सूचि

**ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर १९४८**

## नवभारत

## सूचि (आक्टोबर १९४७ ते सप्टेंबर १९४८)










## सूचि ( आक्टोबर १९४७ ते सप्टेंबर १९४८ )













मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास


नवभारत
७५
अमृतमहोत्सवी
वर्ष

# लेखक-सूचि

## आक्टोबर १९४७ ते सप्टेंबर १९४८

[ लेखकाच्या नांवापुढील पहिला आंकडा अंकाचा व पुढील पृष्ठांचे. ( अर्धविराम टाकून ) ]















वाई




मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास



नवभारत
७५
अमृतमहोत्सवी
वर्ष

वर्ष पहिलें
अंक बारावा

# नवभारत

सप्टेंबर
१९४८

## या अंकांतील जाहिराती व जाहिरातदार

सेंट्रल ग्लास फॅक्टरी : अब्दुल हुसेन अलाबक्षजी : आयुर्वेद रसशाळा पुणें लि. : आयडियल फर्निचर वर्क्स : विष्णू फार्मसी : धि सेंट्रल पॉटरीज लि. : पांढरे कोड—वैद्य बोरकर : मॅचेस —डी. बी. वीनीवाले जी. जी. दांडेकर मशिन वर्क्स लि. : जे. अँड एम. को फार्मसी.



अनुक्रमणिका






